भारत-गौरव-ग्रंथमाला—६७

# केंजळगडचा कबजा



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

लेखक—

विद्याधर वामन भिडे.

सन १९२६

साधी प्रत एक रुपया. ] किंमत [ कापडी प्रत दीड रुपया.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

‘ कोरलईचा किल्लेदार ’ या कादंबरीचा दुसरा भाग आम्हीं प्रसिद्ध केला तेव्हां श्रीशिवछत्रपतींच्या कालास अनुलक्षून कांहीं कादंबऱ्या रा. मिडे लिहीत असल्याचें आम्हीं सुचविलें होतें. त्या मालेंतील ही पहिली कादंबरी आज आम्ही प्रसिद्ध करीत आहों.

स्वराज्याची तृष्णा सर्वांस सारखी लागली पाहिजे आणि स्वराज्याची इमारत उभारण्याच्या कार्यांत आपल्या हातून होईल ती अल्पस्वल्पसुद्धां कामगिरी करण्यास सर्वांनीं मनोभावें झटलें पाहिजे ही या कथेची मध्यवर्ती कल्पना आहे. आपसांतील सर्व भेदभाव व स्वतःचा मोठेपणाही विसरून सर्वांनीं एकाच हेतूच्या पूर्ततेसाठीं नानाविध प्रयत्न करीत राहणें हें स्वराज्य संपादनाच्या मार्गांचें रहस्य आहे. या रहस्याच्या उद्घाटनाचा आरंभ प्रस्तुत कथेंत रा. मिडे यांनीं केला आहे, आणि पुढील लहानमोठ्या कादंबऱ्यांत याच रहस्याचीं नानाविध रूपें रंगविण्याचा यत्न ते करतील.

चांगले कादंबरीकार निर्माण करणें हेंही पुष्कळ अंशीं जनतेचें कार्य आहे. लेखकाच्या व प्रकाशकाच्या श्रमांना सक्रिय प्रोत्साहन तिच्याकडून मिळालें म्हणजे ‘ क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ’ या कविवचनास अनसरून त्यांनाही नवे श्रम करण्यास दुप्पट हुरूप चढतो.

# कैंजळगडाचा कबजा.

## प्रकरण १ लें.

## धोंडीबा आणि कोंडीबा.

शके १५६९ च्या मार्गशीर्ष महिन्यांतील एक प्रसंग.

कैंजळगडाच्या तटाच्या आंतल्या आवारांत नैर्ऋत्य दिशेकडच्या भागांत सुमारें पन्नास झोंपड्या होत्या. ह्या झोंपड्यांत अनेक धंदे करणारे कारागीर लोक आपल्या बायकामुलांसह राहात असत.

कांहीं झोंपड्या लहान होत्या, आणि कांहीं मोठ्या होत्या; कांहीं उंच बांधणीच्या होत्या, कांहों ठेंगण्या बांधणीच्या होत्या. कांहींच्या भिंती दगडांच्या, कांहींच्या कच्च्या विटांच्या, आणि कांहींच्या भाजलेल्या विटांच्या होत्या. कांहींच्या माथ्यांवर गवती छपरें होतीं, आणि कांहींच्या माथ्यांवर कौलारू छपरें होतीं.

ह्या झोपड्या त्या आवारांत अस्ताव्यस्त होत्या. कांहीं दूर दूर होत्या, कांहीं जवळ जवळ होत्या; कांहींना अंगणें होतीं कांहींना नव्हतीं.

ह्या झोपड्यांत अनेक धंदे करणाऱ्या कारागिरांचीं कुटुंबें राहात होतीं. शिकलगार, कोष्टी, सुतार, लोहार, घिसाडी, पिंजारी, शिंपी, रंगारी, जिनगर, वगैरे लोक ह्या झोपड्यांत आपआपल्या कुटुंबांनिशीं राहात. ह्याच झोपड्यांत ते आपले धंदे चालवीत, आणि ह्याच झोपड्यांत ते आपल्या कारागिरीचे पदार्थ गिऱ्हाइकांना विकीत. सारांश, ह्या झोपड्या हीं त्यांचीं रहावयाचीं घरें होतीं, कारखाने होते, आणि दुकानेंही होतीं.

अशा ह्या झोपड्यांपैकीं एका झोपडीच्या पुढच्या अंगणांत एक मराठा गडी तिसऱ्या प्रहराच्या सुमारास काम करीत बसलेला होता.

हा गडी सुमारें पसतीस वर्षांच्या वयाचा दिसत होता. तो वर्णानें काळा होता, काठीनें उंच आणि सडपातळ होता, परंतु त्याच्या मांड्या, पोटऱ्या, दंड, छाती, वगैरे शरीराचे भाग विलक्षण मजबूत दिसत होते. त्याचे डोळे पाणीदार

होते, आणि त्याचा चेहेरा ठसठशीत दिसत होता. ह्या वेळीं त्याच्या अंगावर नेसलेल्या पंच्याशिवाय दुसरें कांहींच वस्त्र नव्हतें.

ह्या इसमाच्या पुढें एका कांबळ्यावर एक चिंध्यांचा ढीग होता. ह्या चिंध्या असंख्य वर्णांच्या, असंख्य आकारांच्या, असंख्य विणींच्या, आणि असंख्य मापांच्या होत्या. ह्या इसमाच्या शेजारीं अनेक सुया, अनेक प्रकारचीं सुजनें, दाभणें, वगैरे असून दोरे, सुऱ्या, कातऱ्या, वगैरे त्याच्या कामाला जरूर लागणारीं हत्यारें आणि उपकरणें होतीं. गडावर मशाली पुरविणें हा त्याचा धंदा होता.

ज्या वेळीं आपण ह्या इसमाला पाहात आहों, त्या वेळीं त्याच्या डाव्या हातांत एक अर्धवट तयार झालेली मशाल होती. उजव्या हातांत एक चिंधी होती, तिचें एक टोंक त्यानें मशालीवर डाव्या हाताच्या अंगठ्यानें दाबून धरलेलें होतें.

ह्या स्थितींत तो बराच वेळ स्तब्ध बसून राहिलेला होता. त्याचीं बोटें कांहीं काम करीत नव्हतीं. त्याचें मन चिंताकुल झालेलें असल्याकारणानें त्याला कांहीं सुचत नसावें असें त्याच्या मुद्रेवरून सहज लक्षांत येण्याजोगें होतें.

ह्या निस्तब्ध स्थितींत तो बराच वेळ बसून राहिला होता, तों त्याच्या भेटीला एक इसम आला. तो ह्या इसमाला म्हणाला, " राम राम, धोंडीबा, राम राम !"

हें अभिवादनाचें वाक्य उच्चारणारा इसम वर्णानें निमगोरा, काठीनें उंच, आणि बांधणीनें जाडसर होता. त्याचें कपाळ उंच होतें, डोळे विशाल आणि तेजस्वी होते, नाक किंचित् बोजड होतें, आणि ओठ काळे होते. त्याचे दांत मोठमोठे पण स्वच्छ पांढरे सफेत असून एका रांगेत होते. त्याचे दंड, मांड्या, पोटऱ्या, वगैरे अवयव मर्दानी कामांनीं मजबूत झालेले दिसत होते. त्याचें वय चाळीसाच्या आंत बाहेर असावें असें दिसत होतें.

ह्या वेळीं त्याच्या डोक्यावर एक पिवळ्या रंगाचें मळकट मुंडासें होतें, अंगांत एक तंग बंडी होती, आणि कमरेला मळकट पंचा गुंडाळलेला होता. त्याच्या उजव्या हातांत एक भरींव चिव्याचा सोडगा असून खोंटीला एक भला लठ्ठ बटवा लटकलेला होता.

हा इसम धोंडीबाचा साडू होता. सोयऱ्यांत साडू हा मैत्रीला उत्तम माणूस, अशी आपल्यामध्यें म्हण आहे. त्या म्हणीशीं संवादी असेंच धोंडीबाशीं त्याचें वर्तन होतें. ते दोघे जण जिवश्च कंठश्च मित्र होते.

नबाब साहेबांच्या वाड्यांत दिवाबत्ती पाहाण्याच्या कामावर हा धोंडीबा असे.

हा इसम जो धोंडीबाच्या भेटीला आलेला होता, त्याच्या तोंडचें "राम राम धोंडीबा, राम राम" हें अभिवादनाचें वाक्य कानीं पडतांच धोंडीबा,-जो चिंताग्रस्त मनानें निस्तब्ध बसला होता,-तो देहभानावर येऊन म्हणाला, "राम राम कोंडीबा, राम राम! मी तुमच्या भेटीला आजच संध्याकाळीं येणार होतों. तुम्हीच माझ्याकडे आलांत हें उत्तम झालें; बसा."

त्यावर कोंडीबा म्हणाला, "धोंडीबा, येथें बसण्यापेक्षा आपण आंतल्या बाजूस बसलों तर बरें असें मला वाटतें. आंतच खोलींत चला."

तेव्हां धोंडीबा म्हणाला, "मलाही तसेंच वाटतें. कारण, आपणास एका महत्वाच्या गोष्टीचा विचार करावयाचा आहे."

हें शेवटचे वाक्य धोंडीबा अगदीं हलक्या स्वरांत बोलला; मग चिंध्यांची रास आणि धंद्याचीं हत्यारें आपल्या बायकोला आवरावयाला सांगून धोंडीबा आपल्या मित्रासह झोंपडींतल्या खोलींत गेला. तेथें ते दोघे जण बसल्यावर कोंडीबा हलक्या आवाजानें म्हणाला, "धोंडीबा, आज माझ्या कानावर उडत उडत एक बातमी आली आहे; ती कितपत खरी आहे हें तुम्हांला विचारावयला मी तुमच्याकडे आलों आहें. माझा रोख तुम्ही ओळखलाच असेल. काय तें तुमच्या तोंडून ऐकावें म्हणून मी आलों आहें."

धोंडीबा म्हणाला, "तुमच्या भाषणाचा मी रोख ओळखला. तुम्ही माझ्या मुलीसंबंधानेंच बोलतां आहांना?"

कोंडीबा म्हणाला, "होय. नबाबसाहेब तुम्हाला काय म्हणाले तें मला सांगा, म्हणजे पुढें काय करावयाचें तें आपणांला ठरवितां येईल."

धोंडीबा म्हणाला, "मी तुम्हाला इत्थंभूत हकीगत सांगतों, ऐका. आज सकाळीं प्रहरभर दिवस चढला होता, मी आपल्या चिंध्या घेऊन काम करीत होतों, अशा वेळीं नबाबसाहेबांकडून एक इसम येऊन मला नबाबसाहेबांनीं आतांच बोलावलें आहे असें सांगून निघून गेला. कशा करतां मला नबाबसाहेबांनीं बोलावलें आहे असें मीं त्याला विचारलें, पण तें 'मला ठाऊक नाहीं' असें त्यानें मला उत्तर दिलें!

मी मनांत आश्चर्य करीत आणि तर्क करीत अंगामध्यें सणावाराचे कपडे घालून घाईघाईनें नबाबाच्या वाड्यांत गेलों. एका हुजऱ्यानें मला नबाबसाहेब ज्या दिवाणखान्यांत बसले होते त्यांत नेऊन सोडलें आणि आपण स्वतां दाराशीं उभा राहिला.

ह्या वेळीं नबाबसाहेब एका दिवाणावर आरामाच्या संस्थानांत बसलेले होते. त्यांच्या उजव्या हातांत हुक्क्याच्या नळीचें तोंड होतें. जवळ पंख्यानें चिलमीवर वारा घालणारा पोऱ्या महंमद उभा होता. दुसऱ्या एका दिवाणावर काजीसाहेब बसलेले होते, आणि नबाबसाहेबांच्या दिवाणाच्या पाठीमागें दोन हुजरे उभे होते.

मी त्या दिवाणखान्यांत शिरून सात आठ पावलें चालत पुढें गेलों, मग शिरस्त्याप्रमाणें लवून प्रथम नबाबसाहेबांना आणि नंतर काजीसाहेबांना मुजरा केला. मंदस्मितपूर्वक त्या दोघांनीं माझ्या मुजऱ्याचा स्वीकार मान हालवून केला.

मुजरा करून मी नबाबसाहेबांपुढें आदबीनें उभा राहिलों. माझ्या तोंडावर नजर लावून नबाबसाहेब मला म्हणाले, ‘ धोंडीबा, तुझी मुलगी अरुंधती ही परीप्रमाणें सुंदर आहे असें कालपर्यंत आम्ही ऐकत होतों, परंतु काल ती आमच्या नजरेस पडली. तेव्हां ती खरोखरच परीप्रमाणें सुंदर आहे असें आम्हाला कळून आलें. आतां आम्ही तुजपाशीं एक मागणी करतों. तुझी मुलगी जर मुसलमान झाली आणि आमच्याशीं तिनें निका लावला, तर आम्ही तुला पांचशें मोहोरा बक्षीस देऊं. हें द्रव्य तुला तीन पिढ्या पुरेल. पांचशें मोहोरांहून अधिक मोहोरा तुला पाहिजे असल्या तरी आम्ही तुला देऊं. बोल, तुझ्या मनाला ही गोष्ट येते काय ?’ असें नबाबसाहेब मला म्हणाले.”

कोंडीबानें विचारलें, “ त्यावर तुम्हीं काय उत्तर दिलें ? ”

धोंडीबा म्हणाला, “ नबाबसाहेबांची ती विचित्र मागणी ऐकतांच मला अत्यंत संताप आला. परंतु मी विलक्षण मनोनिग्रहानें तो संताप चेहेऱ्यावर, किंवा बोलण्याच्या स्वरांत प्रकट न होऊं देतां नम्रपणानें आणि शांत स्वरानें उत्तर दिलें, ‘ खाविंद, आपण मागत आहां ती मागणी पुरवावयाला मी कबूल होणार नाहीं. माझी बायको कबूल होणार नाहीं, आणि मुलगीही कबूल होणार नाहीं. आपण आपली मागणी परत घ्यावी अशी मी आपणाला प्रार्थना करतों. आमच्या हिंदू धर्मांत राहून दगडांच्या आणि धातूंच्या मूर्तींना भजून आम्हाला जितपत सुख मिळेल, तितपत सुखांत आम्ही संतुष्ट आहों. धर्मत्याग करून मिळणारें सुख आम्हांला नको आहे. धर्मत्याग माझ्या मुलीकडून करवून मी पांचशें किंवा हजार मोहोरा मिळवावयाला कबूल नाहीं. नबाब साहेबांनीं मला माफी करावी.”

कोंडीबा उद्गारला, “ शाबास ! धोंडीबा, शाबास ! तुम्हीं योग्य उत्तर दिलें. बरें पुढें काय झालें ? ”

त्यावर धोंडीबानें उत्तर दिलें, " माझें भाषण ऐकून नवाबसाहेबांना आणि काजीसाहेबांना अत्यंत आश्चर्य वाटलें असें त्यांच्या मुद्रेवरून मला दिसून आलें. नवाबसाहेब मला म्हणाले, ' धोंडीबा, तूं मूर्ख आहेस. तुला तुझें हित कळत नाहीं. आमच्या धर्माची दीक्षा तुझ्या मुलीनें घेतली, तर इहलोकीं ती माझी बायको होऊन असंख्य प्रकारचे सुखविलास भोगून मरणोत्तर ती खऱ्या स्वर्गाला जाईल. अशा रीतीनें तिचें इहलोकीं आणि परलोकीं कल्याण होईल, आणि शिवाय तिच्या आईबापांचें तीन पिढयांचें कल्याण होईल. ती माझ्याशीं शादी लावावयाला कबूल झाली, तर आजच्या आजच हे काजीसाहेब आमची शादी करून देतील. मग ती माझ्या सहवासांत परांच्या गाद्यांवर लोळेल, मधुर पक्वान्नें खाईल, अमृततुल्य पेयें पिईल. बोल, तुझी कबूली आहे काय ?' "

कोंडीबानें विचारलें, " बरें, ह्यावर तुम्ही काय जबाब दिला ? "

धोंडीबा म्हणाला, " मी नवाबाला उत्तर दिलें कीं आपण जें दृश्य माझ्या डोळ्यापुढें रेखाटीत आहां, तें पाहून मला मोह पडत नाहीं. आम्ही हिंदू धर्मांतच राहाणार. आम्हाला जी कांहींमीठ भाकरी मिळेल ती खाऊन आणि जाडेंभरडें वस्त्र मिळेल तें लेऊन जें सुख मिळेल, त्यांत आम्ही संतुष्ट आहों. धर्मांतर केल्यानें कितीही आणि कसलेंही सुख मिळत असलें, तरी तें आम्हाला नको आहे."

कोंडीबा म्हणाला, " बरें पुढें ! "

धोंडीबा म्हणाला, " माझें उत्तर ऐकून काजीसाहेबांना आश्चर्य वाटलें आणि नवाबसाहेबांना राग आला. मग नवाबसाहेब मला म्हणाले, 'धोंडीबा, तूं आपल्या हट्टानें आपलें नुकसान करून घेत आहेस, आणि आपल्या मुलीचेंही नुकसान करीत आहेस. तूं आपल्या घरीं जा. माझी मागणी तुझ्या बायकोला आणि मुलीला कळीव म्हणजे त्या कबूल होतील. कदाचित् तुझी बायको तुझ्याप्रमाणें हट्टी असली तरी तुझ्या मुलीच्या तोंडाला पाणी सुटेल. ती माझ्या जनानखान्यांत यावयाला कबूल होईल. तूं आतां जा आणि शांतपणानें विचार करून तुझा निश्चय काय ठरतो तें मला उद्यां येऊन सांग, जा.' "

कोंडीबा म्हणाला, " नवाबसाहेबांनीं तुम्हाला रुखसत दिल्यावर तुम्ही निघून आलां असाल ? "

धोंडीबा म्हणाला, " बरें आहे," असें नवाबसाहेबांना उत्तर देऊन आणि त्यांना आणि काजीसाहेबांना मुजरा करून मी त्या दिवाणखान्यांतून निघून बाहेर

आलों. घरीं आल्यावर ती हकीगत मीं आपल्या बायकोला आणि मुलीला सांगितली. त्या दोघींचा विचार माझ्याच सारखा आहे ! तेव्हांपासून मी चिंताग्रस्त होऊन बसलों आहें. मला कांहीं सुचत नाहीं. मी संध्याकाळीं तुमची सल्ला विचारावयाला येणार होतों, तों इतक्यांत तुम्हीच आलांत हें फार उत्तम झालें. तुमचा विचार काय तो मला सांगा."

कोंडीबा म्हणाला, "तुम्हीं जीं उत्तरें नबाबसाहेबांना दिलींत तीं माझ्या मतें अत्यंत योग्य होतीं ह्यांत कांहीं संशय नाहीं. पण आतां प्रश्न इतकाच कीं नबाबसाहेबांची मागणी तुम्हीं पुरविली नाहीं, तर त्यांची तुमच्यावर गैरमर्जी होईल. त्या गैरमर्जीचे परिणाम टाळावयाचे कसे ?"

धोंडीबा म्हणाला, "हेंच, हेंच ! नबाबसाहेबांच्या गैरमर्जीचे परिणाम टाळावयाचे कसे हेंच कोडें आपल्यापुढें येऊन पडलें आहे. कोंडीबा, झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. पण तुमच्या उपदेशाप्रमाणें मी चाललों असतों, तर हें कोडें मजवर येऊन पडलें नसतें, आणि तें कोडें उलगडीत बसण्याचाही प्रसंग मला आला नसता. तुमची मुलगी रति हिच्यावर नबाबाची पापी नजर पडूं नये म्हणून तुम्ही तिला उचाट गांवीं तुमचा भाऊ जोतीबा ह्याच्याकडे पाठवून दिली, तेव्हां मी अरुंधतीला तिच्याबरोबर पाठवून द्यावें म्हणून तुम्ही मला फार आग्रह करीत होतां. पण अरुंधती माझी फार लाडकी म्हणून मी तिला तुमच्या रतीबरोबर पाठवून द्यावयाला कबूल झालों नाहीं. मी अरुंधतीला ह्या गडावर ठेवून घेतली. म्हणून मी संकटांत पडलों आहें. तुमची गोष्ट मीं तेव्हां ऐकली असती आणि मुलीला तुमच्या रतीबरोबर उचाटला किंवा दुसरीकडे कोठें पाठवून दिली असती, तर मी ह्या पंचाइतींत पडलों नसतों."

कोंडीबा सांत्वनाच्या स्वरानें म्हणाला, "धोंडीबा, झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. त्याबद्दल व्यर्थ खेद करूं नका. तुमच्या पुढें जें कोडें येऊन पडलें आहे, तें कसें सोडवावयाचें ह्याचा विचार केला पाहिजे. उशीर केला तर घात होईल."

याप्रमाणें संभाषण झाल्यावर ते दोघे साडू भाऊ कांहीं वेळ विचार करीत स्तब्ध बसून राहिले. नंतर कोंडीबा कांहीं बोलणार तों "धोंडीबा, धोंडीबा आहेत का घरांत ?" असे त्या दोघांच्या कानांवर शब्द पडले, तेव्हां कोंडीबाचें बोलणें तेवढ्यावरच थांबलें.

"धोंडीबा, धोंडीबा, खाविंदासाठीं एक चिनी चिटानें मढविलेली मशाल पाहिजे आहे. तयार आहे का ?" असे शब्द त्या दोघां साडूंच्या कानीं पडले

आणि हे शब्द उच्चारणाऱ्या पोऱ्याचा आवाजही त्यांनीं ओळखिला. कोंडीबा म्हणाला " हा भास्कराचा आवाज ! "

धोंडीबा म्हणाला, " होय. भास्करच माझ्याकडे मशाल मागावयासाठीं आलेला आहे. "

ह्याप्रमाणें धोंडीबा आणि कोंडीबा यांचीं प्रश्नोत्तरें होत आहेत तोंच भास्कर ते बसलेले होते त्याच खोलींत येऊन दाखल झाला.

परंतु भास्कराचें विशेष वर्णन आणि तो ज्या कारणानें धोंडीबाच्या घरीं या वेळीं आला होता, त्या कारणाचें स्पष्टीकरण आम्ही पुढच्या प्रकरणांत करूं.

---

## प्रकरण २ रें.

## भास्कराची बातमी.

भास्कर हा वयानें सोळा वर्षांचा असून तो दिसण्यांत एक दोन वर्षें अधिक वयाचा दिसत होता. तो वर्णानें निमगोरा होता. त्याचा चेहेरा भारी मोहक होता. तो अंगानें गुटगुटीत असून त्याचे अवयव प्रमाणशुद्ध होते. त्याचें कपाळ उंच, डोळे विशाळ आणि काळेभोर होते, आणि त्याच्या मिश्या जाडसर परंतु कमानदार असून अग्रांकडे निमुळत्या होत गेलेल्या होत्या. त्याचें नाक सरळ होतें, आणि जिवणी लहान होती, आणि बोलतांना त्याचे बारीक आणि हारीनें सारखे असलेले दांत दिसत ते मोत्याप्रमाणें स्वच्छ होते. एकंदरींत त्याच्या शरीराची आणि तोंडाची ठेवण गुटगुटीत आणि ठसठशीत होती.

ह्या वेळीं त्याचा पोशाख पोरवयाला साजेसा होता. त्याच्या पायांत एक सुशीची तंग विजार गुढघ्याखालीं थोडीशी उतरलेली असून अंगांत एक पांढरा स्वच्छ सदरा होता आणि त्याच्या डोक्यावर एक मोंगली टोपी मोठ्या अकडबाज रीतीनें डाव्या कानाकडे कललेली ठेवलेली होती. त्याच्या डाव्या हातांत एक भोवरा होता आणि उजव्या हातांत जाळी होती. ती तो एकदां उजव्या आणि एकदां डाव्या खांद्यावर पोरकटपणानें टाकीत होता.

हा मुलगा कोंडीबाच्या बहिणीचा मुलगा होता. तो नबाबाच्या खास तैनातीला असून रात्रीच्या वेळीं नबाबसाहेबांना मशाल दाखविण्याचें काम त्याच्याकडे असे.

दातेगडाच्या पायथ्याशीं कासेगांव म्हणून एक खेडेगांव आहे, तेथल्या दिवाकररावांचा भास्कर हा मुलगा होता. दिवाकररावांचें घर मोठें होतें, त्याच्या भोव-

तालचें आवारही खूप मोठें होतें, परंतु उत्पन्न अगदीं थोडें असल्याकारणानें दिवाकरराव आणि त्याची मावशी यांची त्या उत्पन्नावर जेमतेम गुजराण होऊं शकत असे. म्हणून भास्कर हा नेहमीं केंजळगडावर आपल्या मामाच्या देखरेखीखालीं शिक्षणासाठीं आणि पोट भरावयासाठीं आलेला होता.

अशा प्रकारें भास्करासंबंधाची थोडीशी माहिती आमच्या वाचकांना देऊन आम्ही आपलें कथासूत्र पुन्हा हातीं घेतों.

हा पोऱ्या खोलींत येतांच त्याची पोरकट वृत्ति एकदम विलुप्त झाली. तो सभ्यपणाच्या स्वरानें धोंडीबाला म्हणाला, "धोंडीबा, मला एक चिनी चिटानें मढविलेली मशाल तुमच्याकडून आणावयाला खाविंदानीं सांगितलें आहे. आजच रात्रीं ती पाहिजे आहे. तुमच्याजवळ असली मशाल तयार नसल्यास ती तयार करून द्या अशी नबाबसाहेबांची आज्ञा आहे."

आपल्या गंभीर संभाषणांत भास्कराच्या येण्यानें खंड पडला म्हणून धोंडीबा आणि कोंडीबा यांना थोडासा त्रास वाटला, परंतु तो पोऱ्या गंभीरपणाची मुद्रा करून अगदीं हलक्या स्वरांत म्हणाला, "धोंडीबा, मी मशालीचें केवळ निमित्त करून तुमच्याकडे आलों आहें. मला मशाल नको आहे. एक दुःखकारक गोष्ट मी तुम्हांला सांगावयाला आलों आहें. मला जी गोष्ट अगदीं सहजासहजीं समजली, ती तुम्हांला सांगून तुम्हांला सावध करावें म्हणून मी आलों आहें."

ज्या विषयासंबंधानें धोंडीबा आणि कोंडीबा हे दोघे जण विचार करीत बसले होते, त्याच विषयासंबंधानें जास्ती कांहीं तरी बातमी भास्कर सांगेल असें त्या दोघांस वाटलें, आणि त्याच्या आकस्मिक आगमनानें त्यांना प्रथम जो थोडा वेळ उद्वेग वाटला होता, तो साफ निरस्त झाला. भास्कर हा तरतरीत आणि चाणाक्ष आहे हें त्या दोघांनाही ठाऊक होतें, आणि तो निराधार असें कांहीं सांगणार नाहीं हें ते दोघे जाणून होते. या कारणास्तव ते दोघे जण भास्कर काय सांगणार आहे तें ऐकावयाला उत्सुक होऊन बसले.

भास्कर हलक्या स्वरांत म्हणाला, "धोंडीबा, आणि कोंडूमामा, आज दुपारीं नबाबसाहेब जाफरखानाला कांहीं हुकूम करीत होते. मी दाराशीं यदृच्छेनें गेलों असतां माझ्या कानीं अरुंधती हें नांव आलें. या गडावर तुमच्या मुलीशिवाय दुसऱ्या कोणाही मुलीचें हें नांव नाहीं म्हणून मी नबाबसाहेब तुमच्याच मुलीबद्दल जाफरखानाला कांहीं सांगत आहेत, असा तर्क केला, आणि तेथेंच थबकून राहिलों. नबाबसाहेबांनीं जाफरखानाला हुकूम केला तो मीं स्पष्ट ऐकला. तो हुकूम

हा, 'तूं आज प्रहरभर रात्रीं धोंडीबा मशालवाल्याच्या घरीं जाऊन त्याची मुलगी अरुंधती हिला गोडीगुलाबीनें ती नाहीं आली तर जबरीनें घेऊन ये. आज रात्रीं मी तिला आपल्या जनानखान्यांत घालणार.' हा हुकूम ऐकून जाफर 'अच्छा खाविंद' असें म्हणून एका मोठ्या दरवाज्यानें त्या दिवाणखान्यांतून बाहेर पडला. मी दुसऱ्या लहान दाराशीं उभा होतों, आणि मी त्या दोघांचें बोलणें ऐकत होतों असा त्यांना यत्किंचित् सुद्धां संशय आला नाहीं. त्यांचें संभाषण संपतांच मी योग्य संधी साधून तुम्हाला सूचना द्यावयाला आलों. आतां तुम्हाला जें कांहीं योग्य दिसेल तें करा."

भास्कर हा पोऱ्या गंभीर प्रसंगीं गंभीर होणारा, रंगेल प्रसंगीं रंगेल होणारा, वयस्कर माणसांच्या मंडळींत पोक्त वृत्ति स्वीकारणारा, लहान वयाच्या मंडळींत पोरकट वृत्ति स्वीकारणारा, असल्या कारणानें तो गडावर सर्वांस आवडत असे. धोंडीबा आणि कोंडीबा ह्या दोघांचा तो लाडका होता.

भास्करानें आणलेली बातमी ऐकून धोंडीबा आणि कोंडीबा ह्या दोघांची पांचांवर धारण बसली. आतां काय करावें हें त्यांना सुचेना. ते दोघे जण एकमेकांच्या तोंडाकडे पाहात कांहीं वेळ स्तब्ध बसले. तेव्हां भास्कर म्हणाला, "धोंडीबा आणि मामा, मी वेळांत वेळ काढून ही बातमी तुम्हाला द्यावयाला आलों. मला आतां संध्याकाळच्या मशालीसाठीं तेल मागावयाकरतां कारखानीसांच्या वखारींत जावयाचें आहे. तिकडे मी आतां जातों, आणि लोकांचा संशय टाळण्यासाठीं मला तुम्ही एक चिनी चिटानें मढविलेली मशाल द्या. ती माझ्या हातांत असली म्हणजे मी मशालीसाठींच तुमच्या घरीं आलों होतों असें लोकांना वाटेल."

धोंडीबानें त्याला पाहिजे होती तसली मशाल दिली. ती घेऊन भास्कर म्हणाला, "मी आतां तुम्हा दोघांचा निरोप घेतों."

असें म्हणून भास्कर तेथून उठूं लागला. उठतांना हलक्या आवाजानें तो म्हणाला, "अरुंधतीला गडाच्या बाहेर कोठें तरी नेऊन पोंचविण्याची तजवीज केली पाहिजे, असें मला वाटतें; तुम्ही दोघे जण विचार करून ह्या अडचणींतून कांहीं तरी वाट काढालच. परंतु तुम्ही जें कांहीं ठरवाल तें अगदीं लवकर ठरविलें पाहिजे. अरुंधती नबाबाच्या हातीं लागूं देतां कामा नये."

असें म्हणून भास्कर त्या खोलींतून बाहेर पडला. अंगणांत येऊन आणि चिनी चिटाची मशाल उंच धरून मोठ्यानें तो म्हणाला, "ही मशाल तर फार सुंदर आहे. हुजूर ही पाहून भारी खूष होतील."

हा उद्गार काढून भास्कर कारखानीसाच्या वखारीकडे जावयाला निघाला.

धोंडीबा आणि कोंडीबा चिंताग्रस्त होत्साते एकमेकांच्या तोंडाकडे पाहात बसले होते. तेव्हां लवकर कांहीं तरी विचार ठरविला पाहिजे म्हणून धोंडीबा म्हणाला, "कोंडीबा, मला वाटतें कीं भास्करानें सुचविल्याप्रमाणें अरुंधतीला गडाच्या बाहेर कोठें तरी सुरक्षित ठिकाणीं ठेविलें पाहिजे. तें ठिकाण कोणचें ठरवावें ?"

तेव्हां कोंडीबा म्हणाला, "मला वाटतें कीं अरुंधती आणि तिची आई या दोघींनीं विजापुरास तिच्या माहेरीं म्हणजे मोहित्यांच्या घरीं जाऊन राहावें. तेथें त्या नबाबाचा कांहीं इलाज चालणार नाहीं."

धोंडीबा म्हणाला, "मला हेंच योग्य वाटतें. पण त्या दोघी जणी विजापुरापर्यंत कशा जाऊं शकतील ? त्यांच्या बरोबर कोणी तरी पुरुष माणूस पाहिजे."

तेव्हां कोंडीबा म्हणाला, "तुमचा भाचा गजानन हा हल्लीं रिकामाच आहे. त्याला बरोबर देऊन अरुंधतीला आणि तिच्या आईला विजापुराकडे पाठवून द्या. तेथें त्या सुरक्षितपणें राहातील."

धोंडीबा म्हणाला, "कोंडीबा, तुम्ही सांगतां ती तजवीज मला सोयीची वाटते. आतां तपशील ठरवावयाचा इतकेंच काय तें राहिलें आहे."

त्यावर कोंडीबा म्हणाला, "असें करावें. त्या दोघी स्त्रियांनीं शिद्दी दरवाज्यानें गडाच्या बाहेर पडावें. गजाननानें दिल्ली दरवाज्यानें बाहेर पडावें. मग त्या तिघांनीं असेंखवली येथें मिळावें. तेथें त्यांनीं तीन घोडे भाड्यानें नशीरसिंगापासून मागून घ्यावे. अर्थात् नशीरसिंगाला हुडप म्हणून कांहीं रकम द्यावी लागेल. मग असेंखवलीहून त्या दोन स्त्रिया आणि गजानन या तिघांनीं विजापुराचा रस्ता धरावा, आणि शक्य तितक्या त्वरेनें त्यांनीं विजापुरास जावें. गजाननाला आणि त्या दोघींना रस्ता चांगला माहीत आहे. नबाबाच्या हुकमानें जाफरखान अरुंधतीला पकडावयाला आला म्हणजे तुम्ही त्याला कांहीं तरी बात झोकून द्या म्हणजे झालें. मग पुढचें पुढें. प्रसंगाला जसें योग्य दिसेल तसें करतां येईल. आतांच तें ठरवितां येणार नाहीं."

धोंडीबा म्हणाला, "होय. असें केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. नबाबानें त्या माणसांच्या पाठलागासाठीं जरी घोडेस्वार पाठविले, तरी माझ्या माणसांना दोन प्रहरांची आघाडी साधेल. शिवाय गजानन शूर आणि धूर्त आहे. वाटेंत जर त्याला कांहीं अडचणी आल्या, तर तो प्रसंगावधानानें त्यांतून निसटूं शकेल."

कोंडीबा म्हणाला, "होय. गजानन शूर आणि चतुर आहे. अरुंधतीला आणि तिच्या आईला त्याच्या स्वाधीन करावयाला कांहीं हरकत नाहीं, हाच विचार मुकरर करावा असें मला वाटतें."

धोंडीबा म्हणाला, "मलाही असेंच वाटतें. आपण आतां त्या तजविजीला लागूंच."

कोंडीबा म्हणाला, "आज शुक्रवार आहे. हा वार प्रयाणाला फारसा चांगला नाहीं. परंतु हीं माणसें निघतील तो समय कांहीं वाईट नाहीं. परंतु अगदीं गळ्याशीं येऊन बेतल्यावर तिथि, वार, नक्षत्र, वगैरे पाहाणें हा मूर्खपणा आहे. यासाठीं आपण केलेला बेत हाच मुकरर करूं. मी आतांच्या आतांच जाऊन गजाननाला घेऊन येतों. तोंपर्यंत तुम्ही त्या दोन स्त्रियांची निघण्याची तयारी करून ठेवा."

---

## प्रकरण ३ रें.

# नांदिवडें येथें मुक्काम.

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत शुक्रवारच्या तिसऱ्या प्रहराच्या सुमारास घडली. त्याच दिवशीं तिसरा प्रहर नुकताच उलटून गेला आहे अशा समयीं असोंखवली गांवांतून तीन घोडेस्वार बाहेर पडत आहेत. ह्या तीन घोडेस्वारांपैकीं दोन स्त्रिया आहेत, आणि एक पुरुष आहे. हीं तीन्ही माणसें घोड्यांवर मोठ्या ऐटदारीनें बसलीं आहेत. प्रत्येकाच्या कमरेला तरवार लटकत आहे. प्रत्येकाच्या हातांत लांब पल्याचा भाला धरलेला आहे, आणि प्रत्येक स्वाराच्या घोड्याच्या खोगीरावर पडशीच्या किंवा गांठोड्याचा रूपानें प्रवासांत लागणारे सामान ठेवलेलें आहे.

ह्या तीन स्वारांपैकीं जो पुरुष होता, तो वयानें सुमारें तीस वर्षांचा होता. त्याचा वर्ण काळसर होता, त्याचें कपाळ, डोळे, नाक, हनुवटी, वगैरे तोंडाचे अवयव ठसठशीत होते. त्याच्या डोळ्यांचें पाणी उग्र असून प्रेक्षकाच्या मनांत दरारा उत्पन्न करणारें होतें. त्याचा पोशाख प्रवासाच्या कामीं सोयीचा होता. त्याच्या डोक्यावर एक तांबडें मुंडासें, अंगांत एक तंग बंडी, आणि कमरेला एक सईलसर मांड चोळणा होता. कपड्यांनीं न आच्छादलेले जे त्याच्या

शरीराचे भाग होते, त्यांवरून तो हाडापेरानें मजबूत आणि शक्तिमान् असावा असें प्रकट होत होतें. हा स्वार धोंडीबाचा भाचा गजानन होता.

त्याच्या संरक्षणाखालीं प्रवासाला निघालेल्या दोन स्त्रियांपैकीं एक धोंडीबाची बायको मालिनी ही आणि दुसरी मुलगी अरुंधती होती. ह्या दोघी स्त्रिया वर्णानें गोऱ्या होत्या, आणि त्या दोघींच्या चेहेऱ्यांत विलक्षण साम्य होतें, आणि असें साम्य असणें हें निसर्गाच्या नियमाला विसंवादी असें नव्हतें. कारण, त्या दोघींच्यांत मायलेकींचें नातें होतें.

ह्या दोघी स्त्रियांनीं लुगड्याचे काचे मारले होते, आणि दोघीही स्त्रिया कमरेला लटकत असलेल्या तरवारींचा प्रसंगीं उपयोग करण्याची धमकदारी चेहेऱ्यावरून व्यक्त करीत होत्या.

मालिनीबाई ही वयानें तीस वर्षांची दिसत होती. तिचा वर्ण गोरा होता, आणि शरीरयष्टि उंच होती. तिचे डोळे विशाळ असून त्यांत फिकट निळें तेज चमकत होतें. तिचा चेहेरा ठसठशीत आणि गोड होता.

तिची मुलगी अरुंधती ही वयानें सोळा वर्षांची होती. तिचा गौरवर्ण केतकीच्या पानासारखा होता. तिचें कपाळ उंच होतें, डोळे विशाळ असून त्यांत निळ्या वर्णाची झाक मारीत होती. तिचें नाक लांब आणि सरळ होतें. तोंडाची जिवणी लहान होती आणि हनुवटी निमुळती असून तिच्यावर एक खळगी होती, ती तिच्या चेहेऱ्याची मोहकता वाढविण्याला कारणीभूत होत होती. तिचे दांत लहान लहान होते, आणि ते सरांत ओवलेल्या मुक्ताफलांप्रमाणें हारीनें असून तेजस्वी होते.

ह्या मायलेकींनीं ह्या वेळीं डोक्याच्या केशांचे आंबाडे घातलेले होते, आणि डोक्याला उन्हाचा ताप होऊं नये म्हणून काळ्या कटोरी टोप्या घातल्या होत्या.

हीं तीन माणसें विजापुराला जावयाला निघालीं होतीं हें वाचकांना ठाऊकच आहे.

अस्तेखवली हा गांव दोन तीन हाका मागें राही तोंपर्यंत ह्या प्रवाशांनीं साध्या चालीवर आपले घोडे चालविले होते. परंतु नंतर त्यांनीं आपल्या घोड्यांना टाचा मारून ते भरधांव फेकले. रस्ता साफ आणि सरळ असून त्यांच्या पूर्ण माहितीचा होता. शिवाय, दिवसाचा वेळ असल्या कारणानें रस्ता लांबपर्यंत त्यांच्या दृष्टिपथांत येत होता. ह्या तिन्ही माणसांना लहानपणापासून घोड्यावर बसण्याचा अभ्यास असल्यानें त्यांना कचरण्याचें कांहीं कारण नव्हतें, आणि

घोडेही शुद्ध अवलादीचे आणि ताज्या दमाचे असल्या कारणानें ते वायुवेगानें दौडत होते.

सूर्यास्तापर्यंत बारा कोशांची मजल मारून हे तीन प्रवासी जांबुळवाडीला येऊन पोंचले, परंतु ते गांवांत न शिरतां रस्त्याच्या जवळच असलेल्या मारुतीच्या देवळांत मुकामाला उतरले.

गजाननानें प्रथल विहिरीचें पाणी बायकांना आणून दिलें, आणि चूल करण्यासाठीं तीन धोंडे आणून दिले. मग तीन्ही घोड्यांना त्यानें पाणी दाखविलें. मग त्यांना खरारा करून त्यांचेपुढें गवत टाकलें.

यानंतर थोडक्या वेळांत मायलेकींनीं तिघांच्या साठीं भाकऱ्या भाजल्या. मग सर्वांचीं जेवणें झाल्यावर रात्रीं तीं तिघे जण त्या देवळांत निजलीं.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारीं सकाळीं पहाटेस उठून प्रातर्विधि आटोपून हीं तीन माणसें पुढच्या प्रवासाला लागलीं. दुपारीं एका सोयीच्या ठिकाणीं उतरून त्यांनीं स्वयंपाक केला. नंतर भोजनें उरकून आणि कांहीं वेळ विश्रांति घेऊन त्यांनीं आपला प्रवास पुढें चालविला. सूर्यास्ताच्या अगोदरच त्यांनीं नांदेड ह्या गांवीं मुक्काम करावा असें ठरविलें. त्यांना संध्याकाळपर्यंत आणखी तीन चार कोश त्याच दमांत मजल मारतां आली असती. परंतु पुढचा रस्ता जंगलांतून होता, आणि तेथें चोरट्यांचा उपद्रव असतो हें त्यांना ठाऊक होतें, म्हणून तिन्हीसांजांच्या वेळीं त्या जंगलांतून प्रवास करणें धोक्याचें होय असें त्यांनीं ठरविलें.

नांदेड गांवांत शिरल्यावर रात्रीच्या वसतीला कोठें जागा मिळाली तर पहावी म्हणून त्यांनीं एका घरांतील एका माणसाजवळ विनंती केली. हीं बालबोध माणसें आहेत, आणि त्यांत दोन स्त्रिया आहेत असें पाहून त्या माणसानें त्यांना आमच्या पडवींत उतरा असें उत्तर दिलें. तेव्हां त्या माणसाचे आभार मानून आमचीं प्रवासी माणसें तेथें रात्रीच्या मुक्कामासाठीं उतरलीं आणि आधल्या दिवसाच्या संध्याकाळच्या प्रमाणें दोन स्त्रिया स्वयंपाकाकडे लागल्या आणि गजानन तीन घोड्यांच्या आरामाच्या उद्योगाला लागला.

आमचे तीन प्रवासी ज्या घरांत मुक्कामाला उतरले होते, त्या घरांतील जो कर्ता पुरुष होता त्याचें नांव महेश्वर असें होतें. तो वयानें बावन वर्षांचा असून त्याची शेतकीवर चांगली गुजराण होत असे. त्याचा स्वभाव मनमिळाऊ होता. आणि तो नीतिमान् असून उपकारशील असल्याकारणानें सर्व गांवकऱ्यांचें त्याच्यावर प्रेम असे आणि त्याच्या विषयीं आदरबुद्धि असे. गांवांत तो पुढारी म्हणून गणला

जात असे आणि तंटेभांडणें वगैरेंचे निकाल लावण्याचें काम बहुधा त्याच्याचकडे देण्यांत येत असे. कारण, तो कोणत्याही पक्षाकडे न कलता सदसद्विवेकबुद्धीला योग्य दिसेल तोच निकाल करीत असे आणि तो निकाल दोन्हीही पक्षांना मान्य होत असे.

लहानपणीं महेश्वर हा पोटाच्या उद्योगासाठीं वांझणी येथें आपल्या बायकोसह राहात असे. परंतु त्याच्या वयाच्या छत्तीसाव्या वर्षीं त्याचा बाप मेल्या कारणानें तो वांझणीहून आपल्या नांदेड गांवीं राहावयास आला, आणि वडिलोपार्जित शेतकीवर गुजराण करूं लागला. त्याच्या वयाचीं अलीकडचीं पंधरा सोळा वर्षें नांदेड ह्याच गांवीं गेलेलीं होतीं. त्याच्या कुटुंबांत त्याची बायको आणि एक मुलगा अशीं दोनच माणसें असल्या कारणानें आणि त्याची शेतकी मोठी असल्याकारणानें त्याच्या संसाराला पुरून पुष्कळ पैसा उरत असे. महेश्वर हा उपकारशील माणूस असल्याकारणानें शिलकीचा पैसा तो परोपकाराच्या कृत्यांकडे लावीत असे.

त्याच्या बायकोचें नांव भवानी असें होतें. ती या वेळीं सुमारें अठेचाळीस वर्षांची होती. तीही पतीप्रमाणें मायाळू आणि उपकारशील होती.

ह्या दोघांच्या पोटीं संतान नव्हतें. परंतु तीं दोघें वांझणी या गांवीं राहात असतां त्यांना एक बिनवारशी मुलगा सांपडला होता. तोच ह्या संतानविहीन माणसांना पोटच्या पुत्राप्रमाणें प्रिय झाला. त्यांनीं योग्य प्रकारें त्याचें लालन, पालन, पोषण, आणि शिक्षण केलें.

हा मुलगा त्यांना देवाच्या दिवाळीच्या दिवशीं मिळालेला असल्याकारणानें महेश्वर आणि भवानी हीं दोघे जण त्याला देवजी नाना असें म्हणत असत. परंतु चारचौघांत तो पुंडरीक ह्या नांवानें संबोधिला जात असे.

गजानन, मालिनी, आणि अरुंधती, हीं तीन प्रवासी माणसें महेश्वराच्या घरीं मुक्कामाला आलीं तेव्हां महेश्वरच काय तो घरांत होता. त्याची बायको कांहीं परोपकाराच्या कामासाठीं कोठें गेलेली होती, आणि पुंडरीक शेतावर गेलेला होता.

आमचीं प्रवासी माणसें पुढच्या कामासाठीं वस्तूंची जुळवाजुळव करूं लागणार इतक्यांत भवानी घरीं परत आली. ती वयानें सुमारें अठेचाळीस वर्षांची होती. ती अंगानें लठ्ठ आणि थिलथिलीत होती. तिचा चेहरा वोजड पण सौम्य होता आणि तिच्या नजरेंत प्रेमळपणा भरलेला होता. ती काठीनें मध्यम उंचीची

होती, आणि तिचीं पावलें हळूं हळूं पडत होती. तोंडावरील सुरकुत्या आणि डोक्यावर मधून मधून दृग्गोचर होणारे पांढरे केश यांवरून तिच्यावर वार्धक्य आपला अंमल बसवूं लागलें आहे असें दिसत होतें. तिचे सर्व दांत मात्र चांगलें शाबूत असल्याकारणानें गालांना चपटेपणा अद्यापि आलेला नव्हता.

ती घरांत शिरतांच तिनें ह्या तीन प्रवासी माणसांकडे नजर करून पतीला विचारलें, " हीं माणसें आपल्या येथें मुक्कामाला उतरलीं आहेत काय ?"

पतीनें उत्तर दिलें, " होय; त्यांना काय हवें तें विचार. "

ही पतीची सांगणी ऐकून आणि स्वयंप्रेरणेनेंही भवानीबाई मालिनीला म्हणाल्या, " बाई, तुम्हाला कांहीं भांडें कुंडें लागल्यास मागून घ्या बरें कां. अगदीं संकोच करूं नका."

मालिनीनें उत्तर दिलें, "होय. आम्हाला कांहीं नको आहे पण कांहीं लागलें तर मागून घेऊं." इतक्यांत पुंडरीक,-जो शेतावर गेलेला होता,-तोही घरीं आला.

हा मुलगा वयानें वीस वर्षांचा होता. तो वर्णानें गोरा, काठीनें उंच, आणि अंगानें गुटगुटीत होता. त्याचा चेहेरा लांबोळ्या घाटाचा असून त्याचें कपाळ उंच होतें, त्याचे डोळे विशाळ आणि काळेभोर होते. त्याची नासिका लांब, सरळ आणि शेंड्याकडे थोडीशी बाकदार होती. त्याचे गाल गुलाबी वर्णाचे होते आणि हनुवटी किंचित् पुढें आलेली होती. त्याच्या वरच्या ओठावर अद्यापि मिसरुडाची लव विशेषशी दृग्गोचर होत नव्हती. त्याच्या तोंडाची जिवणी लहान होती आणि त्याच्या लाल ओंठाच्या आंत बारीक बारीक आणि पांढरे स्वच्छ दांत मोत्याप्रमाणें खुलून दिसत असत. त्याचा चेहेरा अत्यंत मोहक होता आणि त्याच्याकडे जो कोणी दृष्टी करी, त्याच्या मनांत त्याच्या विषयीं आत्मीयतेची भावना तत्काळ उत्पन्न होत असे.

ह्या वेळीं ह्या मुलाच्या कमरेला एक लांडा पंचा गुंडाळलेला होता. अंगांत एक तंग बंडी होती आणि डोक्यावर एक कटोरी टोपी होती. त्याच्या कमरेला एक खुरपें लटकत होतें.

ह्या मुलाच्या शरीराचे जे भाग वस्त्रानें आच्छादलेले नव्हते, ते तालमीच्या कामांनीं आणि मर्दुमकीच्या व्यवसायांमुळें मजबूत झालेले दिसत होते.

हा मुलगा शेतावरून घरीं परत आला तेव्हां त्यानें ह्या परकी माणसांकडे नजर करून महेश्वरला विचारलें, " बाबा, हीं माणसें मुक्कामाला येथें उतरलीं आहेत काय ?"

महेश्वरानें "होय" असें उत्तर दिलें. तेव्हां भवानी पुंडरीकाला म्हणाली, "जा देवजी, ह्या बाईंना एक पाण्याची घागर भरून आणून दे. आणखी कांहीं भांडें पाहिजे लागलें तर दे. मी म्हशीचें दूध काढावयाला जातें. येथें त्यांना एक समयी लावून आणून दे. आतां आंधेर पडूं लागेल. त्यांना आपल्या परसांतल्या केळीचीं चार पांच पानें कापून आणून दे. मी जातें."

घरांतील तीन माणसें आणि प्रवासी तीन माणसें हीं सायंकाळच्या आपआपल्या उद्योगाला लागलीं. प्रवासी माणसें जेवायला बसणार तों भवानीबाईनें त्यांना लोणचें, भाजलेले पापड, दूध, आणि ताक हे पदार्थ आणून दिले.

महेश्वर, त्याची बायको भवानीबाई, आणि मुलगा पुंडरीक, यांचीं रात्रीचीं जेवणें होत आहेत तों इकडे मालिनीबाई, गजानन आणि अरुंधती यांचीं जेवणें होत होतीं. जेवणें होऊन आवराआवर, झाकपाक झाल्यानंतर हीं सहा माणसें निजावयाच्या अगोदर गप्पा मारावयाला बसलीं.

महेश्वर आणि त्याची बायको आणि मुलगा हीं तिन्ही माणसें साधीं, उपकारशील आणि सभ्य चालीरीतीचीं असल्याकारणानें त्यांच्याशीं गप्पागोष्टी करावयाला ह्या तीन प्रवासी माणसांना बिलकूल संकोच वाटला नाहीं.

महेश्वर, पुंडरीक आणि गजानन अशीं तीन पुरुष माणसें ओटीवर गप्पा मारावयाला बसलीं. भवानी, मालिनी आणि अरुंधती अशा तीन स्त्रिया माजघरांत बसल्या.

प्रथम एकमेकांनीं एकमेकांचीं नातीं व नांवें विचारून घेतलीं.

माजघरांत बसलेल्या तीन स्त्रियांच्या संभाषणाचा आणि ओटीवर बसलेल्या तीन पुरुषांच्या संभाषणाचा मथितार्थ एकच असल्याकारणानें आम्ही पुरुषांचें संभाषण देतों, आणि तें वाचकांना पुढील प्रकरणीं कळेल.

---

## प्रकरण ४ वें.

## नांदेड येथें रात्रींच्या गप्पा.

महेश्वर, नाना, आणि गजानन, हे तिघे जण ओटीवर सुखासीन झाल्यावर महेश्वरानें गजाननाला विचारलें, " काल रात्रींचा मुक्काम तुम्हीं कोठें केला ? "

त्यावर गजानन म्हणाला, "काल रात्रीं आम्ही जांभूळवाडीस मारुतीच्या देवळांत उतरलों होतों. तेथून आज पहाटेस उठून संध्याकाळच्या मुक्कामाला येथें आलों आहों."

महेश्वरानें विचारलें, "तुम्ही कोठून निघालां आणि तुम्हाला जावयाचें आहे कोणच्या गांवाला ?"

तेव्हां गजानन म्हणाला, "काल तिसऱ्या प्रहरीं आम्ही अक्षेखवलीहून निघालों आणि आम्हाला विजापुरास जावयाचें आहे. मी ह्या माझ्या मामींना आणि ह्या मामेबहिणीला विजापुरास मामींच्या माहेरीं पोंचवून परत अक्षेखवलीला जाणार आहें."

महेश्वर म्हणाला, "तुम्ही आजचा संध्याकाळचा मुक्काम आमच्या नांदेडगांवीं केला हें फार उत्तम केलें. कारण, तुम्ही आपला प्रवास थांबविला तेव्हां सूर्य मावळावयाला बराच अवकाश होता आणि तुम्ही मनांत आणलें असतें तर रात्रींच्या मुक्कामाला सहज सागरला जाऊन पोंचलां असतां. पण तुम्ही येथेंच थांबला हें बरें केलें. कारण, नांदेडपासून सागरपर्यंतचा रस्ता दाट जंगलांतून आहे आणि चोरांचा भारी उपद्रव आहे."

गजानन म्हणाला, "होय, आम्हीं असेंच ऐकिलें होतें म्हणूनच तिन्ही सांजा त्या जंगलांतून प्रवास करण्याचें आम्हीं धाडस केलें नाहीं."

महेश्वर म्हणाला, "तुम्ही केलें तें उत्तम केलें. कारण, एकट्या दुकट्या प्रवाशाला त्या जंगलांतून जाणें म्हणजे आपलें उद्यांवरचें मरण आजच ओढून आणण्यासारखें आहे. त्या जंगलांत चोरांचे हेर इकडे तिकडे वावरत असतात आणि कोणी सावज दिसलें तर सगळे चोर क्षणांत एकत्र जमून त्या दुर्दैवी मुशाफरावर हल्ला करून त्याला लुटतात आणि त्याला जीवें मारतात. ते लोक मोठे भयंकर आहेत."

गजाननानें विचारलें, "पादशहा ह्या गोष्टीचा कांहीं बंदोबस्त करीत नाहीं काय ?"

त्यावर महेश्वर म्हणाला, "मीं असें ऐकिलें आहे कीं ह्या चोरट्यांची संख्या सुमारें पंधरा वीसांपर्यंत आहे. चोरलेलें हें द्रव्य हे चोर प्रथम उंबरवाडी येथें नेऊन बंडोबा म्हणून एक श्रीमंत मनुष्य आहे त्याच्या पुढें ठेवतात. हा बंडोबा दिसण्यांत जितका सभ्य, साळसूद, नीतिमान् दिसतो तितकाच तो अंतर्यामीं पातकी आणि लबाड आहे. चोरांनीं आणलेले दागिने मोडणें, त्यांचीं रूपांतरें करणें, ते आटविणें, हीं कामें तो मोठ्या सफाईनें करतो. लुटून आणलेल्या ऐवजाचा कांहीं ठराविक भाग तो चोरट्यांना देतो, कांहीं ठराविक भाग स्वतःसाठीं

ठेवून घेतो, आणि कांहीं ठराविक भाग जो विजापुरच्या दरबारांतील कांहीं विशिष्ट माणसांना चारतो. त्यामुळें ह्या चोरांचा नायनाट आजपर्यंत केला गेला नाहीं. राज्यांतील ज्या अधिकाऱ्यांनीं रयतेच्या जीविताचें आणि मालमत्तेचें संरक्षण करावयाचें, तेच जर चोरांना सामील झाले, तर आकाशच कोसळलें असें म्हटलें पाहिजे. आईनें मुलाला दूध पाजलें नाहीं आणि राजानें प्रजेचें रक्षण केलें नाहीं, तर गाऱ्हाणें न्यावयाचें कोणाकडे? हे चोरटे सगळे मुसलमान आहेत असें मीं ऐकलें आहे. पण उंबरवाडीचा बंडोबा हा हिंदू असून मुमलमानांच्या चोऱ्या पच-विण्याचें काम करतो हें विलक्षण आहे."

गजाननानें विचारलें, "पण पादशहा ह्या मुसलमान चोरट्यांचा बंदोबस्त करण्याची कांहीं देखील तजवीज करीत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे."

महेश्वर म्हणाला, "हे चोरटे मुसलमान आहेत, आणि त्यांचा बंदोबस्त कर-ण्याचें काम ज्यांचेकडे तेही मुसलमानच! मग काय विचारतां? खरा न्याय होणें शक्यच नाहीं. अनेक वेळां ह्या वाटमाऱ्यांच्या टोळींतील कांहीं इसमांना हिंदू मुशाफरांनीं पकडून बादशहाच्या काजीपुढें उभें केलें आहे. परंतु मुसलमान ठरले साव आणि हिंदू मुशाफरच ठरले वाटमारे! आणि ह्या हिंदू मुशाफरांनाच तीन चार वर्षांची कैद झाली, आणि कित्येकांना तर फाशीचीही शिक्षा झाली. ह्या मुसलमानी राज्यांत न्याय नाहीं, नीति नाहीं, माणुसकी नाहीं, देवाची भीति नाहीं, जीविताला, अब्रूला, संपत्तीला सुरक्षितपणा नाहीं, कांहीं नाहीं! मुसल-मानांनीं हवीं तीं अनन्वित कृत्यें हिंदूंच्या विरुद्ध करावीं आणि दाद लागूं नये! असा काळ हल्लीं आपणां हिंदूंवर ओढवला आहे. देवा, आम्हां हिंदूंना तारावयाला एकादा अवतार घे! ही स्थिति आम्हां हिंदूंना अगदीं असह्य झाली आहे!"

ह्याप्रमाणें दुःखाचा उद्गार काढून महेश्वरानें क्षणभर डोळे आकाशाकडे करून मनांत देवाची प्रार्थना केली. आणि नंतर "देवा, आम्हा हिंदूंवर दया कर आणि आम्हांला ह्या अविंधांच्या जुलमापासून सोडीव" असा करुणाचा उद्गार काढला. मग एक दीर्घ उसासा टाकून तो गजाननाला म्हणाला, "हे अविंध हिंदूंचा असा छळ करीत आहेत, तरी कित्येक हिंदू त्यांना सामील झाले आहेत, त्यांना मदत करीत आहेत, त्यांचा अमल चिरस्थायी राहावा म्हणून खटपटी करीत आहेत, त्यांची तरफदारी करीत आहेत, आणि हें सर्व कशाकरतां? तर बादशहाकडून मिळालेल्या आसामीबद्दल, मिळालेल्या मनसबदारीबद्दल किंवा शिलेदारीबद्दल उतराई होण्याकरतां. कुतऱ्याच्या तोंडावर भाकरीचा तुकडा टाकला

असतां तें कुत्रें शेपटी वेंगाडून आपली कृतज्ञता दाखवितें, त्याप्रमाणें आपले हिंदूलोक थोड्याशा पैशासाठीं किंवा एखाद्या किताबासाठीं किंवा एखाद्या अधिकारासाठीं ह्या परदेशी, परधर्मी, अनीतिमान्, जुलमी, पक्षपाती अविंधांच्या ताटाखालचीं मांजरें होऊन राहिले आहेत ! काय चमत्कार ! ”

गजानन यावर म्हणाला, “ महेश्वरबावा, तुम्ही म्हणतां तशी आपणा हिंदूंची स्थिति आज आहे ही खरी गोष्ट आहे. परंतु प्रत्येक गोष्टीला कांहीं तरी मर्यादा असतेच. त्या दृष्टीनें पाहिलें असतां हा यवनांचा जुलमी अमल फार दिवस टिकणार नाहीं. देवाला डोळे आहेत. तो सर्व कांहीं पहात आहे. कृष्णानें शिशुपालाला मारलें, पण केव्हां ? त्याचे शंभर अपराध भरले तेव्हां. त्याप्रमाणें ह्या अविंधांचे शंभर अपराध भरले म्हणजे एकादा अवतारी पुरुष निर्माण होईल आणि ह्या अविंधांचा नायनाट करून टाकील. तुम्ही दुःखी कष्टी होऊं नका. आपणां हिंदूंना सुखाचे दिवस दिसतील अशी आशा बाळगून असा. मला स्वतःला तर अशी आशा आहे.”

त्यावर महेश्वर म्हणाला, “ गजाननराव, तुम्ही म्हणतां तें खरें आहे. कोणी तरी अवतारी पुरुष निर्माण होईल आणि ह्या अविंधांच्या छळांतून आपल्याला सोडवील, असा माझाही भरंवसा आहे. देव दयाळू आहे, तो आपणां हिंदूंकडे दयार्द्र दृष्टीनें पाहात आहे, असें माझेंही मत आहे; पण ह्या अविंधांचे अत्याचार पाहिले आणि ऐकिले म्हणजे माझ्या अंगाचा तिळपापड होऊन जातो. माझे मनोविकार अनावर होऊन जातात आणि माझ्या मुखांतून वैतागाचे उद्गार बाहेर पडतात. असो. कांहीं दिवस आपण धीर धरला पाहिजे, आणि देव आपली उपेक्षा करणार नाहीं अशी श्रद्धाही मनांत बाळगली पाहिजे. आणि, गजाननराव, माझी अशी श्रद्धा आहेही. कारण, मीं असें ऐकिलें आहे, कीं शिवाजी ह्या नांवाचा एक मराठा मुलगा वयानें सतरा अठरा वर्षांचा असून ह्या परदेशी परधर्मी अविंधांच्या अन्यायी, अमानुष आणि जुलमी अमलांतून हिंदूंना सोडविण्यासाठीं खटपट करीत आहे. हिंदू लोकांना हिंदुस्थानांत सुखानें भाकरी खातां यावी असा तो प्रयत्न करीत आहे असें मीं ऐकिलें आहे.”

त्यावर गजानन म्हणाला, “ आमच्या केंजळगडावरही शिवाजीची बातमी आलेली आहे. परंतु त्या बातमीवर कोणाचाच भरंवसा बसत नाहीं. मुसलमान लोक असें म्हणत आहेत कीं ‘मुसलमान राजांना दहशत बसावी, त्यांनीं हिंदू लोकांना मुसलमान लोकांप्रमाणें वागवावें, हिंदू लोकांवर झजिया सारखे कर

बसवूं नयेत, ह्या उद्देशांनीं लबाड हिंदूंनीं ही बातमी उठविलेली आहे. ही बातमी निवळ खोटी आहे. ह्या बातमीनें आम्ही मुसलमान लोक कांहीं फसणार नाहीं.' हिंदू लोकसुद्धां ही शिवाजीची बातमी खोटी असली पाहिजे असें म्हणत आहेत. कोणी लोक म्हणतात कीं मुसलमानी अमल इतका दृढमूल झालेला आहे कीं तो उलथून पाडणें ही अगदीं अशक्य गोष्ट आहे. कोणी म्हणतात शिवाजी हा काल्पनिक पुरुष आहे. कोणी म्हणतात तो खरा पुरुष असणें अशक्य नाहीं. शिवाजीचें नांव कानीं पडलें म्हणजे कोणी तिरस्कारानें हसतात, कोणी शिवाजीची कींव करतात, कोणी म्हणतात शिवाजी जर खरोखरीचा कोणी पुरुष असला तर चार दिवस टुरटुर करील आणि मग स्वस्थ बसेल. अशा प्रकारें शिवाजीबद्दल अनेक लोकांचीं अनेक प्रकारचीं मतें आहेत. पण खरी वस्तुस्थिति काय आहे ती कोणालाच ठाऊक नाहीं. मला स्वताला असें वाटतें कीं शिवाजी ही अस्तित्वांत नसलेली व्यक्ति आहे. रावणाच्या जाचांतून मानवी जातीला सोडविण्यासाठीं विष्णूनें रामावतार घेतला, कंसाच्या छळापासून मानवी जातीला सोडविण्यासाठीं विष्णूनें कृष्णावतार घेतला, त्याप्रमाणें ह्या मुसलमानांच्या जुलमापासून आपणा हिंदूंना सोडविण्यासाठीं कोणीतरी देवानें अवतार घ्यावा अशी हिंदूंची उत्कट इच्छा आहे. हीच उत्कट इच्छा परमावधीला जाऊन पोंचली म्हणजे ती सफळ झाली असें आपणाला वाटूं लागतें. जी केवळ इच्छा असते तिच्यावर सत्यत्वाची भ्रांति होते, आणि ती सत्य वस्तु आहे असें आपण म्हणूं लागतों. त्याचप्रमाणें ही शिवाजीची कल्पना केवळ भ्रांतिरूपच असली पाहिजे असें मला वाटतें."

त्यावर महेश्वर म्हणाला, "तुम्हीं म्हणतां तसेंच असेल असें मला वाटतें. आकाशांत आपण एकाद्या ढगाकडे तो उंट आहे अशा ग्रहानें दृष्टि लावून पाहूं लागलों, म्हणजे आपणाला तो खरोखरीं उंटासारखा दिसूं लागतो. त्याची वाकडी मान, त्याचें तोंड, त्याचे पाय, हे सर्व अवयव त्या ढगामध्यें आपणाला दिसतात. त्या ढगावर हत्तीची कल्पना बसविली कीं आपणाला सोंड, गंडस्थळ, अवजड देह, हीं दिसूं लागतात. त्याप्रमाणें हिंदूंना मुसलमानाच्या जाचांतून सोडविण्यासाठीं कोणी तरी देवानें अवतार घ्यावा अशी एका हिंदूच्या मनांत उत्कट इच्छा झाली असावी, इच्छेचा जोर कल्पनेवर होऊन त्या कल्पनेनेंच शिवाजी हा पुरुष अस्तित्वांत आणला असेल. हें तुमचें मतच मला संभवनीय दिसतें. खरोखरीं शिवाजी असा कोणी पुरुष नसावा असें मला वाटतें. खरें काय असेल तें असो. पण

गजाननराव, आतां रात्र फार झाली आहे. तुम्ही माणसें दमून भागून आलेलीं आहां, आणि उद्यां तुम्हाला मोठी मजल मारावयाची आहे. आतां तुम्ही निजा. उद्यां सकाळीं सूर्योदयाला उठून तुम्ही थोडीशी न्याहारी करून मग आपला प्रवास पुढें चालवा. तुम्हाला जंगलाच्या वाटेच्या बाहेर पडेपर्यंत पोंचवावयाला मी स्वतां येईन किंवा माझा नाना येईल. आम्हां दोघांनाही ती वाट चांगली माहीत आहे. मुषाफरांचा समुदाय मोटा असला म्हणजे चोरटे दबकतील. आणि राव, ह्या जंगलाच्या वाटेनें नेहमींच दगे होतात अशांतली गोष्ट नाहीं. तुम्ही भिऊं नका. पण सावधगिरीनें वागावें हें शाहाणपणाचें असतें. तुमच्या सोबतीला उद्यां मी येईन किंवा हा नाना येईल. ”

तेव्हां पुंडरीक म्हणाला, “ बाबा, तुम्ही जाऊं नका. मी जाईन, मला हौस आहे. ”

तेव्हां महेश्वर म्हणाला, “ कांहीं हरकत नाहीं. तूं जा. तूं शूर आहेस आणि अशा प्रवाशांच्या सोबतीला तूं अनेक वेळां गेलेला आहेस आणि चोरट्यांना पळवून लावलेलें आहेस. ”

---

## प्रकरण ५ वें.

# धोंडीबाला कैद.

गजानन, मालिनी आणि अरुंधती हीं तीन माणसें शनिवारीं संध्याकाळीं नांदेड गांवीं महेश्वराच्या घरीं मुक्कामाला उतरलीं, ही हकीकत वाचकांना आम्हीं सादर केली आहे. आतां खुद्द केंजळगडावर तोंपर्यंत काय काय वृत्तान्त घडला तो आपण पाहूं.

शुक्रवारीं तिसऱ्या प्रहरीं मालिनी, अरुंधती आणि गजानन, अशीं तीन माणसें विजापुरास जावयाच्या उद्देशानें केंजळगडावरून पळालीं; ही गोष्ट अत्यंत साधेपणानें आणि बिनबोभाट झालेली असल्याकारणानें तिची गंधवार्ता देखील गडावर कोणाला नव्हती. अर्थात् ती पलायनाची गोष्ट नबाबाला कळलेली नव्हती.

नबाबसाहेबांच्या हुकमाप्रमाणें जाफरखान हा बरोबर दहा सशस्त्र मुसलमान शिपायी घेऊन रात्र प्रहरभर चढली होती अशा समयीं अरुंधतीला पकडून नेण्यासाठीं धोंडीबाच्या घरापुढें येऊन उभा राहिला. त्यानें धोंडीबाला नबाबसाहे-

बांचा हुकूम कळविला आणि अरुंधतीला आपल्या स्वाधीन कर म्हणून त्याला सांगितलें. असा प्रकार घडावयाचा आहे ही गोष्ट धोंडीबाला भास्कराकडून आगाऊच कळलेली असल्याकारणानें त्याला आश्चर्य वाटलें नाहीं. परंतु हा हुकूम ऐकून आपणांस आश्चर्य वाटत आहे असा बहाणा करून धोंडीबा जाफराला म्हणाला, " जाफरखानसाहेब, माझ्या मुलीला नबाबसाहेबांनीं कशासाठीं बोलावलें आहे ?"

त्यावर जाफर,—जो केवळ सांगकाम्या होता,—तो म्हणाला, " धोंडीबा, तें मला ठाऊक नाहीं. नबाबसाहेबांनीं तिला घेऊन ये असा मला हुकूम केल्यावरून मी तिला घेऊन जावयाला आलों आहें. तर तिला माझ्या स्वाधीन करा. मी तिला नेऊन नबाबसाहेबांपुढें उभी केली म्हणजे मी मोकळा झालों."

तेव्हां धोंडीबा म्हणाला, " पण जाफरखान, मला ह्या गोष्टीची गंधवार्ताही नाहीं. नबाबसाहेबांनीं माझ्या मुलीला कशासाठीं बोलाविलें आहे ?"

जाफर म्हणाला, " तें मला ठाऊक नाहीं. परंतु माझा तर्क असा चालतो कीं तुमची मुलगी फार सुंदर आहे. तिला ते जनानखान्यांत सामील करणार असतील."

त्यावर धोंडीबा रागानें म्हणाला, " नबाबसाहेबांचें हें वर्तन गैरशिस्त आहे. माझी मुलगी नबाबसाहेबांना अर्पण करावयाला मी कबूल नाहीं. आणि शिवाय ती विजापुराकडे आपल्या आजीच्या बोलावण्यावरून गेली आहे. ती येथें नाहीं. ती विजापुराकडे गेली असें तुम्ही नबाबसाहेबांना जाऊन सांगा."

जाफर म्हणाला, " आम्हाला तुमचें घर दाखवा. अरुंधती आम्हाला सांपडली तर आम्ही तिला घेऊन जाऊं."

धोंडीबानें त्याचें म्हणणें कबूल केलें, आणि जाफरला त्यानें आपल्या घरांत सर्व ठिकाणीं हिंडविलें. त्याला अर्थात् अरुंधती कोठेंही दिसली नाहीं. मग तो धोंडीबाला म्हणाला, " अरुंधती आम्हाला सांपडली नाहीं असें मी नबाबसाहेबांना जाऊन सांगतों."

धोंडीबाच्या घरांत अरुंधती सांपडली नाहीं म्हणून जाफरखानाला राग आला नाहीं, आश्चर्य वाटलें नाहीं, किंवा त्याची निराशाही झाली नाहीं. कारण, तो खातलेल्या अन्नाचा आणि सांगितलेल्या कामाचा मनुष्य होता. तो मुकाट्यानें तेथून आपलीं माणसें घेऊन निघाला.

तो धोंडीबाच्या घरापासून बराच दूर गेला तों कोंडीबा,– जो जवळच पाळतीवर होता,– तो हळूच घरांत शिरला. त्याला धोंडीबानें घडलेली हकीगत सांगितली. तेव्हां कोंडीबा म्हणाला, "धोंडीबा, असा प्रकार होणार हें आपणांला ठाऊकच होतें. आतां पुढें काय होतें तें पाहूं. सन्मार्गानें आपण चालत असतां आपणांवर कांहीं संकटें आलीं, तरी तीं सोसावयाला आपणाला धैर्य असतें. आपण खचून जात नाहीं. आपले नबाबसाहेब दुष्ट, पापी, लोभी, व्यभिचारी, क्रूर, असे आहेत. त्यांची अशी समजूत आहे कीं जगांतील सर्व सुंदर स्त्रिया आपल्या उपभोगासाठींच आहेत. लोकांनीं निढळाच्या घामानें मिळविलेले पैसे सारे आपल्या चैनीचे पदार्थ विकत घेण्यासाठीं किंवा आपल्या संदुका भरण्यासाठीं. कोणाही स्त्रीचा उपभोग घेण्याचा हक्क आपणाला अल्लानें दिला आहे असें मुसलमान अधिकारी समजतात. हवें त्याला बाटविण्याचा, हवें त्याचा जीव घेण्याचा, हव्या त्या देशांत किंवा प्रांतांत घुसून तेथील लोकांना गुलामांप्रमाणें वागविण्याचा हक्क अल्लानें आपणाला दिला आहे असें हे मुसलमान लोक समजतात. परंतु ही स्थिति फार दिवस टिकावयाची नाहीं असा माझा ग्रह झालेला आहे. परमेश्वर मानवी अवतार धारण करून आपणा हिंदूंना ह्या मुसलमानांच्या जाचांतून खास सोडवील आणि श्रीशंकरानें मानवी देह धारण केला आहे आणि त्यानें मावळांत आपलें अवतारकृत्य सुरू केलें आहे अशीही बातमी आपण ऐकिली आहे, ती खरी ठरो. मी फार वाहवत गेलों. असो. पण आतां धोंडीबा, तुम्ही धीर सोडूं नका. परमेश्वरावर हवाला ठेवून असा."

यावर धोंडीबा कांहीं बोलणार होता, इतक्यांत "धोंडीबा! धोंडीबा!" अशा कोणी हाका मारीत असलेल्या त्यांच्या कानीं आल्या. तेव्हां धोंडीबा म्हणाला, "कोंडबा, हा जाफरखानाचा आवाज!"

कोंडीबा म्हणाला, "होय, हा जाफरखानाचाच आवाज. तो पुन्हां कशाला आला आहे कोण जाणे. तुम्ही देवावर हवाला ठेवून असा. मी मागच्या दारानें बाहेर पडतों."

असें म्हणून कोंडीबा हळूच मागच्या दारानें पळून जाऊन जवळ पास पाळतीवर राहिला. इकडे जाफर,–तो जाफरच होता,–एक सारखा "धोंडीबा धोंडीबा" अशा हाका मारीतच होता. तेव्हां धोंडीबा ओरडून म्हणाला, "आलों, खानसाहेब आलों!" असें बोलून धोंडीबा बाहेर आला. त्याला पाहातांच जाफर म्हणाला, "धोंडीबा, तुमची मुलगी अरुंधती हिला नबाबसाहेब जनानखान्यांत घालणार

होते. हा त्यांचा उद्देश सफल होऊं देऊं नये ह्या दुष्ट बुद्धीनें तुम्हीं आपल्या मुलीला विजापुराकडे पाठवून दिलें. असा तुम्हीं गुन्हा केला आहे, असें नबाबसाहेबांना वाटत आहे. तुम्ही नबाबसाहेबांच्या सुखविलासाच्या आड आलां, हा तुम्हीं भयंकर गुन्हा केला आहे म्हणून नबाबसाहेबांनीं तुम्हांला कैदेची सजा ठरविली आहे, आणि ही सजा तुमच्या गुन्ह्याच्या मानानें अत्यल्प आहे असेंही तुम्हाला सांगावयाचा आम्हाला नबाबसाहेबांनीं हुकुम केला आहे. आम्ही तुम्हाला गिरफदार करतों. चला आमच्या बरोबर. ”

हें सर्व भाषण धोंडीबानें मुकाट्यानें ऐकून घेतलें. त्याला आश्चर्य मुळींच वाटलें नाहीं. कारण, असले प्रकार केंजळगडावर हरहमेषा घडत असत. तो शांतपणानें जाफरला म्हणाला, “ जाफरसाहेब, मी सन्मार्गानें चालत असतां जर नबाबसाहेब मला गुन्हेगार ठरवीत असतील आणि माझ्या मुलीची इज्जत राखण्याचा मीं प्रयत्न केला म्हणून जर मला कैदेची सजा नबाब साहेब फर्मावीत असतील, तर मी ती सजा भोगावयाला तयार आहें. परंतु जाफरसाहेब, माझ्या मागें माझ्या बायकोची आणि मुलीची तजवीज करण्याची कामगिरी मी आपल्या एका मित्रावर सोंपविणार आहें, त्याला आपण परवानगी द्यावी. ”

तेव्हां जाफर म्हणाला, “ ती परवानगी मी तुम्हाला देतों. तुम्ही कोणाला भेटूं इच्छितां ? ”

धोंडीबा म्हणाला, “ माझे मित्र कोंडीबा हे येथून जवळच राहातात, त्यांना बोलावून आणण्याची आपण मेहेरबानी केली तर मी त्यांना चार गोष्टी सांगेन.”

जाफरनें एका शिपायास कोंडीबाला बोलावून आणावयाचा हुकूम केला. कोंडीबा जवळपास घिरट्या घालीतच होता. तो जाफरच्या शिपायांस लवकरच आढळला. त्याला त्या शिपायानें जाफरपुढें आणून उभें केलें. तेव्हां जाफर धोंडीबाला म्हणाला, “ धोंडीबा, हे पहा तुमचे मित्र कोंडीबा येथें आले आहेत. त्यांना काय निरोप सांगावयाचा असेल तो सांगा. तुमचें बोलणें संपे तोंपर्यंत मी आणि हे माझ्या हाताखालचे शिपायी जरा दूर बसतों. ”

जाफर आणि त्याचे शिपायी दूर गेल्यावर धोंडीबा आणि कोंडीबा यांनीं एकमेकांकडे डोळे भरून पाहिलें. धोंडीबाची मुद्रा अंतर्यामचें दुःख व्यक्त करीत होती. कोंडीबाची मुद्रा गंभीर होती. कोंडीबाच्या मुखावर अश्रुपूर्ण दृष्टि लावून धोंडीबा म्हणाला, “ कोंडीबा, तुम्ही माझे लहानपणापासूनचे मित्र आहां. माझी स्थिति रीति तुम्हाला पूर्णपणें माहीत आहे. माझ्या माणसांवर माझें किती प्रेम

आहे हें तुम्ही जाणतच आहां. तर माझ्यामागें तुम्ही त्यांचें योगक्षेम पहा अशी मी तुम्हाला प्रार्थना करतों. माझी कैद किती दिवस मला भोगावी लागेल हें मला ठाऊक नाहीं, किंवा नबाबसाहेब मला कड्यावरून लोटून देण्याची सजा देतील कीं काय हेंही मला ठाऊक नाहीं. परंतु माझें कांहीं बरें वाईट झालें, तर तुम्ही माझ्या ठिकाणीं आहां असें समजून माझ्या माणसांकडे पहा. यापेक्षां अधिक मी तुम्हांला काय सांगूं ? मी जातों. सन्मार्गानें मी चालत असतां जर मजवर हें संकट येत असलें, तर तें माझ्या पूर्वकर्माचें फळ आहे असें मी समजतों."

त्यावर कोंडीबा म्हणाला, " धोंडीबा, तुम्ही मला सांगून ठेवलें नसतें तरी मी तुमच्या कुटुंबाचें योगक्षेम चालविलेंच असतें. तुम्ही कांहीं काळजी करूं नका. आणखी कांहीं तुम्हांला सांगावयाचें आहे काय ?"

त्यावर धोंडीबा म्हणाला, "आणखी तुम्हाला असें सांगायाचें आहे, कीं तुम्ही आतां ह्या गडावर फार दिवस राहूं नका. येथील नोकरी सोडून देऊन बायकामुलांसह कोणच्या तरी हिंदू राजाच्या मुलखांत जाऊन तेथलेच कायमचे रहिवासी होऊन रहा. तसेंच तुमच्या आणि माझ्या नात्याचे जवळचे किंवा दूरचे जे जे कोणी लोक ह्या केंजळगडावर राहात असतील, त्यांनाही येथून दुसरीकडे कोठें तरी रहावयास जाण्याचा सल्ला द्या. मुसलमानांच्या रियासतींत हिंदूंना सुखानें कधींच भाकरी खातां यावयाची नाहीं."

कोंडीबा म्हणाला, " माझ्याही मनांत तसेंच येत आहे, आणि मी तसेंच करणार आहें."

धोंडीबा म्हणाला, " तुम्हांला आणखी असें सांगतों कीं एकादा शूर मराठा पाहून अरुंधतीचें त्याच्याशीं लग्न करून द्या. मी जातों."

असें बोलत असतां धोंडीबाच्या डोळ्यांतून अश्रू गळत होते. त्याला कोंडीबा म्हणाला, " धोंडीबा, तुम्ही धीर सोडूं नका. माझी मनोदेवता मला असें सांगत आहे कीं हें तुमच्यावरचें संकट लवकरच निरस्त होईल आणि तुमची आणि तुमच्या माणसांची गांठ लवकरच पडेल. इतकेंच नव्हे तर सर्वच हिंदूंचें नष्टचर्य लवकरच संपेल."

धोंडीबानें विचरलें " असें तुम्ही कशावरून म्हणतां ?"

कोंडीबा म्हणाला, "कशावरून माझा असा ग्रह झाला आहे हें मला स्पष्टपणें सांगतां येत नाहीं. पण माझा असा आग्रह झाला आहे येवढी गोष्टमात्र

खरी. ज्या शिवाजीबद्दल आपल्या कानावर बातमी आली आहे, तो खरा शंकराचाच अवतार आहे, असें मला काल रात्रीं स्वप्नांमध्यें एका योग्यानें येऊन सांगितलें. तें स्वप्न बहुधा कधीं खोटें ठरणार नाहीं असें माझें मन मला सांगत आहे"

धोंडीबा म्हणाला " तुमचें स्वप्न खरें ठरो. मी जातों."

असें बोलून धोंडीबा त्याचा निरोप घेऊन जाफरकडे येऊन त्याच्या स्वाधीन झाला. जाफरच्या शिपायांनीं त्याला तुरुंगाकडे चालवीत नेलें. मग तुरुंगाच्या रखवालदारानें त्याला एका कोठडींत कोंडून टाकलें. इतकें झाल्यावर जाफर आपल्याकडे सोंपविलेल्या कामगिरीची पूर्तता नबाबसाहेबांच्या कानावर घालण्याकरतां त्यांच्या वाड्याकडे रवाना झाला.

इकडे कोंडीबा धोंडीबाच्या घराला कुलूप करून निजावयाला आपल्या घराकडे गेला.

---

## प्रकरण ६ वें.

# धोंडीबाचे विचार.

धोंडीबाला तुरुंगाच्या एका कोठडीमध्यें घालून त्या कोठडीच्या दाराला कुलूप लावून रखवालदार निघून गेला असें मागें प्रकरण पांचच्या शेवटीं आम्ही वाचकांना सांगितलें आहे. आतां धोंडीबाच्या संबंधाची पुढची हकीगत वाचकांना सांगतों.

ह्या कोठडीमध्यें धोंडीबा अत्यंत अस्वस्थ चित्तानें बराच वेळ बसून राहिला. जो प्रकार घडला त्याचें त्याला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. कारण, केंजळगडावर राहाणाऱ्या कोणाही माणसाची बायको किंवा दुसरी कोणीही नातलग स्त्री नबाबसाहेबांच्या मनांत भरली, म्हणजे ते तिला बेलाशक उचलून आणून आपल्या जनानखान्यांत घालीत असत, आणि ह्या गोष्टीला जे कोणी प्रतिरोध करीत, त्यांना ते कैद किंवा कडेलोट किंवा छळ, वगैरे सजा फर्मावीत असत. प्रतिरोध ज्या प्रमाणांत तीव्र असे, त्या प्रमाणांत सजेची तीव्रता असे. ज्या स्त्रीची प्राप्ति त्यांना बिन हरकत होत असे, तिला आणि तिच्या नातलगांना ते बक्षीसें देत असत. नबाबसाहेबांची वासना केवळ स्त्रियांपुरतीच नसून निसर्गनिषिद्ध अशा प्रकारांचीही त्यांना वासना असे. त्यांची वासना कोणत्याही प्रकारची असो,

तरी तिची तृप्ति ते करून घेतल्याशिवाय राहात नसत. आणि ह्या कामवासनेच्या सफलतेच्या बाबतींत हरकत करणाऱ्या माणसाला ते क्रूर आणि कठोर प्रकारच्या सजा करीत असत.

ह्या त्यांच्या वर्तनाचीं अनेक उदाहरणें धोंडीबाला केंजळगडावर घडलेलीं ठाऊक होतीं. त्यामुळें प्रस्तुत प्रसंगीं आपणाला नबाबसाहेबांनीं कैदेची सजा फर्माविली, ह्याचें धोंडीबाला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. त्याला आश्चर्य जर कांहीं वाटलें असलें, तर ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें कीं आपणास कडेलोटाची सजा नबाबसाहेबांनीं कशी फर्माविली नाहीं. आपणाला त्यांनीं नुसतें कैदेंतच घातलें ह्याचा आपण फायदा कसा करून घ्यावा, ह्या गोष्टीचा विचार त्याच्या मनांत येऊं लागला. नबाबसाहेबांना माफीचा अर्ज करावा काय ? रखवालदाराला लांच देऊं करावा काय ? ह्या कोठडीच्या भिंतींतील खिडकी फोडून गडाच्या टेकडी-वरून उडी टाकावी काय ? असे नानाप्रकारचे बेत धोंडीबानें मनांत आणले, आणि ते सारे अशक्य किंवा अव्यवहार्य म्हणून ते त्यानें त्याज्य ठरविले. आपल्या सुटकेसंबंधाचा कोणताही बेत त्याला ठाम करतां येईना.

सुटके संबंधाचे विचार बंद पडून नंतर बायको आणि मुलगी ह्यांच्या संबंधाचे विचार त्याच्या मनांत उसळूं लागले.

तो स्वतांला ह्मणाला, " माझी बायको आणि मुलगी आणि गजानन ह्यांना असें-खवली येथें नशीराशिंगापासून मनाजोगे घोडे मिळाले असतील काय ? तीं तीन माणसें एव्हांना कोठपर्यंत गेलीं असतील ? तीं तिघेंही घोड्यावर बसण्यांत पूर्ण पटाईत आहेत. तीं एव्हांना जांभूळवाडीपर्यंत खास गेलीं असतील. तीं तेथें मुक्काम करतील किंवा पुढें मजल मारतील ? तीं विजापुरास पोंचावयाच्या अगोदर वाटेंत कांहीं संकटें त्यांचावर ओढतील काय ? नबाबसाहेब त्यांचा पाठलाग करावयासाठीं त्यांच्या मागून आपले घोडेस्वार दवडतील काय ? परंतु हे नबाबाचे घोडे स्वार त्यांना गांठीतोंपर्यंत तीं तीन माणसें केंजळगडाच्या मुलखाच्या हद्दीच्या बाहेर गेलेलीं असणारच ! विजापुरकरांच्या हद्दींत हे घोडेस्वार शिरण्याचें धाडस बहुत करून करणार नाहींत ! माझीं तीन माणसें नबाबाच्या हातीं सांपडत नाहींत हें खास ! नबाबसाहेबांचे घोडेस्वार बादशहाच्या हद्दीपर्यंतच माझ्या माणसांचा पाठलाग करतील. ते जर कां केंजळच्या हद्दीच्या बाहेर पडले, तर पूर्वीचा मराठा गडकरी बंडोबा बिन चिमाजी पवार ह्याची जी गत झाली, तीच त्यां नबाबाची

खरी. ज्या शिवाजीबद्दल आपल्या कानावर बातमी आली आहे, तो खरा शंकराचाच अवतार आहे, असें मला काल रात्रीं स्वप्नांमध्यें एका योग्यानें येऊन सांगितलें. तें स्वप्न बहुधा कधीं खोटें ठरणार नाहीं असें माझें मन मला सांगत आहे"

धोंडीबा म्हणाला " तुमचें स्वप्न खरें ठरो. मी जातों."

असें बोलून धोंडीबा त्याचा निरोप घेऊन जाफरकडे येऊन त्याच्या स्वाधीन झाला. जाफरच्या शिपायांनीं त्याला तुरुंगाकडे चालवीत नेलें. मग तुरुंगाच्या रखवालदारानें त्याला एका कोठडींत कोंडून टाकलें. इतकें झाल्यावर जाफर आपल्याकडे सोंपविलेल्या कामगिरीची पूर्तता नबाबसाहेबांच्या कानावर घालण्याकरतां त्यांच्या वाड्याकडे रवाना झाला.

इकडे कोंडीबा धोंडीबाच्या घराला कुलूप करून निजावयाला आपल्या घराकडे गेला.

---

## प्रकरण ६ वें.

# धोंडीबाचे विचार.

धोंडीबाला तुरुंगाच्या एका कोठडीमध्यें घालून त्या कोठडीच्या दाराला कुलूप लावून रखवालदार निघून गेला असें मागें प्रकरण पांचच्या शेवटीं आम्ही वाचकांना सांगितलें आहे. आतां धोंडीबाच्या संबंधाची पुढची हकीगत वाचकांना सांगतों.

त्या कोठडीमध्यें धोंडीबा अत्यंत अस्वस्थ चित्तानें बराच वेळ बसून राहिला. जो प्रकार घडला त्याचें त्याला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. कारण, केंजळगडावर राहाणाऱ्या कोणाही माणसाची बायको किंवा दुसरी कोणीही नातलग स्त्री नबाबसाहेबांच्या मनांत भरली, म्हणजे ते तिला बेलाशक उचलून आणून आपल्या जनानखान्यांत घालीत असत, आणि ह्या गोष्टीला जे कोणी प्रतिरोध करीत, त्यांना ते कैद किंवा कडेलोट किंवा छळ, वगैरे सजा फर्मावीत असत. प्रतिरोध ज्या प्रमाणांत तीव्र असे, त्या प्रमाणांत सजेची तीव्रता असे. ज्या स्त्रीची प्राप्ति त्यांना बिन हरकत होत असे, तिला आणि तिच्या नातलगांना ते बक्षीसें देत असत. नबाबसाहेबांची वासना केवळ स्त्रियांपुरतीच नसून निसर्गनिषिद्ध अशा प्रकारांचीही त्यांना वासना असे. त्यांची वासना कोणत्याही प्रकारची असो,

तरी तिची तृप्ति ते करून घेतल्याशिवाय राहात नसत. आणि ह्या कामवासनेच्या सफलतेच्या बाबतींत हरकत करणाऱ्या माणसाला ते क्रूर आणि कठोर प्रकारच्या सजा करीत असत.

ह्या त्यांच्या वर्तनाचीं अनेक उदाहरणें धोंडीबाला केंजळगडावर घडलेलीं ठाऊक होतीं. त्यामुळें प्रस्तुत प्रसंगीं आपणाला नबाबसाहेबांनीं कैदेची सजा फर्माविली, ह्याचें धोंडीबाला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. त्याला आश्चर्य जर कांहीं वाटलें असलें, तर ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें कीं आपणास कडेलोटाची सजा नबाबसाहेबांनीं कशी फर्माविली नाहीं. आपणाला त्यांनीं नुसतें कैदेंतच घातलें ह्याचा आपण फायदा कसा करून घ्यावा, ह्या गोष्टीचा विचार त्याच्या मनांत येऊं लागला. नबाबसाहेबांना माफीचा अर्ज करावा काय ? रखवालदाराला लांच देऊं करावा काय ? ह्या कोठडीच्या भिंतींतील खिडकी फोडून गडाच्या टेकडीवरून उडी टाकावी काय ? असे नानाप्रकारचे बेत धोंडीबानें मनांत आणले, आणि ते सारे अशक्य किंवा अव्यवहार्य म्हणून ते त्यानें त्याज्य ठरविले. आपल्या सुटकेसंबंधाचा कोणताही बेत त्याला ठाम करतां येईना.

सुटके संबंधाचे विचार बंद पडून नंतर बायको आणि मुलगी ह्यांच्या संबंधाचे विचार त्याच्या मनांत उसळूं लागले.

तो स्वतांला ह्मणाला, " माझी बायको आणि मुलगी आणि गजानन ह्यांना असेंखवली येथें नशीराशिंगापासून मनाजोगे घोडे मिळाले असतील काय ? तीं तीन माणसें एव्हांना कोठपर्यंत गेलीं असतील ? तीं तिघेंही घोड्यावर बसण्यांत पूर्ण पटाईत आहेत. तीं एव्हांना जांभूळवाडीपर्यंत खास गेलीं असतील. तीं तेथें मुक्काम करतील किंवा पुढें मजल मारतील ? तीं विजापुरास पोंचावयाच्या अगोदर वाटेंत कांहीं संकटें त्यांचावर ओढतील काय ? नबाबसाहेब त्यांचा पाठलाग करावयासाठीं त्यांच्या मागून आपले घोडेस्वार दवडतील काय ? परंतु हे नबाबाचे घोडे स्वार त्यांना गांठीतोंपर्यंत तीं तीन माणसें केंजळगडाच्या मुलखाच्या हद्दीच्या बाहेर गेलेलीं असणारच ! विजापुरकरांच्या हद्दींत हे घोडेस्वार शिरण्याचें धाडस बहुत करून करणार नाहींत ! माझीं तीन माणसें नबाबाच्या हातीं सांपडत नाहींत हें खास ! नबाबसाहेबांचे घोडेस्वार बादशहाच्या हद्दीपर्यंतच माझ्या माणसांचा पाठलाग करतील. ते जर कां केंजळच्या हद्दीच्या बाहेर पडले, तर पूर्वीचा मराठा गडकरी बंडोबा बिन चिमाजी पवार ह्याची जी गत झाली, तीच ह्या नबाबाची

होईल! नबाबाच्या स्वारांना बादशाहाच्या हद्दीपर्यंतच माझ्या माणसांचा पाठलाग करावयाचा हुकूम नबाब देईल! पुढें जाऊं नका अशी सक्त ताकीद त्यांना तो देईल. ह्यावरून माझीं माणसें सुरक्षितपणें विजापुरास जाऊन पोंहचतील खास? पण नांदेडपुढें जें जंगल वाटेंत आहे, त्यांत चोरट्यांचा उपद्रव आहे असें मीं ऐकिलें आहे. त्या जंगलांत त्यांच्यावर चोरटे हल्लाबिल्ला करतील कीं काय? काय होईल कोण जाणे?"

ह्या प्रकारचे विचार धोंडीबाच्या मनांत बराच वेळ घोळत होते. नंतर कोंडीबाच्या आणि इतर माणसांच्या संबंधाचे विचार त्याच्या मनांत आले. अशा प्रकारच्या गोंधळवून सोडणाऱ्या विचारांनीं धोंडीबाचें मन भारी जर्जर झालें. मनाचे व्यापार हळूं हळूं बंद पडूं लागले. कांहीं वेळानें ते अगदीं बंद पडले आणि झोंपेनें त्याच्यावर आपलें वर्चस्व स्थापित केलें. त्याला गाढ झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारीं सकाळीं तुरुंगाचा रखवालदार कोठडीचें कुलूप उघडून आंत आला. तेव्हां धोंडीबाला गाढ झोंप लागलेली होती. त्यानें ह्या कैद्याला हलवून आणि हाका मारून जागें केलें.

धोंडीबा उठून उभा राहिला. मग क्षणभर डोळे चोळून त्यानें आपलें कांबळें ज्याचेवर तो रात्रभर निजला होता, तें त्यानें आवरून एका कोपऱ्यांत ठेवून दिलें. मग त्याला रखवालदारानें दुसऱ्या कोठडींत नेऊन पंचधावनाच्या सोयी दाखवून दिल्या. मग रखवालदारानें त्याला पुन्हा पहिल्या कोठडींत आणलें. येथें धोंडीबाला त्यानें न्याहारीसाठीं भाकरी कांदा वगैरे खाद्यें आणि पाणी दिलें. मग रखवालदार त्याला म्हणाला, "तुमचें दुपारचें जेवण तुम्हांला मध्यान्हीला मिळेल आणि संध्याकाळचें जेवण सूर्यास्ताच्या वेळेला मिळेल." अशी ताकीद धोंडीबाला देऊन रखवालदार त्या कोठडीच्या दाराला कुलूप लावून निघून गेला.

धोंडीबाला रात्रीं चांगली गाढ झोंप लागली असल्या कारणानें त्याला आतां,—म्हणजे शनिवारीं सकाळीं चांगली हुशारी वाटत होती,—अर्थात् त्याच्या शरीराला हुशारी वाटत होती,—परंतु त्याचे विचार लवकरच चिंतामय होऊं लागले. आपल्या बायकोची आणि मुलीची स्थिति ह्या वेळीं कशी असेल? त्या कोठें असतील? त्यांचा प्रवास कोठपर्यंत झाला असेल? वाटेंत त्यांना कांहीं अडचणी आल्या असतील कीं काय? नबाबाचे स्वार त्यांच्या पाठलागासाठीं रवाना झाले असतील किंवा नसतील? इत्यादि विचार त्याच्या मनांत उभे राहिले. नंतर आपली सुटका या कोठडींतून कशी होऊं शकेल ह्या विषयाकडे त्याचें लक्ष लागलें. आपली

सुटका अमुक रीतीनें करून घ्यावी असा एकादा बेत त्याच्या मनांत उत्पन्न झाला म्हणजे त्याला आनंद होई. तो बेत अव्यवहार्य आहे असें विचाराअंतीं त्याचें मत झालें म्हणजे त्याला दुःख होई. नंतर सुटकेची दुसरी एकादी योजना तो मनांत आणी तेव्हां त्याला आनंद होई, परंतु ती योजना अव्यवहार्य आहे असें त्याच्या मनानें ठरलें म्हणजे त्याला दुःख होई. अशा रीतीनें स्वतःच्या सुटकेच्या संबंधाच्या अनेक युक्त्या त्यानें मनांत आणल्या आणि त्या सगळ्या अव्यवहार्य म्हणून त्यानें रद्द ठरविल्या.

अशा रीतीच्या विचारांत तो असतां मध्यान्हाचा समय प्राप्त झाला. रखवालदार खाद्यांचा थाळा आणि पाण्याचा तांब्या तेथें ठेवून गेला. धोंडीबाचें भोजन झाल्यावर तो आपलें कांबळें आंथरून त्यावर उताणा पडून विचार करूं लागला. पुन्हां तेच विचार, तेच प्रश्न, तेच बेत, आणि तोच नैराश्यमय शेवट !

परंतु तिसरा प्रहर उलटण्याच्या सुमारास ही त्याची मनःस्थिति बदलूं लागली. त्याच्या मनांत एक सुटकेची कल्पना आली. ह्या कल्पनेचा तो विचार करूं लागला. ती एकदां त्याला अशक्य वाटे, मग पुन्हां शक्य वाटे. अशक्य वाटली म्हणजे त्याला दुःख होई; तीच पुन्हां शक्य वाटली म्हणजे त्याला आनंद होई. त्याचें मन आशा आणि निराशा ह्या दोन टोंकामध्यें हेलकावे खात राहिलें. त्याचें मन गोंधळून गेलें. ती कल्पना शक्य आहे असें तो ठरवी, आणि नंतर ती अशक्य आहे असें त्याचें त्यालाच वाटे ! मग शेवटीं तो स्वतांला म्हणाला, " मला सोडा असें मी म्हटल्यानें मला कोणी सोडीत नाहीं. सुटका ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. लोकांकडून माझी सुटका होणें शक्य नाहीं. सुटकेसाठीं मीच प्रयत्न केला पाहिजे. मींच धाडस केलें पाहिजे. आपली सुटका करून घेणें ही इतकी कांहीं सोपी गोष्ट नाहीं कीं ती मनांत आणल्याबरोबर होईल ! सुटकेसाठीं कांहींतरी धाडस केलें पाहिजे. ह्या प्रयत्नांत जोखीम फार आहे. परंतु कदाचित् माझी युक्ति सिद्धीस जाईल. कदाचित् जाणार नाही. परंतु ह्या कोठडींत कुजत पडण्यापेक्षां सुटकेचा प्रयत्न केला पाहिजे. मी हातपाय हालविले नाहींत तर माझी कधींच सुटका व्हावयाची नाहीं. प्रयत्न केला पाहिजे. प्रयत्न सिद्धीस गेला तर उत्तमच आहे, नाहीं तर पुढें काय होईल तें होवो. त्याचा विचार पुढें. ही युक्ति मी करणार. ही युक्ति सफल झाली नाहीं तर जे कांहीं हाल पुढें सोसावे लागतील ते सोसावयाला मी आपलें मन घट्ट केलें. ठरला निश्चय."

असें म्हणून तो उठून उभा राहिला. त्याच्या मुद्रेवर विलक्षण करारीपणाचें तेज झळकूं लागलें. ह्या अवसानांत त्यानें कोठडीमध्यें दोन तीन फेऱ्या केल्या

नंतर त्यानें जमीनीवरून आपलें कांबळें उचलून तें दोन हातांनीं दोन टोकें धरून किती लांब रुंद आहे तें पाहिलें. मग त्यानें तें झटकलें. मग त्यानें त्याची चौघडी केली. ही चवघडी किती लांब रुंद आहे हें त्यानें पाहिलें. मग समाधानाच्या मुद्रेनें त्यानें ती चौघडी हळूच जमीनीवर ठेविली. मग त्यानें आपलें मुंडासें उलगडून तें एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत किती लांब आहे हें पाहिलें. मग तेंही समाधानाच्या मुद्रेनें जमीनीवर ठेविलें. मग त्यानें कमरेचा कमरबंध सोडून तो किती लांब आहे हें पाहिलें आणि तो किती बळकट आहे हें दोन हातांत तो ताणून त्यानें पाहिलें. नंतर तो कमरबंदही त्यानें समाधानाच्या मुद्रेनें हळूच जमीनीवर ठेवून दिला.

आपल्या सुटकेची जी योजना धोंडीबानें मनांत ठरविली होती, त्या योजनेच्या सिद्धीसाठीं जी कांहीं साधनसामग्री आवश्यक होती, ती यथास्थित आहे असें ठरलें, तेव्हां त्यानें समाधानाचा निःश्वास सोडला आणि तो स्वतांला म्हणाला, " ही युक्ति मी करणार ! ती धाडसाची आहे, तिच्यांत जोखीम आहे. परंतु तिची सफलता माझ्या चपलतेवर, शक्तीवर आणि करारीपणावर अवलंबून आहे. देवा, माझ्या युक्तीला यश दे; माझी सुटका येथून व्हावयाला तूं मदत कर. या पापी, व्यभिचारी, अन्यायी, जुलमी नबाबाच्या तावडींतून सुटावयाच्या कामीं तूं माझा पाठीराखा हो. देवा, आतां माझी काळजी तुला ! माझा भार तुझ्यावर !"

याप्रमाणें देवाची करुणा भाकल्यावर त्याला समाधान वाटलें, आणि त्याला जें कांहीं धाडसाचें कृत्य करावयाचें होतें तें करावयाला तो सिद्ध होऊन राहिला.

इतकें होत आहे तों सूर्यास्ताचा समय येऊन ठेपला, आणि धोंडीबा खाद्यपेयांचीं भांडीं आणणाऱ्या रखवालदाराची वाट पहात बसला.

---

## प्रकरण ७ वें.

# धोंडीबाचें पलायन.

खाद्यें आणि पेयें यांचीं भांडीं रखवालदार आणतो केव्हां अशा उत्कंठेनें धोंडीबा त्याची वाट पहात बसला. परंतु त्याला त्याची फार वेळ वाट पहात बसावें लागलें नाहीं. चार पांच क्षणांतच त्याच्या कोठडीच्या दाराचें कुलूप रखवालदारानें काढलें. खाद्यांचा थाळा एका हातांत आणि पाण्याचा लोटा दुसऱ्या हातांत घेऊन

तो त्या कोठडींत प्रविष्ट झाला. दोन्ही हातांतील पदार्थ जमीनीवर ठेवण्यासाठीं तो ओणवा झाला.

तो ओणवा झाला आणि त्यानें ते पदार्थ जमीनीवर ठेवले त्याच क्षणीं धोंडीबानें आपल्या कांबळ्याची चौघडी त्याच्या पाठीवर चिताफीनें टाकली. ह्या चौघडीचीं चारी टोकें जमीनीवर टेकलीं तीं धोंडीबानें विद्युल्लतेच्या वेगानें दोन्ही हातांनीं गोळा करून एकवटलीं. मग त्या चारी टोंकाच्या जुडीला त्यानें आपल्या पटक्याचे अनेक लपेटे एकावर एक असे दिले. मग त्यानें पटक्याच्या दोन्ही टोकांनां गांठीवर गांठी दहा बारा दिल्या. मग आपल्या कमरबंधाचे दहा वळसे रखवालदाराच्या ह्या गठडी भोंवती गुंडाळले आणि शेवटीं ह्या कमरबंधाच्या दोन्ही टोकांना धोंडीबानें दहा बारा गांठी दिल्या.

ह्याप्रमाणें रखवालदाराची गठडी करतांना धोंडीबानें त्याच्या तंगड्या किंवा बाहु वाकड्या तिकड्या रीतीनें दुरमडूं नयेत, अशा संबंधानें खबरदारी घेतली होती. तसेंच कांबळ्याच्या आंत त्या रखवालदाराला थोडथोडी हालचाल करतां यावी इतकी सैल गठडी धोंडीबानें मुद्दाम केली होती. कांबळ्यांत रखवालदार गुदमरून मरणार नाहीं अशीतर त्याची खात्री होतीच होती.

हें धाडसाचें धोंडीबाचें कृत्य वर्णावयाला आम्हाला इतका वेळ लागला खरा, परंतु धोंडीबाला तें कृत्य करावयाला दहा क्षणांचा देखील अवधि लागला नाहीं. तसेंच हें कृत्य केलें जात असतां रखवालदार आश्चर्यानें आणि भीतीनें प्रथम अगदीं गर्भगलित झाला होता. तो नंतर ओरडत होता, पण कांबळ्यांतून त्याचा आवाज फार मोठ्यानें बाहेर फुटत नव्हता. नंतर आपलें ओरडणें येथें निरुपयोगी आहे असें जाणून तो ओरडेनासा झाला.

असो. हें गठडी बांधण्याचें कृत्य आटोपतांच धोंडीबानें ती गठडी हलक्या हातानें उचलून कोठडीच्या अगदीं पलीकडच्या कोपऱ्यांत अगदीं अलगत ठेवून दिली. मग तो त्या कोठडीच्या बाहेर पडला. त्यानें आवाज न होऊं देतां दार ओढून घेतलें. मग तो तुरुंगाच्या कोठड्या ज्या पडवींत होत्या, त्या पडवींतून बाहेर पडावयाला निघाला. ह्या वेळीं सूर्यास्त होऊन गेलेला असल्याकारणानें सर्वत्र काळोख पसरलेला होता, आणि त्या पडवींत त्या वेळीं दुसरें कोणी माणूस नव्हतें.

ह्या पडवींतून धोंडीबा बाहेर पडला, आणि तो एकदम सिद्दी दरवाज्याकडे जावयाला निघाला. ह्या वेळीं गडावर वावरणारीं माणसें फारशीं नव्हतीं. त्यामुळें

धोंडीबाकडे कोणाचें लक्ष्य गेलें नाहीं. वाटेंत त्याला जर कोणी माणूस भेटलें, तर तो नाक शिंकरण्याच्या निमित्तानें आपला उजवा हात तोंडापुढें धरून थोडासा ओणवा होत असे, आणि तेणेंकरून त्याची चेहेरेपट्टी कोणालाही उमगत नसे.

धोंडीबाला गडाच्या बाहेर पडण्याची उत्कंठा लागलेली होती, तथापि संशय टाळावयासाठीं तो संथपणानें पावलें टाकीत होता.

अशा प्रकारें शक्य ती खबरदारी घेऊन धोंडीबा शिद्दीदरवाज्याशीं आला. वेशींतून कांहीं माणसें ह्या वेळीं बाहेर पडत होतीं. कांहीं माणसें आंत येत होतीं. जो तो आपल्या गडबडींत असल्याकारणानें धोंडीबाकडे कोणाचेंच लक्ष्य गेलें नाहीं. तो वेशींतून साध्या आणि संथ चालीनेंच बाहेर पडला. प्रहरभर रात्र चढे तोंपर्यंत परवलीचा शब्द वापरला जात नसे. त्यामुळें धोंडीबाला गडांतून पळून जातांना तीही अडचण आली नाहीं.

तो शिद्दी दरवाज्यांतून बाहेर पडला आणि झपाझप पावलामागून पाऊल टाकून तो त्या टेकडीवरून खालीं उतरूं लागला. वाटेंत कोणी माणूस भेटलें तर तो नाक शिंकरण्याच्या निमित्तानें तोंडापुढें हात धरून ओणवा होत असे, त्यामुळें त्याची चेहेरेपट्टी कोणास दिसण्याजोगी नव्हती. परंतु इतकी खबरदारी घेण्याची त्याला वास्तविक पाहिलें असतां कांहीं जरूरीच नव्हती. कारण, रात्रीचा काळोख आकाशकटाहांत कोंदून राहिला होता.

असो; टेकडीच्या पायथ्याला धोंडीबा आला तेव्हां त्याच्या चित्ताला स्वस्थता वाटली. परंतु तेथें तो क्षणभरही न थांबतां तसाच चालत राहिला. केंजळगड जितक्या लवकर आपण दूर करूं, तितकी आपणाला सुरक्षितता अधिक, असें म्हणून तो झपाझप पावलें टाकीत चालत होता. तो त्या प्रांताचा चांगला माहितगार असल्याकारणानें अंधारांतही तो झपाझप चालूं शकत होता.

तो विजापुरची वाट धरून चालत राहिला. त्याच्या पायांत पायतणें नव्हतीं, डोकीवर मुंदासें नव्हतें व जवळ कांहींही हत्यार नव्हतें हें वाचकांना ठाऊकच आहे. तो झपाट्यानें चालत होता. मधून मधून तो मागें तोंड वळवून आपला पाठलाग करावयाला कोणी माणूस येत आहे कीं काय हें पहात होता, परंतु असा पाठलाग करावयाला कोणीही माणूस येत नाहीं अशी आपली खातरी करून घेऊन तो पुढें मार्ग आक्रमीत चालला.

अशा रीतीनें जलदीनें चालत चालत प्रहर रात्रींच्या सुमारास तो जांभूळ वाडीच्या पुढें पांच सहा कोश रस्ता चालत गेला, तरी त्यानें मार्गक्रमण तसेंच पुढें चालू ठेविलें. मध्यरात्र उलटून गेली तरी तो चालतच होता. जें एक एक पाऊल आपण टाकीत आहों, तें आपणाला एक एक पाऊल केंजळगडापासून दूर दूर आणि विजापुराच्या जवळ जवळ नेत आहे, अशा विचारानें तो चालतच राहिला.

धोंडीबाचें शरीर तालमीच्या कामांनीं चांगलें मजबूत झालेलें होतें, आणि एका दमांत पंचवीस पंचवोस, तोस तीस कोश चालणें हें त्याला कांहींच वाटत नसे. त्यामुळें तो केंजळगडावरून आतां पर्यंत चालत होता त्याचे श्रम त्याला मुळींच वाटले नाहींत. शिवाय रस्ताही चांगला असून आकाशांतील तारकांचा प्रकाश त्याच्या वाटचालीला पुरेसा होता.

असो. मध्यरात्र उलटून गेली तरी त्याचें मार्गक्रमण चाललेंच होतें. हें मार्गक्रमण चाललेलें असतां धोंडीबाच्या मनांत सद्यःस्थितीसंबंधानें आणि आगामी स्थितीसंबंधानें विचार चाललेले होते. तो मनांत म्हणाला, " मी कैदेंतून बाहेर पडलों. नबाबाच्या तावडींतून मी निसटलों. मला स्वातंत्र्य मिळालें, परंतु पुढें काय ? पुढें काय करावयाचें आणि कसें करावयाचें, हें मजपुढें एक मोठें कोडेंच येऊन पडलें आहे. नेसलेल्या धोतराशिवाय आणि अंगांतील बंडीशिवाय माझ्या अंगावर चिंधीदेखील नाहीं. माझ्या डोक्यावर मुंडासें नाहीं. तें रखवालदाराच्या गठडीभोंवतीं मी गुंडाळलें. मी बोडका आहें, आणि बोडक्यानें प्रवास कसा करावयाचा ? मला बोडक्याला पाहून लोक तो अपशकुन समजून मजपासून दूर सरतील. येथपासून विजापुर तीस चाळीस कोश आहे. इतका प्रवास पायानें कसा करावयाचा ? माझ्याजवळ कांहीं हत्यार नाहीं. जागोजाग उपद्रव करणारे मुसलमान असतां त्यांच्यापासून बचाव कसा करून घ्यावयाचा ? माझ्याजवळ एक पैसाही नाहीं; वाटेनें खावयाला कांहींतरी विकत घ्यावयाचें तें कसें विकत घेता येईल ? रात्र पडली म्हणजे निजतांना पांघरावयाला काय ? सारांश, मला स्वातंत्र्य मिळालें खरें, तथापि त्या स्वातंत्र्याचा उपयोग कसा करावयाचा ?

अशा मनाच्या गोंधळलेल्या स्थितींत तो विजापुरची वाट धरून चालत होता. सध्या त्याचा इरादा इतकाच होता कीं केंजळगड जितकें मागें टाकतां येईल तितकें टाकावें. विजापुरच्या राज्याच्या हद्दींत आपण खूप लांब गेलों असतां

नबाबाच्या शिपायांकडून पुन्हा पकडले जाण्याचा संभव कमी अशा विचारानें धोंडीबा एकसारखा चालतच राहिला.

पहाटेच्या सुमारास थोडासा वेळ विसावा घेण्यासाठीं तो रस्त्याच्या जवळील एका आडोशाच्या ठिकाणीं बसला. कांहीं वेळानें त्यानें आजूबाजूची जागा हातानें पानें गवत वगैरे दूर सारून जराशी साफ करून घेतली, आणि त्या जागेवर त्यानें आडवें अंग केलें. झोप घ्यावयाचा त्याचा संकल्प नसतां त्यानें डोळे मिटले, आणि झोप घ्यावी अशी त्याची इच्छा नसतां त्याला झोप आली! गाढ झोपेनें त्याला ग्रासिलें! त्याला निजावयाला गादी वसुंधरेचा खरबडीत पृष्ठभाग, आणि पांघरावयाला आकाश!

अशा रीतीनें तो पुष्कळ वेळ निजला, आणि नंतर तो जागा झाला तेव्हां त्याला दिसून आलें कीं सूर्य साधारणपणें डोकीवर आलेला आहे, मध्यान्हाचा सुमार झालेला आहे, आणि इतका वेळ आपण निजलों असतां आपल्या अंगावर जवळील एका ऊंच वृक्षाची छाया पडलेली होती त्यामुळें आपणांस उन्हाचा त्रास झाला नाहीं.

धोंडीबा जागा झाला तेव्हां त्याला फार हुशारी वाटली. मग जवळच्या ओढयावर जाऊन त्यानें प्रातर्विधि आटोपून दांत डोळे वगैरे धुवून स्वच्छ केले. त्याला आधल्या दिवशीं संध्याकाळीं जेवण मिळालेलें नव्हतें. ह्या दिवसाची म्हणजे आदित्यवारची सकाळची न्याहारी त्याला मिळालेली नव्हती. त्याला भूक लागली होती, पण त्याच्या जवळ खावयाला कांहींच नव्हतें. तथापि तो तशा स्थितींत केंजळगड मागें टाकावा आणि विजापुर जवळ करावें, ह्या उद्देशानें रस्ता धरून चालूं लागला. त्याच्या डोक्यावर मुंडासें नव्हतें त्यामुळें त्याच्या डोक्यावर सूर्याचें ऊन्ह पडत होतें. परंतु तो शरीरानें कणखर असल्याकारणानें त्याला उन्हाचा फारसा त्रास होत नव्हता. रस्त्यानें जाणारे येणारे मुशाफर त्याच्याकडे पाहात होते, परंतु त्याला कोणी कांहीं प्रश्न विचारीत नव्हते, आणि तोही कोणाला कांहीं विचारीत नव्हता. एका दोघा मुशाफरांनीं त्याला मुंडाशाशिवाय कां चालला आहेस म्हणून विचारलें. तेव्हां त्यानां तो म्हणाला, " मी आपलें भाकरीचें गांठोडें आणि मुंडासें एका ठिकाणीं ठेऊन ओढयाचे कांठीं न्हाण्याला गेलों तेव्हां कुत्र्यानें तें गांठोडें आणि मुंडासें तोंडांत भरून कोठें तरी नेलें, तें मी शोधीत आहें. "

धोंडीबाची ही हकीगत त्या मुशाफरांना साहजिक वाटली आणि जास्ती कांहीं

चौकशी न करतां ते आपल्या वाटेनें पुढें गेले आणि धोंडीबाही आपल्या वाटेनें पुढें चालूं लागला.

अशा प्रकारें उन्हाच्या तापांत आणि उपाशी पोटीं धोंडीबा सावकाश पावलें टाकीत टाकीत आणि वाटेंत कोठें झाड लागलें तर त्याच्या छायेंत मधून मधून विश्रांतीसाठीं बसत बसत विजापुरच्या रोखानें चालत राहिला.

अशा प्रकारें कांहीं वाट तो चालून गेला तों त्याला समोरून दौडत येणाऱ्या घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं येऊं लागला. घोडेस्वार लांब होते. ते त्याला दिसत नव्हते, परंतु टापांचा आवाज मात्र क्रमाक्रमानें मोठा मोठा होत जाणारा त्याला ऐकूं येत होता. धोंडीबा रस्त्याच्या कडेला उभा राहिला आणि येणाऱ्या घोड्यांच्या दिशेकडे डोळे लावून निश्चल उभा राहिला.

हे घोडेस्वार कोण होते हें जाणावयासाठीं आपणाला एक दोन घटका मागें जाऊन दुसऱ्या कांहीं माणसांच्या हालचाली पाहिल्या पाहिजेत.

---

## प्रकरण ८ वें.

# जंगलांतून प्रवास.

मालिनीबाई, तिची मुलगी, आणि तिचा भाचा, अशीं तीन माणसें दुसऱ्या दिवशीं म्हणजे आदित्यवारीं सकाळीं उठून विजापुरची वाट धरण्याला सज्ज झालीं. त्यांचा प्रवास जंगलांतून व्हावयाचा असल्या कारणानें त्यांच्या सोबतीला पुंड-रीकानें जावें असें आधल्या रात्रीं ठरलेलें होतें, त्याला अनुसरून तोही प्रवासाचे कपडे अंगावर चढवून सिद्ध झाला.

पुंडरीक हा मुलगा अगोदरच गुटगुटीत बांध्याचा आणि सुंदर चेहेऱ्याचा असल्या कारणानें तो ह्या प्रवासी आणि लढाऊ पोशाखांत फारच सुंदर दिसत होता. त्यानें कमरेला लंगोट बांधून त्याचेवर तंग विजार घातली होती, ती त्याच्या गुडघ्याखालीं अगदीं थोडी उतरलेली असल्याकारणानें त्याच्या घट्ट आणि घाटसूद पोटऱ्या आणि मांड्या उठून दिसत होत्या. त्याच्या अंगांत एक जाडी लांडी अशी ऊभरी बंडी असून कमरेला कमरबंध बांधलेला असल्याकारणानें त्याच्या छातीचा रुंदपणा आणि कमरेचा बारीकपणा स्पष्टपणें दिसत होता. त्याच्या डोक्यावर एक हिरवा फेटा अकडबाज रीतीनें बांधलेला होता आणि त्याचा एक सोगा पाठीवर लोंबत होता. हा फेटा त्याच्या कपाळाचा भव्यपणा दिसण्या इत-

का वर बांधलेला होता. त्यानें एक धनुष्य, आणि तुणीर, हीं हत्यारें खांद्यावर लटकावलेलीं होतीं, आणि कमरबंधाला एक हलकी परंतु लांब तरवार लोंबत सोडलेली होती. सारांश, ह्या अक्कडबाज पोशाखांत तो निसर्गसुंदर मुलगा अधिकच खुलून दिसत होता.

हा मुलगा आणि पूर्वींचीं तीन प्रवासी माणसें मिळून एकंदर चार माणसें ह्यांनीं आपआपल्या घोड्यांवर आरूढ व्हावयाच्या अगोदर महेश्वर आणि भवानी यांचे निरोप घेतले. मग तीं माणसें अश्वारूढ होऊन वाटेला लागलीं.

ह्या चौघांपैकीं पुंडरीक हा त्या प्रांताचा राहाणारा असल्या कारणानें तो वाटें-तील विशिष्ट स्थळांचा निर्देश करून त्यांचीं वर्णनें करीत होता. ह्या विहिरीचें पाणी पाचक आहे, त्या डोंगरावर अमुक दिवशीं जत्रा भरत असते, ह्या झाडा-खालीं एका मुसलमानानें अमक्या एका हिंदू स्त्रीची इज्जत घेतली, तें देऊळ फोडावयाला मुसलमान आले असतां गांवकऱ्यांनीं त्यांना पिटाळून लावलें, त्या गांवांतील हिंदूंवर बादशाहानें डोईपट्टी बसविली आहे, त्या खेड्यांतील विहिरीमध्यें एका मुसलमानानें गायीचे पाय तोडून तिला ढकलून दिलें, ह्या गुहेमध्यें पांच मुसलमानांनीं ब्राह्मणांचीं जानवीं तोडलीं, त्या खडकावर कांहीं मुसलमान कांहीं मऱ्हाठ्यांच्या तोंडावर थुंकले त्यामुळें त्या मऱ्हाठ्यांनीं त्या मुसलमानांच्या दाढ्या कापून टाकल्या, इत्यादि हकीगती पुंडरीक आपल्या जोडीदारांना सांगत होता. परंतु वयाच्या सारखेपणामुळें त्याचें बरेंचसें संभाषण अरुंधतीशीं चालत होतें. तो आपला घोडा तिच्या घोड्याजवळून चालवीत होता, आणि तिला केंजळगडा-संबंधानें, तिच्या आईबापांसंबंधानें आणि खुद्द तिच्या स्वताच्या संबंधानें प्रश्न विचारीत होता. तीही असेच प्रश्न त्याला विचारीत होती. ह्या प्रवासाच्या निमि-त्तानें त्या दोघांची चांगली ओळख होऊन जुन्या मित्रांप्रमाणें त्यांना एकमेकांचे पूर्वेतिहास माहीत झाले.

ह्या दोन मुलांचें संभाषण चाललेलें असतां मालिनीबाई आणि तिचा भाचा यांचेंही कांहीं तरी संभाषण चाललेलें होतेंच. पुंडरीक जेव्हां विशिष्ट स्थळांच्या गोष्टी सांगे तेव्हां ह्या संभाषणास खंड पडे.

याप्रमाणें प्रवास करतां करतां प्रहरभर दिवस चढला तों हे प्रवासी जंगलाच्या तोंडाशीं येऊन पोंचले. मग पुंडरीकानें इशारत दिल्यावरून सर्वांनीं आपआपलीं शस्त्रास्त्रें यथास्थानीं आहेत किंवा नाहींत हें पाहिलें. मग सावधगिरीनें सभोंवार लक्ष्य ठेवून आणि बोलण्यामध्यें न गुंततां त्यांनीं जंगलांतून प्रवास चालविला.

जंगलाच्या मध्यभागीं हे प्रवासी येऊन पोंचतात न पोंचतात तोंच त्याच्या पाठीमागून दौडत येणाऱ्या घोड्यांच्या टापांचा आवाज आला. तेव्हां हीं चार माणसें पुढें न जातां जागच्या जागींच थबकून उभीं राहिलीं, आणि मागून येणारे कोण लोक आहेत हे पाहाण्यासाठीं त्यांनीं आपले डोळे त्या दिशेकडे लावले.

हे मागून येणारे घोडेस्वार संख्येनें चार होते. आमचे चार प्रवासी त्यांच्या नजरेस पडतांच एक मुसलमान ह्मणाला, "हींच तीं नबाबसाहेबांच्या हातावर तुरी देऊन पळून गेलेलीं माणसें! ती अरुंधती, ती तिची आई, आणि तो गजानन! त्यांना गिरफदार करून कैंजळगडावर आणावें असा आपणाला नबाबसाहेबांचा हुकूम आहे. तीं माणसें आपल्या तावडींत सांपडणारच. पण तो सुंदर आणि ऐटबाज पोऱ्या कोण रे?"

त्यावर त्याचा एक जोडीदार म्हणाला, "नबाबसाहेबांनीं तीन माणसांना पकडून आणा म्हणून आपणाला हुकूम केला आहे. त्या तिघांना आपण नबाबसाहेबांपुढें नेऊन उभें करूं. पण तो सुंदर पोऱ्या मी स्वतांच्या विलासासाठीं ठेवून घेईन."

ह्याप्रमाणें त्या मुसलमानांचें संभाषण होत असतां ते ह्या आमच्या प्रवाशांच्या पुढें येऊन पोंचले. तेव्हां एक मुसलमान म्हणाला, "तुम्ही आमच्या बरोबर परत कैंजळगडाकडे चला. नबाबसाहेबांनीं तुम्हांला बोलाविलें आहे."

त्यावर गजानन म्हणाला, "आम्ही विजापुरास जात आहों. आम्हाला जाऊं द्या. आम्ही नबाबसाहेबांचा गुन्हा केला नाहीं. आम्ही त्यांचा हुकूम मानीत नाहीं."

यावर ते चौघे एकदम म्हणाले, "हे हिंदू सूकरचे बच्चे काफर बऱ्या बोलानें येणार नाहींत. त्यांच्या मुसक्या बांधून त्यांना आपण घेऊन जाऊं. बांधारे ह्या काफीरांना."

हा हुकूम तो देत आहे आणि त्याच्या हाताखालचे लोक ह्या तिघांच्या मुसक्या बांधावयाला सरसावत आहेत, तों गजानन दरडावून म्हणाला, "हं मागें हटा! आम्हां चौघांपैकीं एकाच्याही अंगाला हात लावाल तर याद राखून असा!"

यावर ते चवघे मुसलमान हसत हसत म्हणाले, "अरे सूवरच्या बच्चा, ऐट तर मोठी आणली आहेस, पण आमच्यापुढें तुमचा टिकाव किती वेळ लागेल? दावूद, हो पुढें आणि बांध ह्यांच्या मुसक्या."

इतका वेळ पुंडरीक हा कांहीं बोलत नव्हता. [illegible] चा निरोप घेऊन केलें तर आपण काय करावयाचें हें मनांत [illegible] आम्हीं मागें सांगितलें आहे. तो

अरुंधतीला गिरफदार करावयासाठीं जाफरचा मदतनीस दावूद तिचा हात धरणार तोंच पुंडरीक मोठ्यानें ओरडून म्हणाला, "लांड्या, त्या पवित्र कुमारीला तुझा अपवित्र हात जो स्पर्श करीत आहे, तो असा छाटून टाकला पाहिजे!"

असें वाक्य उच्चारून पुंडरीकानें त्याच्या हातावर आपल्या तरवारीचा वार इतक्या जोरानें केला, कीं त्या मुसलमानाच्या हाताचा पंजा अर्धवट तुटून मनगटाशीं पिशवीसारखा लोंबत राहिला, तेणेंकरून वेदनेनें तो धाडदिशीं जमीनीवर आपटला. तेव्हां दुसरा मुसलमान पुढें सरसावणार तोंच त्याच्या पाठींत गजाननानें तरवारीचा रट्टा मारला. ही जखम खोल झालेली असल्याकारणानें तो तत्काळ घोड्यावरून खालीं पडला.

आतां दुसरे दोन मुसलमान शत्रु उरले; त्यांच्याशीं आमचीं चार माणसें झगडूं लागलीं. मालिनीबाईनें दुरून त्याच्या पाठींत भाल्याचें टोंक खुपसलें, तेव्हां तो मोठ्यानें ओरडून दया भाकूं लागला, " तो म्हणाला, आम्ही तुम्हाला शरण येत आहों; आम्हाला जीवदान द्या. आम्ही तुमच्या वाटेस जात नाहीं."

तेव्हां गजानन आणि पुंडरीक म्हणाले, "कसम खा."

तेव्हां एक मुसलमान जाफर म्हणाला, "मी पगंबराच्या दाढीची कसम खातों कीं मी पुन्हा तुमच्या वाटेस जाणार नाहीं."

दुसरा मुसलमान इब्राहीम म्हणाला, "मी अल्लाची कसम खातों कीं मी तुम्हाला पुन्हा उपद्रव करणार नाहीं."

तेव्हां पुंडरीक आणि गजानन म्हणाले, " बरें तर, आम्ही तुम्हाला माफ करतों."

असें म्हणून आमच्या चार हिंदूंनीं त्या मुसलमानांकडे जास्ती लक्ष्य न देतां पुन्हां विजापुरची वाट धरली.

गजानन वगैरे जे आमचे प्रवासी, त्यांचा जंगलांमध्यें त्या चार मुसलमानांशीं झगडण्यामध्यें जो वेळ फुकट गेला होता, तो भरून काढण्यासाठीं त्यांनीं आपले घोडे भरधाव सोडले. दोन तीन कोस अशा वेगानें मजल मारल्यावर त्यांनीं आपला वेग कमी केला.

गजानन पुंडरीकाला म्हणाला, "नाना, तूं आमच्यासाठीं इतकी तसदी ... आपलें ... सोडून तूं जंगलांतील प्रवासांत आमची सोबत ...नतों. तसाच त्या मुसलमानांच्या मन

गटावर तरवारीचा वार करून त्याचा अपवित्र स्पर्श आमच्या अरुंधतीला होऊं दिला नाहींस, हेही तुझे आमच्यावर मोठे उपकार आहेत. आतां याच्या पुढची वाट सरळ आहे आणि बिनधोक्याची आहे; आम्ही आतां जातों. तूं परत जा आणि तुझ्या आईबापांना आमचे रामराम सांग. पुन्हां केव्हां ह्या वाटेनें आम्हांला जाण्याचा प्रसंग आला, तर आम्ही तुमच्या घरीं खचित येऊं. तूं आतां येथून परत फीर."

मालिनीबाई ह्मणाली, "नाना, तूं आमच्या बरोबर येऊन जंगलांत त्या मुसलनानांशीं आमच्यासाठीं लढाई केलीस हे तुझे आम्ही उपकार मानतों. ओळखदेख ठेवा."

पुंडरीक म्हणाला, "मी तुमच्यासाठीं विशेषशी तसदी घेतली असें मला वाटत नाहीं. अपकार करणाऱ्या मुसलमानांना शासन करणें मला मनापासून आवडतें. पुन्हां तुम्ही केव्हां जरी ह्या वाटेनें गेलां तरी आमच्याच घरीं या बरें का ! अन-मान करूं नका."

त्यावर गजानन आणि मालिनीबाई हीं दोघेंजणें एकदम म्हणालीं, "आम्ही खचित येऊं."

अरुंधती,—जी इतका वेळ कांहींच बोलली नव्हती ती,—आतां म्हणाली, "नाना, तुमचे आमच्यावर फार उपकार झाले आहेत. आम्ही आतां पुढें जातों. तुम्ही येथून परता. आमची ओळखदेख ठेवा."

पुंडरीक तिला म्हणाला, "अरुंधती, आपली पुन्हां लवकरच गांठ पडेल असें माझें मन मला सांगत आहे, तें कशावरून म्हणून विचारशील तर तें मला सांगतां यावयाचें नाहीं. बरें, मी आतां परतूं ?"

गजानन म्हणाला, "त्या जंगलांतून संभाळून जा बरें का. नाहींतर पुन्हां ते मुसलमान तुला उपद्रव करतील."

त्यावर पुंडरीक म्हणाला, "त्या मुसलमानांची आपण चांगलीच कंबख्ती उडविली आहे. ते पुन्हां माझ्या वाटेस जाणार नाहींत. बरें जातों."

असें म्हणून पुंडरीकानें आपल्या घोड्याचें तोंड वळवलें आणि परत घराचा रस्ता धरला. आमचे तीन प्रवासी विजापुरचा रस्ता क्रमूं लागले.

विजापुरास जावयाला निघालेल्या गजानन वगैरे तीन प्रवाशांचा निरोप घेऊन पुंडरीक परत घराकडे यावयाला वळला असें आम्हीं मागें सांगितलें आहे. तो

येत असतां त्याच्या मनामध्यें जंगलांत हल्ला करावयाला आलेल्या मुसलमानां-संबंधानें विचार आले. त्यांना आपण अरुंधतीला पकडून नेण्याच्या बाबतींत कसा अडथळा केला ह्यासंबंधाचे विचार आले. नंतर अरुंधतीला तिच्या इच्छेविरुद्ध बाटवून तिला आपल्या पाशवी कामविकाराच्या तृप्तीचें साधन करावयाला प्रवृत्त झालेल्या नबाबाचें जें वर्तन, त्याच्या संबंधानें त्याच्या मनांत विचार आले. नंतर अरुंधतीच्या शौर्याविषयीं त्याच्या मनांत विचार आले. नंतर अरुंधतीचें तें मोहक रूप आणि तिची गोंडस शरीरयष्टि, यांच्यासंबंधानें त्याच्या मनांत गोड विचार आले. तो मनांत म्हणाला, " अहाहा, किती मोहक तिचें रूप, किती मर्यादशील तिचें वर्तन, किती शूर ती मुलगी ! अहाहा ! दुसरी एकादी मुलगी त्या धटिंगण मुसलमानांना पाहातांच अगदीं गांगरून गेली असती ! परंतु अरुंधती एकाद्या पुरुषाप्रमाणें त्या मुसलमानांशीं लढाई करावयाला सिद्ध झाली ! धन्य तिचा बाप कीं ज्यानें तिला उत्पन्न केलें ! धन्य तिची माता कीं जिनें तिला नऊ महिने उदरांत वागविलें ! धन्य तो पुरुष कीं ज्याची ती पत्नी होईल ! ती मुलगी मला पुन्हा कधीं तरी भेटेल काय ? तिचा सहवास नेहमीं असावा असें मला वाटतें ! विजापुरास जातांना तिच्यावर दुसरें एकादें संकट येईल कीं काय ? मीं तिच्या मागें जाऊन तिला गांठून तिला थेट विजापुरापर्यंत पोंचवून येऊं काय ? होय, असेंच करतों ! "

हे आणि अशाच जातीचे विचार पुंडरीकाच्या मनांत घोळत असतां त्याचें लक्ष्य घोड्याच्या चालीकडे नव्हतें किंवा वाटेकडे नव्हतें.

विजापुराकडे जावयासाठीं तो आपल्या घोड्याचें तोंड वळविणार इतक्यांत " ए नाना, असा काय बावचळल्यासारखा करीत आहेस ? " असे शब्द त्याच्या मागून येणाऱ्या एका स्वाराच्या मुखांतून बाहेर पडलेले त्याच्या कानीं आले, आणि तो पाहातो तों आपल्या गांवचा आणि आपला दोस्त सदाशिव !

सदाशिवाला पाहातांच पुंडरीकाच्या मनांतील अरुंधतीसंबंधाचे विचार बंद पडले, आणि तो देहभानावर येऊन सदाशिवाला म्हणाला, " अरे सदाशिव, तूं कोठें गेला होतास ? "

" मी गेलों होतों मष्णांत ! " सदाशिव म्हणाला. " पण तूं असा व्यग्र कशानें झाला आहेस ? तुझें लक्ष्य घोड्याच्या चालीकडे नव्हतें, आणि आम्ही तुझ्यामागून दौडत येत होतों, तुला हाका मारीत होतों, पण तूं मागें वळून

आमच्याकडे एकदांही पाहिलें नाहींस ! असा कोणच्या विचारांत तूं इतका गढून गेला होतास ? "

अरुंधतीच्या संबंधाच्या विचारांत आपण गढून गेलों होतों, ही गोष्ट पुंडरीकाच्या आतां लक्ष्यांत आली. तेव्हां तो म्हणाला, "तें मी सांगेन सावकाश. पण तूं आणि हा गोपीनाथ आणि हा मल्हारी असे तिघेजण कोठें गेलां होतां ? "

तेव्हां सदाशिव म्हणाला, " अरे, तें मी सांगेन सावकाश ! पण तूं आपल्या घोड्यावर मर्दाला शोभेल अशा ऐटीनें न बसतां अशा बेंगरूळपणानें बसला होतास तों कां, तें मला आधीं सांग. घोड्यावर तुझ्याइतका ऐटीनें बसणारा कोणी आपल्या गांवांत नाहीं, आणि आजतर तूं तपस्व्यासारखे खांदे खालीं लोंबत सोडून एखाद्या पोरीसारखा घोड्यावर बसला होतास तो कां, हें मला आधीं कळूं दे. मग मी आणि हे माझे जोडीदार असे आम्ही तिघे जण कोठें गेलों होतों तें तुला सांगेन ! "

सदाशिव आपल्या खणपटीला बसला, त्याला कांहीं तरी उत्तर दिल्यावांचून गत्यंतर नाहीं असें पाहून पुंडरीक म्हणाला, "सांगतों ऐक. काल संध्याकाळीं केंजळगडावरून आलेलीं आणि विजापुराला जावयाला निघालेलीं तीन माणसें आमच्या घरीं मुक्कामाला उतरलीं होतीं. ह्या जंगलांतून त्यांची वाट असल्या कारणानें आणि ह्या जंगलांत मुसलमान दरोडेखोरांचा उपद्रव असल्या कारणानें मला त्यांच्या सोबतीला म्हणून बाबांनीं जावयाला सांगितलें होतें. त्या माणसांना वरवलीपर्यंत पोंचवून मी घराकडे परत चाललों होतों. दुसरें कांहीं नाहीं. "

" म्हणून तूं बेंगरूळासारखा घोड्यावर बसला होतास काय ?" सदाशिव म्हणाला, " तूं कोणच्या तरी विचारांत निमग्न झाल्यासारखा मला दिसत होतास. खरें काय तें मला सांग. जंगलामध्यें तुम्हाला वाटमारे मुसलमान भेटले होते काय ? "

त्यावर पुंडरीक म्हणाला, " होय. भेटले होते. परंतु आम्ही त्यांना योग्य पारिपत्य करून हाकून लावलें आणि त्यानंतर जंगलांतून सुरक्षितपणें प्रवास करून वरवली पर्यंत गेलों; तेथें मी त्यांना सोडून परत घराकडे यावयाला निघालों होतों, इतक्यांत तूं मला गांठलेंस. "

सदाशिव म्हणाला, " तूं ज्या माणसांना पोंचवावयाला गेला होतास त्यांत दोन स्त्रिया आणि एक पुरुष होता काय ? "

पुंडरीक म्हणाला, " होय. दोन स्त्रिया आणि एक पुरुष अशीं तीन माणसें तीं होतीं. तीं तुम्हाला वाटेंत दिसलीं वाटतें ? "

" होय, दिसलीं, " सदाशिव म्हणाला, "त्या दोन स्त्रियांचा तोंडवळा सारखा होता. पण ती मुलगी फार सुंदर होती. "

पुंडरीक म्हणाला, " होय, ती मुलगी फार सुंदर आहे, आणि ती शूरही आहे. जंगलांत त्या दरवडेखोरांनीं आमच्यावर हल्ला केला, तेव्हां ती बिलकूल घाबरली नाहीं. ती एकदम तरवार उपसून लढावयाला सिद्ध झाली. तिचें मनगट धरावयाला एक मुसलमान सरसावत होता, त्याच्या हाताचा पंजा मी तरवारीनें अर्धवट छाटून टाकला. केंजळगडाच्या नबाबानें तिला आपल्या पाशवी कामशांतीसाठीं पकडून आणावयाकरतां त्या मुसलमान शिपायांना पाठविलें होतें. ते मुसलमान केंजळगडाच्या नबाबाचे नोकर होते. ते धंदेवाले दरवडेखोर नव्हते. तीं तीन प्रवासी माणसें विजापुराला सुरक्षितपणें जातील किंवा त्यांच्यावर आणखी कोणी हल्ला करतील कीं काय, ह्या विचारांत मी मग्न झालेला होतों, आणि परत वळून त्यांना गांठून त्यांना थेट विजापुरापर्यंत पोंचवावयाला जावें, असाही विचार माझ्या मनांत येत होता, आणि मी माझ्या घोड्याचें तोंड वळविण्याच्या बेतांतही होतों. मी ह्या असल्या विचारांत गढून गेलों होतों, म्हणून तुला चमत्कारिक वाटलें असेल. माझें लक्ष्य घोड्याच्या चालीकडे किंवा रस्त्यांतील देखाव्याकडे मुळींच नव्हतें. "

" आणि सारें लक्ष्य त्या सुंदर मुलीच्या मूर्तीचें ध्यान करण्याकडे लागलें होतें." सदाशिव स्मितपूर्वक म्हणाला, " बरोबर आहे. तुझें वय आतां वीस वर्षांचें आहे. तुझ्या बरोबरीच्या सर्व मुलांचीं लग्नें होऊन गेलीं आहेत, आणि तूं मात्र अझून अविवाहितच आहेस. सुंदर मुलीचा तुला असा ध्यास लागणें साहजिकच आहे !"

हें बोलणें ऐकून पुंडरीक चपापला. परंतु रागाचा आविर्भाव करून म्हणाला, " सद्या, भलभलतें बोलावयाला तुला लाज कशी नाहीं वाटत ? ती मुलगी कोणाची कोण, तिची स्थितिरीति वगैरे मला धड कांहींच माहीत नाहीं, आणि असें असून तिच्याबद्दल मी मनांत कांहींतरी विचार करीत बसेन हें तुला शक्य तरी वाटतें काय ? " मग संभाषणाचा विषय बदलण्यासाठीं पुंडरीक घोडा थांबवून म्हणाला, " येथेंच त्या चौघां मुसलमानांनीं आमच्यावर हल्ला केला. त्यांना आम्ही केलेल्या जखमांतून वाहलेल्या रक्ताचीं हीं येथें थारळीं झालीं आहेत. हें पहा येथें रक्त पडलें आहे. आणखी हें ह्या येथें, आणखी हें ह्या येथें, " असें म्हणून पुंडरीकानें त्या त्या स्थलांचा चाबकाच्या दस्त्यानें निर्देश केला. मग पुंडरीक

म्हणाला, " पण इतक्या थोड्या वेळांत ते येथून पसार झाले कसे ? जखमी माणसें येथून इतक्या लवकर गेलीं कशीं आणि कोठें ? कदाचित् तीं आपणाला रस्त्यावर पुढें भेटतील. कारण, त्यांना वेगानें प्रवास करतां येणार नाहीं."

याप्रमाणें पुंडरीक आणि सदाशिव यांचें संभाषण झाल्यावर त्यांनीं घोड्यांना जलद चालण्याचा इषारा केला. तो करतांच सर्वांचे घोडे दौडीच्या चालीनें सुटले. मग अर्थात् संभाषण बंद पडलें.

योग्य वेळानें ही चारी माणसें नांदेड ह्या गांवीं पोचून आपआपल्या घरीं गेलीं.

---

प्रकरण ९ वें.

## धोंडीबाची निराशा.

विजापुरच्या वाटेवर नांदेडपासून दोन तीन कोश दूर असलेल्या जंगलांत मालिनी, अरुंधती, गजानन, आणि पुंडरीक, ह्यांच्यावर केंजळगडाहून नबाबाच्या हुकमानें आलेल्या चार मुसलमानांनीं हल्ला केला, तेव्हां मराठ्यांनीं दोन मुसलमानांस जखमी केलें, आणि दुसऱ्या दोन मुसलमानांस शरण यावयास आणि माफी मागायला लावलें, हा वृत्तांत वाचकांना विदित आहेच. तसेंच ह्या हल्ल्याचा प्रतिकार केल्यानंतर हे मराठे प्रवासी पुढें चालूं लागले आणि कांहीं वाटपर्यंत त्यांची सोबत करून पुंडरीक आपल्या घराकडे परत आला, हाही वृत्तांत वाचकांना विदितच आहे. आतां पराभूत झालेल्या चार मुसलमानांची पुढची हकीगत वाचकांना सांगतों.

जंगलामध्यें गजानन, अरुंधती, मालिनीबाई आणि पुंडरीक, ह्यांच्यावर चार मुसलमानांनीं केलेल्या हल्ल्याचा प्रतिकार करून ते चार प्रवासी तेथून बरेचसे दूर जाईतोंपर्यंत ह्या मुसलमानांचें एकमेकांशीं कांहीं संभाषण चाललें नव्हतें. परंतु आतां पुढें काय करावयाचें यासंबंधानें त्यांच्या मनांत विचार चाललेले होते. मराठे प्रवासी दिसेनातसे होईतोंपर्यंत जाफर आणि इब्राहीम,—ज्यांना लढाईमध्यें विशेषसा मार बसला नव्हता,—ते आपल्या जखमी सोबत्यांची स्थिति पहात होते, आणि पुढें काय करावयाचें यासंबंधानें बोलत होते.

इब्राहीम म्हणाला, " खानसाहेब, आतां पुढें काय करावयाचें ? "

जाफर म्हणाला, " पुढें काय करावयाचें म्हणजे ? बंडोबाचे दहा गडी भाड्यानें आणून पुन्हा त्या मराठे प्रवाशांवर हल्ला करून अरुंधतीला पकडावयाचें आणि नबाबसाहेबांपुढें तिला नेऊन उभी करावयाची. आणि बक्षीस मिळवावयाचें, दुसरें काय ? "

तेव्हां इब्राहिम म्हणाला, " पण खानसाहेब, आपण दोघांनीं कसम खाल्ली आहे तिची वाट काय ? पुन्हां आम्ही तुम्हाला उपद्रव करणार नाहीं अशी कसम तुम्ही खाल्ली आहे आणि मीही खाल्ली आहे, ती आपण मोडली असें होईल ना ? "

तेव्हां जाफर खो खो करून हसला आणि हसण्याची लहर ओसरल्यावर म्हणाला, " इब्राहीम, तूं बिलकुल गाढव आहेस ! कसम कसची घेऊन बसला आहेस ! आपण गाजर मोडून खातों, तें तुला ठाऊक आहे. आपण गाजर आधीं मोडतों आणि मग खातों. पण कसम आधीं खातों आणि मग मोडतों. गाजर आणि कसम ह्या दोहोंत असा फरक आहे ! कसम पाळीत बसून आपला लाभ होईल कसा ? बचावासाठीं कसम बेलाशक खावी आणि फायदा होत असेल तेव्हां ती बेलाशक मोडावी ! "

इब्राहीम म्हणाला, " मला कसम मोडावयाची कचर वाटत आहे असें बिलकूल नाहीं; पण तुम्हांला काय वाटतें तें जाणण्यासाठीं मी तुम्हाला विचारलें इतकेंच ! पुन्हां त्या मराठे गब्यांवर हल्ला करावयाला मी तुमच्या बरोबर येणारच ! "

हें संभाषण चाललेलें असतां जाफर आणि इब्राहीम हे आपल्या जखमी झालेल्या धर्मबांधवांच्या जखमा शक्य तितक्या त्वरेनें आणि काळजीनें बांधीत होते. हें काम समाप्त झाल्यावर त्यांना त्यांच्या घोड्यावर बसवून हे दोघेजण त्या दोघांच्या सोयीसाठीं मंद वेगानें त्या जंगलाच्या बाहेर पडण्याच्या वाटेला लागले. परंतु ही वाट नांदेडला जाणारी नव्हती किंवा विजापुरला जाणारीही नव्हती. ती वाट उंबरवाडीकडे जाणारी होती.

ह्या वाटेनें हे चार स्वार त्या जंगलाच्या बाहेर पडले आणि कांहीं अंतरावर असलेल्या एका मुसलमान शेतकऱ्याच्या घरीं आले. हा शेतकरी सुलीमान त्या सर्वांच्या चांगल्या ओळखीचा होता. दावूद आणि मसावूद हे जखमांमुळें पुढचा प्रवास करावयाला असमर्थ होते म्हणून ते तेथेंच राहिले, आणि जाफर आणि इब्राहीम उंबरवाडीकडे भरधांव वेगानें निघाले. हा गांव तेथून तीन चार कोशांवर होता.

ह्या गांवाच्या अलीकडे अर्धा पाव कोशावर इब्राहीम एका झाडाखालीं उतरला आणि त्याचा दोस्त जाफर हा एकटाच उंबरवाडी गांवाकडे निघाला.

गांवाच्या वेशीच्या आंत शिरून जाफर एका विशिष्ट रस्त्यावरील एका विशिष्ट घराच्या अंगणांत घोड्यावरून उतरला, आणि घोड्याला एका खुंट्याला बांधून तो देवडीवरच्या हिंदू नोकराला म्हणाला, " मी तुझ्या यजमानाच्या भेटीला जात आहें. ह्या घोड्यापुढें गवत टाक. त्याचा लगाम काढ आणि खोगीर न उतरतां जेरबंद सैल कर. मला लवकरच परत फिरावयाचें आहे."

असें बोलून जाफर एकदम घरांत शिरला. अत्यंत परिचित मनुष्य वर्दी न देतां जसा एकाद्या घरांत बिनदिक्कत शिरतो, तसा जाफर थेट माडीवर दडादडा पायऱ्या चढून गेला आणि " बंडोबा ! बंडोबा ! " अशा हाका मारीत मारीत एका खोलींत, जींत बंडोबा,–घराचा यजमान, बसला होता तींत,–शिरला.

ह्या वेळीं बंडोबा आसनमांडी घालून खोलीच्या मधोमध बसलेला होता. त्याच्या पुढें पूर्णपणें जळून जाऊन पांढऱ्या झालेल्या गोवऱ्यांची रास होती.

चोरीचे दागिने आटवावयासाठीं आधल्या दिवशीं लावलेल्या भट्टींतून मूस काढण्याला बंडोबा प्रारंभ करण्याच्या बेतांत होता.

अशा समयीं जाफर आलेला पाहून बंडोबा बिलकूल शरमला नाहीं, किंवा जाफरही चकित झाला नाहीं. कारण, बंडोबाचा धंदा जाफराला ठाऊक होता, आणि अशा जातीच्या कामासंबंधानें त्या दोघांचे यापूर्वीं अनेक व्यवहार झालेले होते.

बंडोबाच्या कामांत आपण व्यत्यय आणीत आहों अशा प्रकारचा संकोच न बाळगतां अगदीं घरोब्याच्या तऱ्हेनें जाफर म्हणाला, " बंडोबा, मला शक्य तितक्या जलदीनें तुमचे दहा गडी मदतीला द्या. मला त्यांची फार निकडीनें मदत पाहिजे आहे."

बंडोबानें विचारलें, " कशासाठीं तुम्हांला माझ्या दहा गड्यांची मदत पाहिजे तें थोडक्यांत सांगा तरी ! मुशाफरांवर हल्ला करावयाचा विचारबिचार आहे कीं काय तुमचा ? "

त्यावर जाफर म्हणाला, " तें मी सांगतों. पण बंडोबा, आधीं तुमच्या नोकराला माडीवर बोलवा. त्याला माझ्या ह्या कामासाठीं अगोदर रवाना करा. तुमचे दहा गडी जमे तोंपर्यंत मी आपला बेत सांगेन. तुमच्या दहा गड्यांनीं

हत्यारबंद होऊन नांदेड जवळच्या जंगलाच्या तोंडाशीं सुलीमान शेतकऱ्याच्या घराच्या आसपास सिद्ध होऊन उभें राहावें, अशी तजवीज तुमच्या नोकराला करावयाला सांगा. ही तजवीज होत आहे, तोंपर्यंत मी माझा बेत तुम्हांला सांगतों."

"ठीक आहे," असें जाफराला उत्तर देऊन बंडोबानें आपल्या नोकराला हाका मारून वर बोलावलें. नोकर येतांच त्याला बंडोबा म्हणाला, "अरे सुभान्या, हमीदाकडे आतांच्या आतां जा, आणि दहा गड्यांना हत्यारबंद होऊन सुलीमान शेतकऱ्याच्या घराजवळ उभें राहाण्याची तजवीज कर असें त्याला सांग. जा, पळ, घाई कर."

सुभान्या "बरें आहे," असें बंडोबाला उत्तर देऊन आपल्या कामगिरीवर रवाना झाला. तेव्हां बंडोबा म्हणाला, "जाफरसाहेब, सांगा आतां मला तुमचा बेत."

जाफर म्हणाला, "सांगतों ऐका. केंजळगडावर अरुंधती ह्या नांवाची एक अत्यंत सुंदर पोरगी आहे. तिच्यावर आमच्या नबाबसाहेबांचें मन गेलें. तिला पकडून आणावें म्हणून त्यांनीं मला हुकूम केला. मी तिच्या घरीं गेलों तेव्हां तिच्या बापानें मला ती विजापुरास आपल्या आजोळाकडे गेली असें सांगितलें. नबाबसाहेबांनीं मला ताबडतोब तिचा पाठलाग करून तिला पकडून आण म्हणून हुकूम केला. त्या हुकमाप्रमाणें मी आणखी तीन माणसें घेऊन निघालों. अरुंधती, तिची आई, गजानन म्हणून त्यांचाच एक नातलग, आणि एक सुंदर पोऱ्या, कोण तो मला ठाऊक नाहीं,—अशीं चार माणसें आम्हांला नांदेडच्या जंगलांत आढळलीं. आम्ही त्यांचेवर हल्ला केला, परंतु त्या चौघांनीं आमचा पराभव केला. माझ्या दोन शिपायांना त्यांनीं जखमी केलें, आणि मला आणि इब्राहीमला परत फिरावयाला भाग पडलें. तेव्हां आम्ही चौघे जण निराश होऊन जंगलांतून बाहेर पडलों. माझे जखमी दोस्त सुलीमानच्या घरांत शुश्रूषेसाठीं ठेवून मी आणि इब्राहीम इकडे तुमची मदत मागावयाला आलों आहों. इब्राहीम वेशीच्या बाहेर एक दोन हाकांच्या अंतरावर आहे."

बंडोबा म्हणाला, "माझे गडी मदतीला घेऊन तुम्ही पुन्हा त्या अरुंधतीचा पाठलाग करणार आहांत होय ?"

"होय !" असें जाफरनें उत्तर दिलें. तेव्हां बंडोबा म्हणाला, "माझे दहा गडी मी तुमच्या मदतीसाठीं देत आहें त्यांच्या वेतनासाठीं तुम्ही मला दहा रुपये दिले पाहिजेत."

जाफर म्हणाला, " ही तुमची नेहमींचीच शर्त असते ती मला ठाऊक आहे. मी तुम्हांला गव्यांच्या मजुरीबद्दल दहा रुपये देईन."

बंडोबा म्हणाला, "ठीक, आणि मला स्वतांला दहा रुपये दिले पाहिजेत."

जाफर म्हणाला, "हीदेखील तुमची नेहमींचीच शर्त आहे; ती मला कबूल आहे. मी तुम्हांला दहा रुपये देईन आणि तुमच्या गव्यांची मजुरी दहा रुपये मिळून एकंदर मी तुम्हांला वीस रुपये देईन. आपण नेहमीं ह्याच शर्तीवर आज पर्यंत व्यवहार करीत आलों आहों."

बंडोबा म्हणाला, " होय, पण जाफरसाहेब, त्या प्रवासी माणसांत जो सुंदर पोऱ्या आहे म्हणून तुम्ही म्हणालां तो कोण? आणि तो कितपत सुंदर आहे?"

जाफर म्हणाला, " तो अरुंधतीचा कोण तें मला ठाऊक नाहीं. तो आमच्या केंजळगडावरचा राहाणारा नाहीं. त्याला मी पूर्वी कधींच पाहिलेलें नव्हतें. परंतु तो फार फार सुंदर आहे. त्याच्याइतका सुंदर पोऱ्या मीं आजपर्यंत कधीं पाहिलेला नव्हता."

बंडोबा म्हणाला, " जाफरसाहेब, तुम्ही म्हणतां इतका सुंदर तो असला तर तो मला पाहिजे आहे. तुम्ही अरुंधतीला पकडून नबाबाला द्या आणि त्या सुंदर पोऱ्याला पकडून माझ्याकडे घेऊन या. तसें तुम्हीं केलें तर मी वीस रुपये तुम्हाला माफ करीन आणि त्या सुंदर पोऱ्याबद्दल वीस रुपये तुम्हाला बक्षीशीदाखल देईन."

जाफर म्हणाला, " अरुंधतीला पकडून आणण्याबद्दल नबाबसाहेब मला शंभर रुपयांची बक्षीशी देणार आहेत, आणि तो सुंदर पोऱ्या तुम्हाला देण्याबद्दल तुम्ही मला वीस रुपये माफ करून आणखी वर वीस रुपये देणार आहां. म्हणजे मला अविच्छिन्न एकशेंवीस रुपये प्राप्ति होणार आहे! बेश! बरें, एव्हांना तुमचे दहा गडी सुलीमानच्या घराजवळ तयार होऊन उभे असतील. मी आतां जातों."

बंडोबा म्हणाला, " होय, पण त्या सुंदर पोऱ्याचें थोडेंसें वर्णन करून मला सांगा. तो पोऱ्या खूब सुंदर आहे काय?"

जाफर म्हणाला, " तो पोऱ्या सुंदर आहे, मोहक आहे, नाजूक आहे, लुसलुशीत आहे!"

बंडोबा म्हणाला, " हं! असा आहे! तर मग त्याला पकडून माझ्याकडे घेऊन या. मी तुम्हाला विसांच्या बद्दल तीस रुपये बक्षीशी देईन."

बंडोबाचा निरोप घेऊन जाफर तेथून उठला. अंगणांत येऊन तो घोड्यावर आरूढ झाला. मग गांवाच्या वेशींतून बाहेर पडून इब्राहीम उभा होता तेथें तो येऊन दाखल झाला. मग त्याला बरोबर घेऊन तो सुलीमान शेतकऱ्याच्या घराकडे निघाला. येथें बंडोबाचे दहा नोकर हत्यारबंद उभे होतेच. त्यांना बरोबर घेऊन जंगलांतून न जातां तो दुसऱ्या बाजूनें विजापुरच्या रस्त्याला लागला. मग हे बारा मुसल्मान घोडे भरधाव फेकून अरुंधती, आणि तो सुंदर पोऱ्या, ह्यांना पकडावयाच्या इराद्यानें तीरासारखे निघाले.

जाफर, इब्राहीम, आणि बंडोबाचे दहा नोकर, ह्यांनीं वायुवेगानें आपले घोडे फेकले, आणि आपण अरुंधती आणि तिच्या बरोबरच्या तीन जोडीदारांस तेव्हांच गांठूं अशी जाफरला उमेद वाटली.

सुमारें दीड दोन घटका अतिवेगानें ह्या मुसलमान पाठलाग करणाऱ्यांनीं आपले घोडे दामटले, तेव्हां त्यांना पळणारीं माणसें दुरून दिसूं लागलीं. परंतु हीं माणसें तीनच होतीं. जाफरला जंगलामध्यें अरुंधती, तिची आई, गजानन, आणि पुंडरीक, अशीं चार माणसें दिसलीं होतीं परंतु जंगलाच्या बाहेर तीं चार माणसें पडल्यावर पुंडरीक परत मागें फिरला होता, हें जाफरला ठाऊक नव्हतें. हीं तीन माणसें जाफरनें दूरून ओळखिलीं, तेव्हां तो इब्राहिमला म्हणाला, "ती अरुंधती, ती तिची आई, तो गजानन, अशीं तीनच माणसें दिसत आहेत. आपण जंगलांत पाहिला तो सुंदर पोऱ्या दिसत नाहीं."

तेव्हां इब्राहिम म्हणाला, "तो पोऱ्या दिसत नाहीं खरा. पण आपण अरुंधतीला तर पकडूं! तो सुंदर पोऱ्या न मिळाला तर न मिळूं दे."

इतकें बोलणें झाल्यावर सर्व स्वारांनीं जास्ती वेगानें आपले घोडे दामटले. पुढच्या माणसांना मागून येणाऱ्या माणसांची चाहूल अगोदरच लागली होती. त्यांनींही आपले घोडे परम वेगानें दामटिले. परंतु पुढें अडचणीची आणि बरीच वळणावळणाची वाट लागल्या कारणानें पुढच्या पळणाऱ्या माणसांना आणि मागून पाठलाग करणाऱ्या माणसांना घोड्यांना कमी वेगानें आणि भारी काळजीनें चालवावें लागत होतें.

ह्या अडचणीच्या वाटेमध्यें एक ठिकाण असें होतें कीं तेथून एकएकट्याच माणसाला जावें लागत होतें. ह्या ठिकाणांतून जातांना कर्मधर्मसंयोगानें मालिनीबाईचा घोडा सर्वांच्या पुढें होता. त्याच्या मागें गजाननाचा घोडा, आणि त्याच्या मागें अरुंधतीचा घोडा होता. मालिनी आणि गजानन हीं दोघें जण त्या अरुंध-

णीच्या वाटेंतून पार पडून पुढें झपाट्यानें गेली. परंतु दुर्दैवानें अरुंधतीचा घोडा ह्या अडचणीच्या वाटेंतून जातांना ठेंचाळला. अरुंधतीची बैठक खोगिरावरून निसटली. तिला तोल सावरतां आला नाहीं व ती धाडदिशीं खालीं पडली. जमिनीवर एक धोंडा होता त्याचेवर तिचें डोकें आपटलें, मेंदू बधिर झाला, आणि जरी तिला जखम झाली नव्हती, तरी ती दगडाच्या आघातानें मूर्च्छित झाली.

इतकें होत आहे तों जाफर,-जो पाठलाग करणाऱ्यांच्या टोळींत सर्वांच्या पुढें होता,-तो तेथें येऊन पोंहचला. अरुंधती मूर्च्छित स्थितींत आहे हें पाहून त्याला आनंद झाला. त्यानें आणि इब्राहीम आणि बंडोबाच्या दहा नोकरांपैकीं-जे एव्हांना तेथें येऊन पोंचले होते-एक हसन, ह्या तिघांनीं त्या मूर्च्छित बालिकेला जाफरच्या घोड्यावर बसविलें, घोड्याच्या पोटाखालीं दोरी घालून त्यांनीं तिचे घोटे बांधून टाकले, नंतर तिचे बाहु तिच्याच अंगाशीं त्यांनीं जखडून बांधले. मग जाफर टांग टाकून त्या घोड्यावर आरूढ झाला, आणि त्यानें आपल्या डाव्या बाहूनें त्या पवित्र कुमारीला आपल्या अपवित्र अंगाशीं घट्ट आवळून धरलें. ती हतभाग्य पोरगी अझूनही मूर्च्छित स्थितींतच होती.

जाफरनें आपल्या घोड्याचें तोंड केंजळगडाच्या वाटेकडे वळविलें, आणि घोड्याला टांच मारावयाच्या अगोदर तो इब्राहीमला ह्मणाला, "इब्राहीम, बंडोबाच्या ह्या नोकराला वीस रुपये दे."

इब्राहीमनें त्या नोकराला वीस रुपये मोजून दिले, तेव्हां जाफर त्याला म्हणाला, "करीम, हे रुपये तूं बंडोबाला दे आणि येथें घडलेली हकीगत त्याला सांग. तो सुंदर पोऱ्या मात्र सांपडला नाहीं असें त्याला सांग. आतां तुमच्यापैकीं एका इसमानें आमच्या बरोबर यावें आणि बाकीच्या नऊ इसमांनीं उंबरवाडीकडे जावें.

याप्रमाणें व्यवस्था लावून जाफर, इब्राहीम आणि हमीद,—बंडोबाचा नोकर,-असे तिघे जण परत केंजळगडाकडे भरधांव घोडे फेकीत निघाले. बंडोबाचे बाकीचे नऊ स्वारही उंबरवाडीकडे जावयाला निघाले.

दवा दोन टोळ्यांची कांहीं वाट समान होती. पुढें वाट फुटली तेव्हां तीन स्वार तोंड्याटेनें गेले, आणि नऊ स्वार दुसऱ्या वाटेनें गेले.

रत्यांहीं वेळानें अरुंधतीची मूर्च्छा नाहींशी होऊन ती पूर्णपणें शुद्धीवर आली. फोळपर्यंत जो प्रकार घडला तो तिला मूर्च्छा येई तोंपर्यंतचा मात्र आठ-

चला. पुढचा प्रकार तेव्हांच तिच्या तर्कांत आला. आपणाला पकडून हे मुसलमान केंजळगडाकडे नेत आहेत हें तिच्या विचारांत येतांच तिला भारी दुःख झालें. आपणाला जखडून बांधून टाकलें आहे, हेंही तिला कळून आलें. आपणाला ह्या मुसलमानांना कोणत्याही प्रकारें प्रतिरोध करतां यावयाचा नाहीं हें तिच्या मनांत येऊन ती भारी दुःख पावली. आपण धडपड करून पळून जाऊं शकूं, हीही गोष्ट तिला अशक्यच वाटली. परंतु तिला आपल्या आईची आणि गजाननाची काय स्थिति आहे हें जाफरला विचारल्याशिवाय राहवेना. तिनें त्याला अनेक प्रश्न विचारले. माझी आई कोठें आहे ? गजानन कोठें आहे ? त्यांना कांहीं इजा झाली आहे काय ? इत्यादि अनेक प्रश्न तिनें जाफरला विचारले; परंतु त्यानें एकाही प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं, त्यामुळें त्या दोन नातलग माणसांसंबंधानें तिची संदिग्धता कायम राहिली. येथें बोलण्याचा कांहीं उपयोग नाहीं हें पाहून तीही स्तब्ध राहिली, आणि जो जो प्रसंग येईल त्या त्या प्रसंगाला तोंड देण्याचा निश्चय करून मनांतल्या मनांत तिनें देवाचा धांवा आरंभिला.

अडचणीच्या वाटेमध्यें जो प्रकार झाला तो अत्यंत अल्प कालावधींत झाला होता. मालिनीबाई आणि गजानन हीं दोन माणसें पुढें झटकलीं. त्यांना आपल्यामागून अरुंधती येत नाहीं हें कळून आलें तेव्हां तीं आश्चर्यानें आणि दुःखानें मागें फिरलीं. परंतु तीं त्या अडचणीच्या ठिकाणीं येतात तों त्यांना अरुंधतीचा घोडा मात्र तेथें उभा असलेला दिसला. अरुंधतीचें काय झालें हें त्यांना समजेना. कारण तिला पकडून नेणारीं माणसें एव्हांना कितीतरी लांब गेलीं होतीं. तीं त्यांना दिसत नव्हतीं किंवा त्यांच्या घोड्यांच्या टापांचाही आवाज त्यांना ऐकूं येत नव्हता !

मालिनी आणि गजानन यांना अरुंधतीबद्दल शोक करावयाला आणि आतां यापुढें काय करावयाचें याचा विचार करावयाला बसवून आपण अरुंधतीचें पुढें काय झालें हें पाहूं.

धोंडीबा विजापुरच्या वाटेनें मंद गतीनें चालला होता, हें वाचकांना ठाऊक आहे. त्याच्या कानांवर घोड्यांच्या टापांचा आवाज आला. हा आवाज उत्त- रोत्तर वाढत गेला. कांहीं वेळानें हे घोडेस्वारही धोंडीबाच्या दृष्टिपथांत आले आणि " मला कोणी तरी सोडवा हो सोडवा, " अशी उच्च स्वरांत उच्चारलेली आरोळी त्याच्या कानांवर येऊन आदळली.

धोंडीबानें त्या तीन घोडेस्वारांकडे काळजीपूर्वक नजर लाविली. तों त्याला दिसलें कीं पुढच्या घोडेस्वारानें डाव्या हातानें एका मुलीला कवळलें होतें, तिला तो पळवून नेत असावा आणि तीच मदतीसाठीं ओरडत असावी, असें धोंडीबानें ताडलें. मागचे दोन घोडेस्वार त्या पुढच्या घोडेस्वाराचे मदतनीस असावे, असेंही धोंडीबानें ताडलें.

हे तीन घोडेस्वार दौडत येत होते म्हणून धोंडीबा त्यांना वाट सोडून पण त्यांच्यावर नजर करून पाहात उभा राहिला.

पुढच्या घोडेस्वाराकडे धोंडीबानें न्याहाळून पाहिलें. त्यानें डाव्या बाहूनें कवळलेल्या मुलीच्या तोंडाकडेही त्यानें पाहिलें. तों त्यानें ती आपलीच मुलगी अरुंधती आहे असें ओळखिलें. शिवाय, ती एकसारखी ओरडत होती म्हणून तिच्या आवाजावरूनही त्याची खातरी झाली कीं ती आपलीच मुलगी होय. तिनेंही धोंडीबाला ओळखून "बाबा, मला सोडवा!" अशी किंकाळी फोडली.

धोंडीबानें प्रसंगावधानानें, धाडसानें, आणि शिताफीनें जाफरच्या घोड्याचा लगाम पकडला. परंतु घोडा भरधांव दवडत असल्याकारणानें त्याच्या हाताला जोराचा हासडा बसून त्याची पक्कड निसटली. घोडा निसटून पुढें भरधांव निघाला तो क्षणांत धोंडीबाच्या नजरेच्या टप्याबाहेर गेला! परंतु तेवढ्यानें धोंडीबा हताश झाला नाहीं. त्याच्याजवळ कांहीं हत्यार नव्हतें. तेव्हां त्यानें प्रसंगावधानानें जमिनीवरून दोन धोंडे उचलून घेऊन ते मागून येणाऱ्या दोन घोडेस्वारांच्या टाळक्यांत नेमबंध रीतीनें हाणले. पुढचा घोडेस्वार जाफर हा पार निघून गेलेला होता. परंतु मागून येणाऱ्या दोन घोडेस्वारांवर धोंडीबानें अचूक नेम धरून धोंडे मारले. पहिला धोंडा एका स्वाराच्या डोक्याला लागून मोठी जखम झाली आणि तो धोंड्याच्या आघातानें आणि जखमेनें बेशुद्ध होऊन जमिनीवर धाडदिशीं आदळला. मागल्या घोडेस्वाराच्याही टाळक्यांत धोंडा बसल्याकारणानें तोही बेशुद्ध होऊन खालीं आदळला. परंतु त्या दोघांही घोडेस्वारांचे पाय रिकीबींमध्यें अडकलेलेच राहिले होते म्हणून दवडत जाणाऱ्या घोड्यांमागून ते फरपटून ओढले जात होते. अर्थात् त्यांचे दंड, तोंडें, नाकें, डोकीं, पोटें, पाठी, हीं अंगें रस्त्यावरील दगडांनीं ओरबाडलीं जाऊन रस्त्यांत ठिकठिकाणीं रक्ताचे थेंब पडत होते.

परंतु अरुंधतीला पळवून नेणारा मुसलमान जो निसटला तो निसटलाच

आणि त्याच्याच वेंघेंत अरुंधती असल्याकारणानें तिचा बचाव करणें धोंडीबाला अशक्य झालें.

ह्या तीन मुसलमानांपैकीं अरुंधतीला घोड्यावरून वाहून नेणारा जाफर होता हें धोंडीबानें ओळखिलें. त्याच्या मागचा घोडेस्वार इब्राहीम होता, तोही धोंडीबानें ओळखिला. तिसरा मुसलमान केंजळगडावर राहाणारा नव्हता. तो उंबरवाडीकडचा होता म्हणून तो जाफरानें आयत्या वेळीं मदतनीस मिळविला असेल असें धोंडोबानें तर्किलें. नबाबाच्याच हुकमावरून ते तिला पकडावयाला गेलेले असावे असा त्यानें तर्क केला. परंतु आपल्या बायकोचें आणि गजाननाचें काय झालें ? त्या दोघींना ह्या मुसलमानांनीं कोठें पकडलेलें असेल काय ? आपल्या बायकोला त्यांनीं ठार मारलेलें असेल काय ? असे नानाप्रकारचे प्रश्न धोंडीबाच्या मनांत कल्लोळ उडवून देत होते. तो जागच्या जागीं वेड्यासारखा रस्त्यांतच उभा राहिला !

---

## प्रकरण १० वें

# चित्रांचा महाल.

केंजळगड हा किल्ला सातारा जिल्ह्यांत वाईच्या ईशान्य दिशेस दहा बारा मैलांवर महादेवाच्या डोंगरांत मांधारदेव ह्या नांवाचा एक सुळका आहे त्याचेवर बांधलेला आहे. ह्या सुळक्याचा माथा सपाट असून तो सुमारें सवाशें कदम लांब आणि पाऊणशें कदम रुंद असा आहे. हा सुळका समुद्राच्या सपाटीवर सुमारें पांच हजार फूट असून तो साऱ्या साताऱ्या जिल्ह्यांत अत्यंत उंच असा आहे.

ह्या डोंगरी किल्ल्याचा तट मोठमोठ्या दगडांनीं बांधलेला असून त्यांत दोन दरवाजे आहेत. एक दरवाजा उत्तराभिमुख असून त्याला दिल्ली दरवाजा असें नांव आहे. दुसरा दरवाजा पूर्वेकडे असून त्याला चोर दरवाजा असें म्हणतात.

ह्या किल्ल्यांत लहान मोठीं अशीं दहा बारा टांकीं आहेत.

तटाच्या आंत नबाबसाहेबांचा मोठा वाडा असून त्याच्या अधिकाऱ्यांचे दहा बारा वाडे अंतरा अंतरावर बांधलेले आहेत. ह्या वाड्यांनीं व्यापून शिल्लक राहिलेल्या जागेंत आणि तटाच्या भिंतीजवळ लहान लहान झोपड्या आहेत. त्यांत नबाबाचे आणि अधिकाऱ्यांचे नोकर चाकर राहात असत. शिवाय लोहार, शिंक-

लगार, सुतार, शिंपी, रंगारी, जिनगर, मशालजी, वगैरे कारागीर लोकांच्या कुटुंबांचीही तेथें वसति होती.

शिबंदीचा कांहीं भाग, कांहीं तिरंदाज, कांहीं गोलंदाज, वगैरेंचीही ह्या गडांत रहाण्याची सोय होती.

केंजळगड हा किल्ला महादेवाच्या डोंगराच्या एका सुळक्यावर बांधलेला आहे असें आम्ही वर म्हटलें आहे. ह्या महादेवाच्या डोंगराच्या सपाटोवर आणि गडाच्या तीन बाजूंनीं एक विस्तीर्ण पटांगण असून त्याच्या सभोंवतीं तट बांधलेला आहे. त्यालाही लहान मोठे चार दरवाजे होते. पटांगणाच्या आंत सुमारें शंभर घरें होतीं, आणि त्यांत गडावरचे लहान लहान अधिकारी राहात. कारागीर लोकांचीं कुटुंबेंही ह्या ठिकाणीं राहात असत. मांधारदेव सुळक्याचा पृष्ठभाग संकुचित असल्याकारणानें तेथें पुष्कळ वसति राहूं शकत नसे. वर मुख्य मुख्य अधिकारी आणि त्यांचे नोकर हेच काय ते राहात असत, आणि ह्या खालच्या पठारावर इतर किरकोळ अधिकारी, नोकर, चाकर, वगैरे राहात असत. शिवाय रिसाल्याचा मोठा भाग, घोड्यांच्या पागा, तोफा, दारूगोळा, धान्यांचीं कोठारें, गायी म्हशींचे गोठे, वगैरेंची सोय महादेवाच्या पठारावर असे. सारांश, महादेवाच्या डोंगरावरील विस्तीर्ण आणि बंदिस्त असें पटांगण, आणि मांधारदेव सुळक्यावरील बंदिस्त जागा, ह्या दोहोंचा मिळून केंजळगड किल्ला बनलेला होता, असें म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं.

मांधारदेव हा सुळका महादेवाच्या डोंगराच्या एका कडेला आहे आणि ह्या सुळक्याच्या पायथ्याशीं जें पटांगण होतें, त्याच्यासभोंवतीं तीन बाजूंनीं भक्कम तटबंदी होती असें आम्ही वर म्हटलें आहे. चवथ्या बाजूला भयंकर लंबरूप कडा तुटलेला असल्या कारणानें त्या बाजूचें संरक्षण निसर्गानेंच केलेलें होतें. त्या बाजूला मानवी कृतीचा तट उभारण्याचें कांहीं कारणच नव्हतें. त्या बाजूला सुळक्याच्या कांठाशीं एक जुनाट औदुंबराचा वृक्ष होता, सात आठ लिंबोण्याचीं लहानमोठीं झाडें होतीं व दोन तीन पळसांचीं झाडें होतीं. तसेंच तो प्रदेश उंच सखल आणि धोंडाळ असल्याकारणानें तो अगदीं निरुपयोगी होता. माणसांनीं खाल्लेल्या जनावरांचीं हाडें, शिंगें, पायांचे खूर, वगैरेंचा तेथें ढीग झालेला होता, आणि त्यामुळें तिकडे कोणी माणूस किंवा जनावर फिरूक होत नसे.

खालच्या बंदिस्त पठारावरून वरच्या बंदिस्त सुळक्याकडे जावयाला डोंगर खोदून अनेक वाटा केलेल्या होत्या. त्या बहुतेक शिडीवजा आणि ओबडधोबड

होत्या. ह्या वाटा अर्थात् वरच्या तटबंदीच्या खालून केलेल्या होत्या. त्यामुळें जनावरें फार करून वर ठेविलीं जात नसत. तसेंच तोफा वगैरे लढाऊ सामान वर अगदीं जुजबी तेवढेंच ठेवलें जात असे.

मोठ्या वस्तूला लहान वस्तूची उपमा द्यावयाची झाली तर आम्ही असें म्हणूं कीं केंजळगड हा किल्ला दुमजली घराप्रमाणें होता. महादेवाच्या डोंगराचा पृष्ठभाग हा खालचा मजला, आणि मांधारदेवाच्या सुळक्याचा पृष्ठभाग हा दुसरा मजला होता, अशी ओबडधोबड उपमा आम्ही ह्या किल्ल्याला देऊं.

दिल्लीदरवाजा आणि शिद्दीदरवाजा हे खालच्या तटबंदीच्या बाहेरून होते, आणि त्याकडे जाणारे रस्ते रुंद रुंद होते तरी फार चढणीचे होते. त्या रस्त्यांत माणसें मात्र वर जाऊं शकत असत. जनावरें, तोफा वगैरे अवजड सामान ह्या रस्त्यांनीं नेतां येत नसे.

ह्या दोन दरवाज्यांशिवाय आणखी एक दरवाजा होतो. तो नबाबसाहेबांच्या खाजगी उपयोगाचा होता. तो दरवाजासुद्धां खालच्या तटाच्या बाहेरून होता. जेव्हां नबाबसाहेबांना गुप्त रीतीनें गडांतून बाहेर जावयाचें असेल, तेव्हां ते ह्या दरवाजाचा उपयोग करीत असत. ह्या दरवाजानें नबाबांच्या राहत्या वाड्यांतील खाजगी दिवाणखान्यांत प्रवेश होत असे. जाफरनें अरुंधतीला ह्याच दरवाज्यानें नबाबसाहेबांकडे नेलें.

अरुंधतीला जाफरनें नबाबसाहेबांच्या पुढें उभें केलें, तेव्हां विषयी नजरेनें तिच्याकडे दृष्टि लावून नबाबसाहेब म्हणाले, " ही खरोखर स्वर्गीची परी आहे. जाफर, तूं फार उत्तम कामगिरी केलीस. ही घे तुझी बक्षिशी. "

असें बोलून नबाबानें त्याच्या हातावर एक नाण्यांनीं भरलेली पिशवी ठेविली. ती घेऊन आणि सलाम करून जाफर तेथून निघून गेल्यावर त्या महालांत अरुंधती आणि नबाब ह्यांचेशिवाय कोणी माणूस नव्हतें.

नबाबसाहेब विषयी दृष्टि तिच्या मुखावर निविष्ट करून तिला म्हणाले, " हे सुंदरी, हे परी, तूं दमलेली आहेस, तूं श्रमलेली आहेस, तूं घाबरलेली आहेस. कांहीं दिवस तुला विश्रांति मिळाली, म्हणजे तूं टवटवीत होशील, तुझी भीति नाहींशी होईल, आणि तूं माझ्या जनानखान्यांत आनंदानें राहूं लागशील. माझ्या वाड्यांतील सोयी, विलासाचीं साधनें, खाद्यपेयांची समृद्धि, दागदागिने, मूल्यवान् लुगडीं, इत्यादि जिनसा तूं पाहिल्यास, म्हणजे तुला जन्मभर येथेंच राहावें असें

वाटूं लागेल, आणि आज जरी तूं येथें राहावयाला कबूल नसलीस, तरी दहा बारा दिवसांनीं खचित कबूल होशील. तुझें आईबापांच्या वियोगाचें दुःख कमी होईल. माझ्या जनानखान्यांतील सगळ्या स्त्रिया पूर्वी जरी नाखूष होत्या तरी आतां त्या सगळ्या आनंदांत आहेत. तूंही कांहीं दिवसांनीं मोठ्या आनंदानें येथें राहूं लागशील."

नबाबाची ही चर्पटपंजरी अरुंधती मुकाट्यानें ऐकून घेत होती. तिच्या तोंडावर प्रथम रागाची मुद्रा दिसत होती, नंतर तुच्छतेची मुद्रा दिसूं लागली, नंतर करारीपणाची मुद्रा दिसूं लागली.

नबाबाचें वात्रटपणाचें भाषण संपलें तेव्हां ती धीटपणानें त्याच्या मुखावर नजर स्थिर करून म्हणाली, "नबाबसाहेब, मी तुमच्या आश्रयाला राहावयाला आनंदानें कबूल होईन ही तुमची आशा व्यर्थ आहे. मला हिंदूधर्मांत राहून आणि हिंदूंच्या चालीरीतीप्रमाणें आयुष्याचीं कर्तव्यें करून जें सुख होईल, तें तुमच्या जनानखान्यांत राहून आणि मूल्यवान सणंगें नेसून आणि हिऱ्यामोत्यांचे दागिने घालून होणार नाहीं. तुम्ही व्यर्थ आशा करीत बसूं नका, आणि एकदम मला माझ्या आईबापांकडे पाठवून द्या."

तेव्हां नबाब खजील न होतां म्हणाला, "तूं मूर्ख पोरगी आहेस. तुझ्या बापाला मशाली करून वर्षाला जितके पैसे मिळतात, तितके तुला रोज मी चोळी बांगडीसाठीं म्हणून बक्षीस देईन. तुझा बाप मशाली करतो आणि तुला नवरा मिळेल तो रस्तेझाडू मिळेल. माझ्या दिवाणखान्यांत रहा आणि ऐषआरामांत दिवस घालीव."

हें नबाबाचें भाषण ऐकून अरुंधती रागानें लाल झाली आणि म्हणाली, "नीतीनें आणि धर्मानें वागून गरींबींत आयुष्य घालवून होणाऱ्या सुखापुढें तुमच्या आश्रयाला राहून पापें करून आणि अधर्मानें वागून स्वर्गाचें सुख मिळत असलें तरी तें मला तुच्छ वाटतें. माझ्या बापानें मशाली केल्या तरी मला लाज वाटत नाहीं किंवा माझ्या नवऱ्यानें रस्ते झाडले तरी त्याची मला लाज वाटणार नाहीं. मला मुकाट्यानें माझ्या आईबापांकडे पाठवून द्या."

तेव्हां नबाब म्हणाला, "तूं जशा नीतीच्या आणि धर्माच्या लांब लांब बाता मारीत आहेस, तशाच सगळ्या पोरी मारतात; पण आठ पंधरा दिवसांनीं त्या नरम होतात; माझ्या आश्रयाला राहून सुख भोगावयाला तयार होतात आणि

आनंदानें कालक्रमण करूं लागतात. तुला मी आतां तुझ्यासाठीं तयार केलेल्या दिवाणखान्यांत न्यावयाला सांगतों. तेथें तूं आठ दहा दिवस राहिलीस म्हणजे तुला आईबापांच्या वियोगाचें दुःख वाटेनासें होईल, आणि तूं माझ्या बाहुपाशांत धांवत येशील आणि मला चुंबन द्यायला आपला गाल वर करशील."

असें म्हणून नबाबानें एक चांदीची घंटा वाजविली. तेव्हां तेथें एक हबशी स्त्री आली. अरुंधतीला चित्रांच्या महालांत घेऊन जा अशी तिला नबाबानें आज्ञा करतांच तिनें त्या हतभाग्य अरुंधतीचें मणगट धरून तिला तेथून नेलें, आणि तिच्यासाठीं नियत करून ठेवलेल्या दिवाणखान्यांत तिला सोडून तिनें त्याचें दार बंद करून टाकलें.

अरुंधतीला ज्या महालांत ठेवलेलें होतें, तो महाल सुमारें ऐंशी हात लांब, साठ हात रुंद, आणि दोन अडीच पुरुष उंच होता. तो महाल इतका विस्तीर्ण होता, तरी त्यांत खांब मुळींच दिसत नव्हते, ते भिंतींच्या गर्भांत गेलेले होते.

ह्या महालाच्या चारी भिंतींच्या माथ्याशीं मोठमोठालीं गवाक्षें होतीं. त्यांतून भरपूर उजेड आंत येऊं शकत होता. ह्या गवाक्षांत भक्कम लोखंडी गज बसविलेले होते.

ह्या महालाच्या लांबीच्या भिंतींना दोन मोठमोठाले आरसे टांगलेले होते. रुंदीच्या एका भिंतींत दरवाजा होता, आणि दुसऱ्या भिंतींत एक लहान दार होतें. त्यांतून पंचधावनाच्या खोलींत जाण्याची वाट होती. ह्या खोलींत पाण्याचीं भांडीं सदा भरलेलीं असत.

दोन आरसे आणि दोन दारें खेरीज करून भिंतींचें जें क्षेत्रफळ उरलेलें होतें, त्याचेवर खऱ्या आकाराचीं चित्रें सुंदर आणि टिकाऊ रंगांत काढलेलीं होतीं. हीं चित्रें बीभत्स होतीं. ह्या महालाला चित्रांचा महाल असें नांव होतें, आणि ह्या महालांत जनानखान्यांतील स्त्रियांना आणि पकडून आणलेल्या सुंदरींना प्रवेश करण्याची परवानगी असे. दुसऱ्या कोणाही स्त्रीला किंवा नबाबाशिवाय कोणाही पुरुषाला हा महाल दिसलेला नव्हता.

असो. ह्या महालांत त्या हबशी स्त्रीनें अरुंधतीला आणून सोडल्यावर अरुंधतीनें एकदा सभोंवार दृष्टि फेंकली. आतां आपणाशिवाय दुसरें कोणी माणूस ह्या महालांत नाहीं असें पहातांच तिनें इतका वेळपर्यंत आपल्या मनावर जी जबरदस्त नियंत्रणा घालून आपले विकार आंतल्या आंत चेपून टाकले होते, ती

नियंत्रणा सईल पडली. तिचे विकार तिला आतां चेपून ठेववेनात. ती ओकसाबोकशी रडली.

आईबापांपासून ती वियुक्त झालेली होती ह्याबद्दल तिला वाटत असलेलें दुःख; केंजळगडापासून एका दिवसाच्या वाटेवर आपला बाप उघड्या बोडक्या स्थितींत आपणांला दिसला, तो कांहीं तरी संकटांत सांपडलेला असल्याकारणानें दिसला असला पाहिजे, म्हणून तिला वाटत असलेली चिंता; तसेंच नबाबसाहेबानें आपणाला पकडून ठेवलें आहे आणि तो आपली विषयवासना तृप्त करण्यासाठीं आपल्याला छळणार आणि गांजणार म्हणून तिला वाटत असलेली भीति; हे सर्व मनोविकार तिनें इतका वेळपर्यंत मनांतल्या मनांत चेपून ठेवले होते. हे सर्व मनोविकार तिनें नबाबापुढें उभी असतांना मुद्रेवरून प्रकट होऊं दिले नव्हते. नबाबाशीं बोलतांना ती धिटाईनें आणि करारीपणाच्या स्वरानें बोलत होती. परंतु आतां आपल्याजवळ ह्या महालांत कोणीही माणूस नाहीं असें पाहातांच तिचा धीटपणा पार नाहींसा झाला; तिचा मनोनिग्रह पार ढांसळला. तिच्या स्वभावाचा घट्टपणा आणि करारीपणा सईल पडला. तिचें दुःख, तिची चिंता, तिची भीति, इत्यादि मनोविकारांनीं तिच्यावर आपलें वर्चस्व स्थापित केलें, आणि ह्या वर्चस्वाचा परिणाम रोदनाच्या रूपानें प्रकट झाला. ती रडली; ती पुष्कळ वेळ रडली; पण, त्या बिचारीची समजूत घालावयाला तिच्याजवळ कोण मायेचें माणूस होतें ? कोणी नव्हतें ! ती हतभाग्य पोरगी रड रड रडली !

इतका वेळपर्यंत आंतल्या आंत कोंडून ठेवलेल्या तिच्या मनोविकारांना अश्रूंच्या रूपानें वाव मिळाल्याकारणानें तिला पुष्कळ आराम वाटला. मग पुन्हां हळू हळू तिच्या मनाचा नैसर्गिक घट्टपणा आपलें वर्चस्व तिच्या मनावर स्थापूं लागला. तिचें मन पुन्हां घट्ट झालें, आणि ती आपल्याशीं म्हणाली, "माझ्यावर प्रसंग पडला आहे खरा; माझे आईबाप संकटांत सांपडले आहेत खरे. आम्ही तीन माणसें तीन ठिकाणीं आहों हेंही खरें. चिंता करण्याजोगी आम्हां तिघांची आज स्थिति आहे हेंही खरें आहे. पण रडून काय उपयोग ? ह्या स्थितींतून पुन्हां सुखाच्या स्थितींत कसें जातां येईल ह्याचा विचार केला पाहिजे; मन घट्ट केलें पाहिजे. शांतपणानें विचार केला पाहिजे. कांहीं तरी युक्त्या, तजविजी, हिकमती, मनांत योजल्या पाहिजेत, आणि येथून आपली सुटका करून घेतली पाहिजे. सुटका होणें शक्य झालें नाहीं, तरी निदान अत्यंत कठिण प्रसंगीं आपल्या बचावाचें कांहीं तरी साधन आपल्या हस्तगत करून घेऊन ठेवलें

पाहिजे." असा विचार करून अरुंधती त्या सर्व महालांत हिंडली. ह्या महालाला दारें किती आहेत, खिडक्या किती आहेत, हें तिनें पाहिलें; त्यांतून पळून जाणें कितपत शक्य आहे ह्याचा तिनें विचार केला.

नंतर तिनें त्या महालांत ठेवलेल्या वस्तूंकडे नजर फिरविली. चंदनाच्या घडवंच्यांवर चांदीच्या ताटांत आणि पेल्यांत नाना प्रकारची मेवामिठाई ठेवलेली तिला दिसली. अनेक सुरयांत अनेक प्रकारचीं सरबतें तिला दिसलीं. परांनीं भरलेल्या आणि किनखाबी खोळींनीं वेष्टिलेल्या गाद्यांनीं अस्तरलेले आणि पांढऱ्या शुभ्र मच्छरदाण्यांनीं आच्छादिलेले दोन पलंग तिला दिसले. तसेंच भिंतीवर टिकाऊ रंगांनीं काढलेलीं बीभत्स चित्रेंही तिला दिसलीं. हीं चित्रें तिला अत्यंत हिडीस वाटलीं. ती प्रत्येक चित्रावर थुंकत थुंकत सर्व भिंती पहात पहात गेली. अशा रीतीनें एकवार ती सर्व महाल हिंडली. मग ती एका पलंगावर विचार करावयाला बसली.

ती अशा रीतीनें कांहीं वेळ बसली असतां फातिमा नांवाची एक शिद्दी बाई तिच्याकडे येऊन म्हणाली, " मुली, तुला दुपारीं मी जेवण घेऊन येईन. संध्याकाळीं माझी जोडीदार बाई तुला जेवण आणील. याशिवाय तुला जें कांहीं खावें प्यावेंसें वाटेल तें ह्या घडवंच्यांवर आहे तें खा आणि पी. त्या खोलींत पंचधावनाच्या सर्व सोयी आहेत. तीं त्या फडताळांत उंची उंची लुगडीं आहेत तीं नेसत जा. तुला नबाबसाहेबांची भेट व्हावी अशी इच्छा झाल्याबरोबर मला सांग म्हणजे मी त्यांना तुझा निरोप सांगेन म्हणजे ते येथें येतील, आणि तुझ्या समागमें आनंदांत काळ घालवितील. मुली, व्यर्थ हट्ट करूं नको. नबाबसाहेबांचे मनोरथ लवकर सफल कर म्हणजे तुला येथें राणीप्रमाणें सुखांत राहावयाला सांपडेल आणि तुझ्या बापाचें जन्माचें दारिद्र्य फिटेल..."

याप्रमाणें ती शिद्दी बाई बोलत असतां पहिल्यानें अरुंधती तिचें भाषण मुकाट्यानें ऐकून घेत होती, पण पुढें पुढें ती शिद्दी बाई, अरुंधतीचें पापमार्गाकडे मन वळवूं लागली, तेव्हां अरुंधती तिला रागानें म्हणाली, "हडळी, तोंड बंद कर आणि येथून निघून जा."

त्यावर ती शिद्दी बाई म्हणाली, " पोरी, सगळ्या पोरी ज्या येथें येतात त्या पहिल्या पहिल्यानें साध्वीपणाचा असाच देखावा करतात. पण मग पुढें त्या नबाबसाहेबांच्या जनानखान्यांत सुखानें राहूं लागतात. तुझ्या बोलण्याचा मला

कांहीं राग वाटत नाहीं. कारण, तुझ्यासारख्या येथें आलेल्या सगळयाच पोरी अशीं दिमाखाचीं भाषणें पहिल्या पहिल्यानें करतात व मला हिडीस फिडीस करतात. पण मग नबाबसाहेबांपासून एकादा दागिना उपटावयाचा असला म्हणजे माझ्याच पायां पडतात आणि माझ्या वशिल्यानें तो दागिना मिळवितात. ”

असें म्हणून ती शिद्दी बाई आपलें महत्त्व अरुंधतीच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न करूं लागली. परंतु अरुंधती तिला निक्षून म्हणाली, “ हडळी, येथून काळें कर जा ! ”

हें अरुंधतीचें भाषण ऐकून ती शिद्दी बाई निर्लज्जपणानें हंसली आणि म्हणाली, “ मी जातें, पण इतर पोरी जशा पहिल्यानें मला तुच्छ करून नंतर माझ्या पायां पडावयाला सिद्ध झाल्या, तशी तूंही आठ दहा दिवसांच्या आंत माझ्या पायां पडशील ! बरें जातें हो मी. काळें करतें हो ! खो ! खो ! खो ! हें पहा.”

असें म्हणून ती शिद्दीबाई त्या महालांतून निघून गेली. तिनें दाराला बाहेरून कडी लावून घेतली आणि आपलें तोंड काळें केलें हें सांगणें नलगे !”

---

## प्रकरण ११ वें.

# एक गोसावी.

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगती ज्या दिवशीं घडल्या, त्याच दिवशीं म्हणजे आदित्यवारीं दीड प्रहर दिवस चढला असतां उंबरवाडीकडे जाणाऱ्या रस्त्यानें एक गोसावी मंद मंद गतीनें पावलें टाकीत चालला होता.

हा गोसावी अंगानें सडपातळ, मध्यम काठीपेक्षां थोडासा अधिक उंच आणि वर्णानें गोरा होता. त्याचे डोळे विशाल, पाणीदार आणि काळेभोर होते, त्याचें कपाळ उंच आणि बुद्धिमत्तेनें व्यंजक होतें. त्याचें नाक सरळ होतें आणि त्याचे गाल फुगीर होते; त्यावरून त्याच्या तोंडांतील एकही दांत पडलेला नव्हता हें सहज तर्कितां येण्याजोगें होतें. त्याचा चेहेरा ठसठशीत होता, आणि त्याच्या वयाची पन्नाशी उलटून गेलेली होती तरी डोक्यावरील किंवा मिशांतील किंवा दाढींतील एकही केश रुपेरी वर्णाचा झालेला नव्हता.

त्याच्या कमरेला एक लांडा पंचा गुंडाळलेला होता त्यावरून त्याच्या पोटऱ्यांचा तिखेदारपणा आणि कमरेचा बारीकपणा स्पष्टपणें दृग्गोचर होत होता. त्याच्या अंगाला राख फासलेली होती. त्याच्या डोक्याच्या लांब केशाच्या दहा

पांच दोऱ्या पाठीवर लोंबत होत्या. त्याच्या खाकोटीला एक पोतडी लोंबत होती, आणि त्याच्या उजव्या हातांत एक काळेंभोर, चकचकीत आणि गुळगुळीत नारळाचें भिक्षापात्र होतें, आणि डाव्या हातांत एक भरींव चिव्याचा सोडगा होता.

हा गोसावी उंबरवाडी गांवाच्या वेशींतून आंत शिरला तेव्हां त्याचा चेहेरा दुःखी असून त्यांत औदासिन्याची छटा मारीत होती. त्याची चाल संथपणाची होती. तो त्या गांवच्या सर्व रस्त्यांनीं, सर्व वाटांनीं, सर्व बोळांनीं हिंडला. चालतांना तो प्रत्येक घराकडे, देवळाकडे, विहिरीकडे, माणसाकडे भेदक नजरेनें पाहात होता, परंतु कोणालाही कांहीं माहिती विचारीत नव्हता.

कांहीं वस्तु पाहून त्याची मुद्रा विशेष खिन्न होत असे; कांहीं माणसें पाहून त्याची मुद्रा फार दुःखी होत असे; परंतु ज्या वस्तूकडे किंवा माणसाकडे पाहून त्याला आनंद झाला असें त्याच्या मुद्रेवरून दिसत असे, अशा वस्तु किंवा माणसें, हीं त्याला फारच थोडीं दिसत होतीं.

अशा रीतीनें हा गोसावी ह्या उंबरवाडी गांवांतून चालत असतां तो एका दुमजली घरापुढें आला. त्या घरापुढें कांहीं क्षण थांबून त्यानें त्या घरावर खालपासून वरपर्यंत आणि उजवीकडून डावीकडे भेदक दृष्टि फिरविली. त्याला त्या घराच्या माडीच्या खिडक्यांत कांहीं माणसें दिसलीं, त्यांच्या पेहेरावांवरून आणि चेहेऱ्यांवरून तीं मुसलमान माणसें होत असें ह्या गोसाव्यानें ओळखलें.

हा देखावा पाहातांच त्याच्या मुखांतून "शिव ! शिव !" असा उद्गार बाहेर पडला आणि त्याच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदूही खालीं पडले. परंतु येथें ज्यास्ती वेळ आपण उभे राहिलों तर आपले मनोविकार अधिक क्षुब्ध होतील असें त्याला वाटलें ह्मणून म्हणा, किंवा गांवचा कांहीं भाग अद्यापि आपणाला हिंडावयाचा आहे असा विचार मनांत येऊन म्हणा, तो गोसावी त्या घरापुढून निघाला.

अशा रीतीनें हिंडतां हिंडतां तो गोसावी एका रस्त्यावरील एका घरापुढें येऊन उभा राहिला. ह्या घराच्या दाराच्या चवकटीच्या माथ्यावर "मार्तंड चिमाजी पवार," अशीं अक्षरें कोरलेलीं त्यानें वाचलीं. हीं अक्षरें वाचून त्याला क्षणभर समाधान वाटलें असें त्याच्या मुद्रेवरून जरी व्यक्त झालें, तरी लागलीच त्याच्या मुद्रेवर तीव्र औदासिन्य दिसूं लागलें.

वर सांगितलेलें नांव त्यानें वाचल्यावर तो एक दोन क्षण मनांत कांहीं विचार करीत त्या घरापुढें उभा राहिला. मग लागलाच तो त्या घरांत शिरला. घरांत

शिरतांच त्यानें देवडीवरील गड्याला विचारलें, "ह्या घरांत जे गृहस्थ राहातात त्यांचें नांव काय ?"

ह्याच दिवशीं म्हणजे आदित्यवारीं कांहीं घटकांपूर्वी ज्या घराच्या यजमाना-जवळ दहा वाटमारे भाड्यानें मिळवावयासाठीं जाफर हा अत्यंत परिचित माण-साप्रमाणें शिरला होता, तेंच हें घर.

गड्यानें उत्तर दिलें, "त्यांचें नांव मला ठाऊक नाहीं. आम्हीं गडीमाणसें त्यांना धनीसाहेब असें म्हणतों. त्यांचें नांव काय असेल तें परमेश्वराला ठाऊक."

हें गड्यानें दिलेलें उत्तर आमच्या गोसाव्याला समाधानकारक वाटलें नाहीं असें दिसलें. गोसाव्यानें त्या गड्याच्या चेहऱ्यावर कांहीं क्षण भेदक दृष्टि लावून आणि त्या घरांतील जे जे भाग त्याला दिसण्याजोगे होते ते ते पाहून गड्याला म्हटलें, "भल्या माणसा, तूं आपल्या धन्याला माझी एवढी विनंती कळीव. एक गोसावी तुमच्या भेटीला आला आहे असें तुझ्या धन्याला जाऊन सांग."

"होय." असें म्हणून तो गडी देवडीवरून माडीवर गेला. एक गोसावी आपल्या भेटीला आला आहे, आणि तो देवडीवर उभा आहे, असा निरोप गड्यानें सांगितला तो ऐकून यजमान खालीं देवडीवर आला. त्यानें गोसाव्याकडे त्रासिकपणाच्या नजरेनें पाहून म्हटलें, "ए गोसाव्या, तुला काय पाहिजे आहे ?"

हा घराच्या आंतून आलेला इसम वयानें सुमारें चाळीस वर्षांचा होता. परंतु अमली पदार्थांच्या सेवनामुळें, आणि निसर्गनिषिद्ध जीवनक्रमामुळें त्याचेवर वार्धक्याची थोडथोडी छटा पडूं लागलेली होती, आणि तो तीन चार वर्षें अधिक वयाचा दिसत होता. तो मध्यम उंचीचा होता आणि अंगानें बराच सड-सडीत होता; त्याचे गाल बसलेले होते, परंतु त्याचे डोळे विशाळ होते, नासिका सरळ होती, आणि भालप्रदेश उंच होता. त्याच्या मिशांतील आणि डोक्यावरील कांहीं केश रुपेरी वर्णाचे झाले होते. त्याच्या चेहेऱ्यांत प्रेक्षकांना आकर्षण कर-ण्याचा गुण मुळींच नव्हता, आणि त्याच्या नजरेवरून तो कपटी असावा, असा प्रेक्षकांचा समज होण्याजोगा होता.

ह्या वेळीं तो गुडघ्याइतका पंचा नेसलेला होता, आणि त्याच्या अंगांत एक मळकी खादीची बाराबंदी होती.

असो. हा इसम गड्याच्या निरोपावरून गोसाव्याला भेट देण्याकरतां देवडीवर

आला. त्यानें त्रासिकपणाच्या स्वरानें गोसाव्याला, "तुला काय पाहिजे आहे ?" म्हणून विचारलें.

त्या इसमाकडे भेदक नजर करून तो गोसावी म्हणाला, "ह्या घराच्या दाराच्या माथ्यावर 'मार्तंड चिमाजी पवार' असें नांव कोरलेलें आहे. ह्याच नांवाच्या एका इसमाशीं कांहीं वर्षांमागें माझा कांहीं संबंध होता. म्हणून त्या इसमाची चौकशी करावयासाठीं मी आपल्या घरांत शिरलों आहें. तर मार्तंड चिमाजी पवार ह्या इसमासंबंधानें कांहीं माहिती आपणास असली तर ती मला सांगण्याची मेहेरबानी करा."

हें त्या गोसाव्याचें भाषण ऐकून घराचा यजमान म्हणाला, "गोसाव्या, तूं कोण हें मला आधीं समजलें पाहिजे. तसेंच तूं कोणत्या हक्कानें मला ही माहिती विचारीत आहेस तेंही मला कळलें पाहिजे. मग मला वाटल्यास मी तुला ती माहिती देईन. तुला ती माहिती द्यावयाला मी कांहीं बांधलेला नाहीं."

गोसावी म्हणाला, "आपण बांधलेले नाहीं हें मी जाणून आहें. मी ती माहिती कोणत्याही हक्कानें मागत नाहीं. मेहेरबानी म्हणून ती माहिती मी आपणाला विचारीत आहें. ती द्यावयाची आपली मर्जी नसली तर मी जातों. तसदी माफ असावी."

असें उत्तर देऊन गोसावी घरांतून बाहेर पडावयासाठीं वळला.

घराच्या यजमानाला हा प्रकार चमत्कारिक वाटला असें त्याच्या मुद्रेवरून दिसण्याजोगें होतें. त्यानें गोसाव्याला म्हटलें, "ए गोसाव्या, असा त्रागा करून तूं निघून जात आहेस; पण तुला ही माहिती कशासाठीं हवी आहे हें मला कळल्याशिवाय मी ती माहिती कशी देऊं? मार्तंड चिमाजी पवार यांचा आणि तुझा काय संबंध आहे तें मला आधीं सांग म्हणजे मी तुला त्यांच्याबद्दल पाहिजे आहे ती माहिती देतों."

तेव्हां तो गोसावी म्हणाला, "सुमारें पंधरा सोळा वर्षांमागें मी कुटुंबी होतों. संसारांतील कांहीं अडचणींसाठीं मी त्यांच्याजवळून कांहीं रक्कम उसनी घेतली होती. पुढें माझ्या संसाराची वाताहत झाली. त्यामुळें मी वैतागून गोसावी झालों. परंतु मी मार्तंड चिमाजी पवार यांचेपासून उसनी घेतलेली रक्कम माझ्या डोक्यावर ओझें घालून राहिली आहे. माझ्या प्रेमाचीं सर्व माणसें मरण पावलीं म्हणून मी उसनी घेतलेली रक्कम कांहीं मरण पावत नाहीं. मी कुटुंबी असतांना जें कर्ज घेतलें, तें मी गोसावी झाल्यानें कांहीं फिटत नाहीं. ह्या जन्मांत मी तें कर्ज

फेडलें नाहीं, तर तें पुढच्या जन्मीं तरी मला फेडावें लागेल. तें कर्ज फेडावयाला जी रक्कम पाहिजे, ती मी भीक मागून मिळविली आहे. म्हणून मी त्या इसमाची चौकशी करीत आहें. तर मार्तंड चिमाजी पवार ह्यांची आपणाला कांहीं माहिती असल्यास मला कृपा करून सांगा. ते हल्लीं हयात असल्यास कोठें आहेत तें मला सांगा."

हा त्या गोसाव्याचा प्रश्न ऐकून घराचा यजमान त्या गोसाव्याच्या मुखावर नजर स्थिर करून कांहीं क्षण मनांत विचार करीत स्तब्ध उभा राहिला. मग मनाचा निश्चय ठरल्यावर त्या गोसाव्याला तो म्हणाला, "थोडीशी खटपट केली असतां जी माहिती तुला कांहीं लोकांकडून मिळूं शकेल, तेवढीच माहिती मी तुला देईन. परंतु जी माहिती मला एकट्यालाच देतां येईल, ती मी तुला देणार नाहीं. तूं म्हणतोस तो इसम मला ठाऊक होता. तो आणि त्याची बायको अशीं दोन्ही माणसें काशीस मरण पावलीं असें मी ऐकिलें आहे."

गोसाव्यानें विचारलें, "बरें, पण त्या मार्तंडरावांना कांहीं मुलेंबाळें नाहींत काय ?"

घराचा मालक म्हणाला, "त्याला दोन मुलगे होते. त्यांपैकीं एक त्यांच्या देखत मेला. दुसरा ते काशीला असतां त्यांच्या पाठीमागें मेला."

गोसाव्यानें विचारलें, "तो कशानें मेला ?"

घराचा मालक म्हणाला, "कशानें मेला ? अरे मरावयाला थोडे का रोग आहेत ? ताप आहे, आमांश आहे, हगवण आहे, संधिवात आहे, पक्षघात आहे, सर्पदंश आहे, गोवर आहे, धनुर्वात आहे, नवज्वर आहे, विषम आहे, मधुरा आहे, कोणत्याही आजारानें मेला तरी मेलाच. अमक्या आजारानें मेला म्हणजे त्याचें सोनें होतें, आणि तमक्या आजारानें मेला म्हणजे त्याचें लोखंड होतें, असें कांहीं आहे काय ? अरे, कशानेंही मनुष्य मेला तरी त्याची राखच होऊन मातींत मिळावयाची ! मार्तंडाचा मुलगा मेला इतकें खरें. मग तो अमक्या रोगानें मेला हें तुला कळून काय फायदा ?"

हें कठोरपणाचें भाषण ऐकून त्या गोसाव्याच्या अंतःकरणांत कालवाकालव होत असल्याचें त्याच्या मुद्रेवरून सूक्ष्म अवलोकन करणाराला दिसण्या जोगें होतें, परंतु तें त्या घराच्या मालकाला दिसलें नाहीं. असो. हें उत्तर ऐकून गोसाव्यानें विचारलें, "आपण मार्तंडरावांचे कोणी नातलग आहां म्हणून ह्या घरांत

आपण राहात आहां किंवा हें घर आपण त्यांच्या पासून खरेदी केलें म्हणून आपण येथें राहात आहां तें आपण सांगाल काय ? ”

त्यावर घराचा मालक म्हणाला, “ तुझ्या रिकामटेकड्या प्रश्नांना उत्तरें द्याव-याला मला वेळ नाहीं. जा तूं आतां. मी तुला दिली इतकी माहिती तुला पुरेशी वाटत नसली तर आणखी दुसऱ्या कोणाला तरी विचार. ” मग गड्याकडे वळून घराचा मालक म्हणाला, “ सुभान्या, ह्या गोसाव्याला हाकलून देऊन दार लावून घे, आणि पुन्हा असल्या रिकामटेकड्या गोसावड्यांना घरांत येऊं देऊं नको. ”

असें भाषण करून घराच्या मालकानें पाठ वळविली. गोसावीही आश्चर्य, दुःख, संताप, उद्वेग इत्यादि भावनांनीं आक्रान्त होत्साता त्या घराच्या बाहेर पडला.

गोसावी ह्या घरांतून निघाला. त्यानें उंबरवाडी गांवांतून एकदम बाहेर पड-ण्याची वाट धरली. ह्या गांवाच्या वेशींतून आंत शिरतांना गोसाव्याची चाल संथपणाची होती आणि सर्व गांव हिंडावयाच्या इराद्यानें तो शिरला होता, आणि सर्व दिशांस भेदक दृष्टि लावून चालत होता. परंतु आतां तो जलद पावलें टाकीत टाकीत, आणि कशाचेंही अवलोकन न करतां वेशींतून बाहेर पडावयाला उत्कंठित झालेला असावा असें स्पष्ट दिसत होतें.

ह्या वेळीं ह्या गोसाव्याच्या चेहेऱ्यावर आश्चर्य, संताप, दुःख, उद्वेग, इत्यादि भिन्न भिन्न विकारांच्या छटा एकामागून एक अशा दृग्गोचर होत होत्या. सुभा-न्याच्या यजमानाच्या वर्तनांतील उर्मटपणा पाहून त्या गोसाव्याला संताप वाटत होता. मार्तंडरावाच्या मुलाच्या मरणाबद्दल बोलतांना त्यानें दाखविलेला कठोर-पणा पाहून गोसाव्याला आश्चर्य वाटत होतें, आणि एकंदरींत सर्व गोष्टींबद्दल त्याला दुःख वाटत होतें.

हा गोसावी वेशींतून बाहेर पडून आपल्या वाटेला लागला. चालतांना त्यानें एकदांसुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. तो सगळ रस्त्यानें इकडे तिकडे न पहातां झपाझप पावलें टाकीत चालत होता. त्याला तो प्रदेश आणि रस्ता चांगला ठाऊक असावा असें दिसण्या जोगे होतें.

अशा रीतीनें मार्ग आक्रमून कांहीं वेळानें हा गोसावी विजापुराहून उत्तरेकडे जाणाऱ्या रस्त्याला येऊन मिळाला.

ह्या रस्त्यानें कांहीं वेळ हा गोसावी चालून गेला, तेव्हां त्याला रस्त्याच्या एका बाजूला चिंताक्रान्त मनानें स्थाणू सारखा उभा असलेला धोंडीबा दिसला.

गोसाव्याची नजर धोंडोबाकडे गेली, आणि धोंडीबाची नजर गोसाव्याकडे गेली. अर्थात् धोंडीबाच्या मनांतील दुःखमय विचार क्षणभर बंद पडले आणि त्याचें लक्ष्य ह्या येणाऱ्या गोसाव्याकडे विशेष प्रकारें लागलें.

धोंडीबा आणि हा गोसावी ह्यांची गांठ पडून त्यांचें जें संभाषण झालें, त्याची हकीगत वाचकांना आम्ही पुढच्या प्रकरणीं निवेदूं.

---

## प्रकरण १२ वें.

# धोंडीबा आणि गोसावी.

धोंडीबा आणि गोसावी हे दोघे जण कांहीं अंतरावरून एकमेकांकडे लक्ष्यपूर्वक पहात होते असें मागील प्रकरणीं आम्ही वाचकांना सांगितलें आहे. आतां त्यांच्या गांठी, भेटी, संभाषण, वगैरे संबंधाची हकीगत सादर करतों.

हा गोसावी थेट धोंडीबाच्या जवळ येईतोंपर्यंत धोंडीबाची नजर त्याच्यावर खिळलेली होती, आणि त्याचीही नजर धोंडीबावर खिळलेली होती. दोघेही एकमेकांचें निरीक्षण पूर्णत्वानें करावयाला जणों काय निश्चित झालेले होते.

असो. हा गोसावी धोंडीबाच्या पुढें येऊन उभा राहातांच धोंडीबा त्याला दुःखाच्या स्वरानें म्हणाला, "गोसावीबोवा, तुम्हांला द्यावयाला मजजवळ एक पैसाही नाहीं, धान्याचा एक कणही नाहीं, वस्त्राची एक चिंधीही नाहीं ! तुम्ही पुढें चालूं लागा !"

यावर तो गोसावी मंदस्मित करून म्हणाला, "भल्या माणसा, मला तुमचा पैसा नको आहे, मला तुमचा धान्याचा कणही नको आहे, मला तुमच्या वस्त्राची एक चिंधीही नको आहे. परंतु माझें एक बोधवाक्य लक्ष्यांत ठेवा, इतकीच मी तुम्हाला विनंती करतों. तें बोधवाक्य हें कीं जगांत असें एकही संकट नाहीं, जगांत असें एकही दुःख नाहीं, कीं शांतवृत्तीनें वागलें असतां ज्याचा प्रतीकार करतां येणार नाहीं किंवा जें कमी असह्य करतां येणार नाहीं."

मनकवड्याप्रमाणें ह्या गोसाव्यानें आपल्या मनाची स्थिति ओळखिली हें पाहून धोंडीबाला आश्चर्य वाटलें. आपल्या मनःस्थितीवर त्यानें आपणाला उपाय सुचविला म्हणून त्याला त्याचेबद्दल कृतज्ञता वाटली, आणि तो कुतूहलपूर्ण नजरेनें त्याच्याकडे पाहून म्हणाला, "गोसावीबोवा, तुम्हीं जें बोधवाक्य मला सांगितलें त्याबद्दल मी तुमचे उपकार मानतों. परंतु आभाळ फाटलें असतां त्याला

ठिगळ मारण्याची कांहीं युक्ति तुमच्या बोधवाक्यांत तुम्हीं सांगितली नाहीं. शांत वृत्ति धारण केली असतां आकाशाला ठिगळ कसें मारलें जाईल ?"

धोंडीबाच्या प्रश्नाला उत्तर न देतां तो गोसावी म्हणाला, "तुमचें नांव काय ?"

धोंडीबानें उत्तर दिलें, "माझें नांव धोंडीबा."

तेव्हां गोसावी म्हणाला, "धोंडीबा, तुमच्या आवाजाच्या अशक्तपणावरून आणि चेहऱ्याच्या म्लानपणावरून मी असा तर्क करतों कीं बराच वेळपर्यंत तुमच्या पोटांत अन्न गेलेलें नाहीं. तुमच्या भाषणाच्या वैतागी स्वरावरून तुम्हाला कांहीं तरी दुःख झालेलें आहे आणि तुम्हाला कांहीं पंचाईत पडली आहे, असा मी तर्क करतों. माझे हे दोन्ही तर्क खरे असले तर मी तुम्हाला असें सांगतों कीं तुम्ही अगोदर कांहीं खाऊन घ्या आणि नंतर आपल्या स्थितीचा विचार करा."

धोंडीबा दोन्ही हात वर करून म्हणाला, "मी हा असा आहें, मजजवळ खावयाला कांहीं नाहीं. मजजवळ कांहीं विकत घ्यावयाला एक पैसाही नाहीं. मी हा असा आहें."

तेव्हां तो गोसावी म्हणाला, "तुम्ही मऱ्हाठे जातीचे काय ?"

धोंडीबा म्हणाला, "होय, मी मराठा आहें, आणि मी तो माझ्या बोटाच्या दिशेला पलीकडे जो गड दिसत आहे तेथला राहाणारा."

गोसावी म्हणाला, "तो केंजळगड नव्हे काय ?"

धोंडीबा म्हणाला, "होय, तो केंजळगडच. तुम्हाला ह्या प्रांताची माहिती आहे वाटतें ?"

गोसावी म्हणाला, "होय. पण त्या गोष्टी सध्यां राहूं द्या. आधीं तुम्ही कांहींतरी खाऊन घ्या. मीही जातीचा मराठा. काल एका मराठे बाईनें सात आठ भाकऱ्या मला भाजून दिल्या, त्या आपण खाऊं, आणि नंतर तुमच्या स्थितीविषयीं बोलूं."

धोंडीबाला ही सूचना मान्य झाली. नंतर तो आणि त्याचा जोडीदार असे दोघेजण जवळच्या एका ओढयाच्या कांठाशीं गेले. तेथें ते हात, पाय, तोंडे, वगैरे धुऊन भाकऱ्या खावयाला बसले.

गोसावी आणि धोंडीबा हे भाकऱ्या खात असतां त्यांचें जें संभाषण चाललें होतें, त्याचा कांहीं भाग आम्ही वाचकांना सादर करतों.

गोसाव्यानें विचारलें, "धोंडीबा, तुम्ही किती वर्षें केंजळगडावर आहां ?."

धोंडीबानें उत्तर दिलें, " माझे वडील हैबतराव मरण पावले त्या गोष्टीला आठ वर्षें झालीं. तेव्हांपासून त्यांच्या कामावर माझी नेमणूक झाली. गडावर लागतील तितक्या मशाली पुरविण्याचें काम माझ्याकडे आहे."

गोसाव्यानें विचारलें, " हें काम तुम्ही आज आठ वर्षें करीत आहां काय ? "

" होय. " धोंडीबानें उत्तर दिलें.

" तेव्हां हल्लींचाच नबाब गडकरी होता काय ? " गोसाव्यानें विचारिलें.

" होय. " धोंडीबा म्हणाला. " मी मशाली पुरविण्याच्या कामावर लागलें त्याच्या अगोदर पांच सहा वर्षें हाच नबाब गडकरी होता. तो कांहीं वर्षें विजापुरच्या बादशहाचा अंकित होता, पण नंतर तो स्वतंत्रपणानें त्या गडावर अमल करूं लागला असें मीं ऐकिलें आहे. परंतु हा इतिहास मला पूर्णपणें ठाऊक नाहीं. कारण, ह्या गोष्टी केंजळगडावर घडल्या, त्या वेळीं मी विजापुरास आपल्या आजोळीं राहात असें. माझ्या आयुष्याचीं पहिलीं पंचवीस सव्वीस वर्षें विजापुरासच गेलीं. माझे वडील वारले तेव्हांपासून मी केंजळगडावर राहावयाला आलों. त्याच्या पूर्वीची हकीगत केवळ ऐकीव आहे. "

" हा गड पहिल्यापासूनच मुसलमानांच्या अमलाखालीं आहे काय ? " गोसाव्यानें विचारलें.

तेव्हां धोंडीबानें उत्तर दिलें, " नाहीं; पूर्वी तो गड एका हिंदू गडकऱ्याच्या अमलाखालीं होता. त्या हिंदू गडकऱ्याचा विजापुरच्या बादशहाशीं कांहीं संबंध नव्हता परंतु एकदा असें झालें कीं तो हिंदू गडकरी विजापुरच्या बादशहाच्या हद्दींत शिकार करावयाला गेला असतां त्याला एक सुंदर मुसलमानाची मुलगी आढळली. तिच्यावर ह्याची पापवासना गेली. तेव्हां तिच्या आईबापांना मारून त्यानें तो मुलगी गडावर पळवून आणिली. तिला त्यानें भ्रष्ट केलें. पुढें ह्या गोष्टीचा बोभाटा झाला. तेव्हां विजापुरच्या बादशहानें त्या हिंदू गडकऱ्याजवळ भरपाईचे पैसे मागितले. गडकऱ्यानें त्याला दांडगाईचें उत्तर दिलें. तेव्हां विजापुरच्या बादशहानें त्या गडकऱ्याला शिक्षा करण्यासाठीं आपली फौज पाठविली. त्या फौजेचा मुख्य अधिकारी हाच नबाब,—जो हल्लीं गडकरी आहे,—तोच होता. त्यानें किल्ला सर केला आणि हिंदू गडकऱ्याला कैद करून विजापुरास पाठवून दिलें. बादशहानें त्याच नबाबाला केंजळगडावर गडकरी नेमिलें. तेव्हांपासून हा गड मुसलमानी अमलाखालीं आहे. "

गोसाव्यानें विचारलें, " धोंडीबा, तुम्ही म्हणतां कीं हा नबाब आतां स्वतंत्र झाला आहे. त्यानें बादशहाचें आधिपत्य कधींपासून झुगारून दिलें ?"

धोंडीबा म्हणाला, "हा गड नबाबाच्या ताब्यांत आला तेव्हांपासून दोन तीन वर्षें नबाब बादशाहाकडे खंडणीचे पैसे पाठवीत असे. पुढें तो पाठवीनासा झाला आणि आपण स्वतंत्र गडकरी म्हणून आपणाला म्हणवून घेऊं लागला."

गोसाव्यानें विचारलें, " पहिल्या हिंदू गडकऱ्याचें काय झालें ?"

धोंडीबानें उत्तर दिलें, " ह्या नबाबानें बादशाहाचें स्वामित्व झुगारून दिलें आणि स्वतंत्रपणानें कारभार सुरू केला. तेव्हां बादशाहानें पूर्वीच्या हिंदू गडकऱ्याला कैदेंत ठेवण्याचें कारण नाहीं असें मनांत आणून त्याची मुक्तता केली. तो गडकरी हल्लीं विजापुरच्या राज्यांत कोणच्याशा एका गांवीं राहात असतो असें म्हणतात. त्या गांवाचें नांव मला ठाऊक नाहीं."

धोंडीबा ही केंजळगडाची हकीगत सांगत असतां गोसावी ती लक्ष्यपूर्वक ऐकत होता. ती हकीगत सांगून होई तोंपर्यंत त्या दोघांचें जेवणही आटोपलें.

जेवण संपल्यावर तो गोसावी आणि धोंडीबा असे दोघेजण ओढ्यावर जाऊन पाणी प्याले. झाडाच्या छायेंत ते दोघेजण आरामाच्या स्थितींत बसून गप्पागोष्टी करूं लागले. तेव्हां गोसाव्यानें विचारलें, " धोंडीबा, तुम्ही कोणच्या अडचणींत पडलां आहां तें जर मला सांगितलेंत, तर मी कांहीं तरी इलाज तुम्हाला सुचवीन. तुम्ही मनांत गोंधळलेले दिसत आहां, आणि तुम्हाला कोणी तरी धीर द्यावयाला आणि तुमच्या अंगांत उत्साह उत्पन्न करावयाला पाहिजे आहे असें मला वाटतें."

हें त्या गोसाव्याचें भाषण ऐकून धोंडीबाच्या मनामध्यें त्याच्याविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झाली आणि आपणाविषयीं त्याच्या मनामध्यें अनुकंपा उत्पन्न झालेली पाहून त्याला भारी समाधान वाटलें. मग त्यानें आपणावर काय प्रसंग ओढवला आहे हें मन मोकळें करून आणि तपशीलवारपणें त्या गोसाव्याला सांगितलें. धोंडीबाचा आतांपर्यंतचा इतिहास वाचकांना ठाऊक असल्याकारणानें त्याची येथें आम्ही पुनरुक्ति करीत नाहीं.

ह्या हकीगतीवरून गोसाव्याला समजलें कीं धोंडीबा हा केंजळगडावर मशाली पुरविण्याच्या कामावर होता. त्याच्या मुलीवर नबाबाची पापी नजर गेल्यामुळें त्या मुलीला आणि तिच्या आईला गडावरून पळून जावें लागलें, आणि धोंडीबाला

कैदेंत पडण्याची पाळी आली. त्या कैदेंतून सुटावयासाठीं धोंडीबानें रखवालदारावर हल्ला केला. त्याच्या मुलीला हुडकून काढून परत केंजळगडावर नेणाऱ्या तीन मुसलमानांशीं झालेला प्रसंग, इत्यादि सर्व गोष्टी त्या गोसाव्याला समजल्या. मग तो धोंडीबाला म्हणाला, " तुमची हकीगत मला समजली. आतां तुम्हीं पुढें काय करावयाचें योजिलें आहे ? "

धोंडीबा म्हणाला, " काय करावें तें मला सुचत नाहीं. त्या तीन मुसलमानांनीं माझ्या मुलीला कोठें पकडली, तिच्या आईची वाट काय झाली, ती हल्लीं आहे कोठें, हें मला ठाऊक नाहीं. विजापुरास माझी बायको आपल्या माहेरीं पोंचली किंवा नाहीं हें पहावयाचें म्हटलें तर मी असा उघडा, बोडका, कफल्लक जाणार कसा ? आणि मुलीला सोडवावयाचा प्रयत्न करावा म्हटलें तर मी काय करूं शकेन ? मी त्या दुष्ट नबाबाच्या तावडींतून तिला कसा सोडवूं शकेन ? माझी मति अगदीं गोंधळून गेली आहे. तुम्हाला कांहीं युक्ति सुचते काय ? "

त्यावर गोसावी म्हणाला, " मी सांगतों तसें करा. प्रथम तुम्ही विजापुरास जाऊन बायको सुस्थळीं आहे किंवा नाहीं हें पाहून या. नंतर काय करावयाचें तें ठरवा. "

धोंडीबा म्हणाला, " मलाही तसेंच वाटतें, पण अशा कफल्लक स्थितींत मी विजापुरास जाणार कसा ? वाटेनें मीं खावें काय ? प्यावें काय ? आंथरावें काय ? मुसलमान वाटेंत भेटले तर त्यांच्यापासून आपला बचाव करून घ्यावा कसा ? "

त्यावर गोसावी म्हणाला, " तुमच्या बोलण्याचा इत्यर्थ हा कीं पैशावांचून तुमचें सर्व नडलेलें आहे. "

धोंडीबा म्हणाला, " बोवाजी, हेंच-हेंच ! तुम्ही अगदीं बरोबर ओळखलें !"

गोसाव्यानें विचारलें, " तुम्हाला जर कोणी पैसे देणारा इसम भेटला तर तुम्ही त्याच्याजवळ किती रुपये मागाल ?"

धोंडीबा म्हणाला, " मला मुंडासें, पायतणें, दोन घोंगड्या, एक तरवार, तीर कमठा, पांचपन्नास तीर, वाटेनें खावयाला तांदूळ वगैरे पदार्थ विकत घ्यावे लागतील, आणि पैसे देणारा मनुष्य तितका उदार भेटला तर घोडा भाड्यानें किंवा विकत घ्यावयाला मी पैसे मागेन."

हें ऐकून तो गोसावी म्हणाला, " तुम्हीं सांगितलेत तितके पदार्थ आणि एक घोडा सर्व सरंजामासकट विकत घ्यावयाला एकंदर किती रुपये तुम्हाला पाहिजेत त्याची बेरीज करून मला सांगा."

धोंडीबानें बेरीज करून अमुक रुपये लागतील असें सांगितलें. तेव्हां त्या गोसाव्यानें आपल्या पोतडींतून तितके रुपये काढून धोंडीबाला दिले, आणि म्हटलें, " धोंडीबा, हे रुपये मी तुम्हाला बक्षीस देत आहें. हे घ्या. अनमान करूं नका. माझ्या गरजेला पुरण्याइतके पैसे मजजवळ आहेत."

हें त्या गोसाव्याचें वर्तन पाहून धोंडीबाला आश्चर्य वाटलें. हा गोसावी खरोखरी आहे कोण ह्याचा तर्क त्याला होईना. गोसावी लुच्चा माणूस तर नसेल ? तो पादशहाचा हेर तर नसेल ? तो जादूगार तर नसेल ? तो किमयागार तर नसेल ? तो सैतानाचा दूत तर नसेल ? तो आपणास मिंधेगिरींत घालून आपणाकडून कांहीं निंद्य कर्म तर करविणार नसेल ? असे अनेक विचार धोंडीबाच्या मनांत विद्युल्लतेच्या वेगानें येऊं लागले, आणि त्या गोसाव्यानें पुढें केलेले पैसे घ्यावयाला त्याचा हात कचरूं लागला.

गोसाव्यानें धोंडीबाच्या मनांत काय विचार चालले आहेत हें तत्क्षणीं जाणलें. तेव्हां तो आश्वासनपर स्वरानें धोंडीबाला म्हणाला, " धोंडीबा, तुमच्या मनांत ज्या शंका येत आहेत त्यांबद्दल मी तुम्हाला दोष देत नाहीं. हल्लीं आपल्या देशाची स्थिति आणि एकंदर परिस्थिति इतकी कांहीं विचित्र झालेली आहे कीं, तुमच्या मनांत भलभलत्या शंका येणें अगदीं साहजिक आहे. परंतु त्या सर्व शंका निराधार आहेत असें मी तुम्हाला सांगतों, आणि त्या शंका तुमच्या मनांत आल्याबद्दल मला तुमचा राग वाटत नाहीं. मी तुम्हाला देत आहें ते पैसे मी निढळच्या घामानें आणि सन्मार्गानें मिळविलेले आहेत. मी किमयागार नाहीं किंवा तुम्हांला कांहीं पेंचांत घालावें अशीही माझी इच्छा नाहीं. तुम्ही अडचणींत सांपडलेले आहां. तुम्हाला पैशाची जरूरी आहे, आणि मजजवळ मला पुरून उरण्याइतके पैसे आहेत, आणि हे पैसे तुम्ही योग्य प्रकारें खर्चाल अशी माझी खात्री आहे, म्हणून मी तुम्हाला हे पैसे बक्षीस देत आहें. ते बेलाशक घ्या."

हें गोसाव्याचें स्वच्छ, साफ आणि प्रामाणिक भाषण ऐकून धोंडीबा शरमला आणि म्हणाला, " बोवाजी, तुमच्याबद्दल क्षणभर माझ्या मनांत चमत्कारिक विचार आले त्याबद्दल मी तुमची क्षमा मागतों. मी तुमच्या औदार्याचा लाभ करून घेतों. मला जें जें कांहीं लागेल तें तें सढळ हातानें विकत घेतों आणि विजापुरास जातों. पण तुमची आणि माझी पुन्हा गांठ पडेल काय ? कोठें पडेल, हें मला सांगा. तसेंच तुम्ही कोण, कोठले, वगैरे तुमची माहिती जी मला सांगण्याजोगी वाटत असेल ती सांगा. तसेंच तुमचें कांहीं काम माझ्या

ह्यातून होण्याजोगें असल्यास अनमान न करतां सांगा. मी तें अवश्य करीन. तसेंच तुम्ही गोसावी झालां ते कांहीं अवधीपुरतेच झालां किंवा जन्मभर तुम्ही गोसावीच राहाणार आणि तीर्थयात्रा करीत राहाणार, हेंही मला सांगण्याजोगें असल्यास सांगा. मी फाजील जिज्ञासेनें हे प्रश्न तुम्हाला विचारतों आहें असें मात्र समजूं नका. तुमच्या सारख्या उदार माणसाची जितकी माहिती असेल तितकी चांगली ह्या बुद्धीनें मी ही माहिती विचारीत आहें. ”

हे धोंडीबानें विचारलेले प्रश्न ऐकून तो गोसावी कांहीं वेळ स्तब्ध बसला. आपणासंबंधानें किती माहिती धोंडीबाला द्यावी, आणि कोणत्या क्रमानें द्यावी, ह्यासंबंधानें तो मनांत विचार करीत होता. त्याला उत्तर द्यावयाला उशीर लागत आहे हें पाहून धोंडीबा त्याला म्हणाला, “ बोवाजी, दुसऱ्याचीं रहस्यें जाणून घ्यावयाची माझी बिलकूल इच्छा नाहीं. मी तुम्हाला ही माहिती सहज म्हणून विचारीत आहें. ती सांगण्याजोगी नसल्यास सांगूं नका. मी तुम्हाला आग्रह करीत नाहीं. ”

तेव्हां गोसावी म्हणाला, “ धोंडीबा, तुम्ही जी माहिती मला विचारीत आहां, ती कोणीही साहजिकपणें विचारलीच असती, आणि आतांपर्यंत ज्यांनीं मला ही माहिती विचारली, त्यांना मीं ती जशी सांगितली, तशीच तुम्हालाही सांगतों, ऐका. ”

असें म्हणून गोसाव्यानें आपली माहिती—अर्थात् त्रोटक माहिती—सांगावयाला सुरवात केली. ती माहिती आम्ही वाचकांना पुढच्या प्रकरणीं देऊं.

---

## प्रकरण १३ वें.

# गोसाव्याचें इद्गत.

गोसावी म्हणाला, “धोंडीबा, मीं पूर्वी फार मोठें वैभव भोगलें आहे. तें माझें वैभव आतां नष्ट झालें आहे. तथापि त्या नष्ट झालेल्या वैभवाबद्दल मला यत्किंचित् देखील हळहळ वाटत नाहीं. परंतु मला अतोनात दुःख होतें तें ह्यासाठीं, कीं मी ज्या माणसांवर प्रेम करीत होतों, आणि जीं माणसें माझ्यावर प्रेम करीत होतीं, तीं काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलीं ! मला आतां बायको नाहीं, मुलगा नाहीं, माझ्या नात्याचें कोणी माणूस नाहीं; मी जगांत एकटा राहिलों

आहें! माझी बायको जी लाखांत बायको होती, तिचें माझ्यावर आणि माझें तिच्यावर अतोनात प्रेम असे. आमच्या एकमेकांवरच्या प्रेमाचा अल्पस्वल्प अंश घ्यावयाला आम्हांला आमचे दोन मुलगे होते. त्यांपैकीं एकही न उरल्याकारणानें आम्ही दोघे जण एकमेकांवर प्रेम करून एकमेकांच्या सहवासांत कालक्रमणा करीत असूं. परंतु माझी बायको सहा सात महिन्यांमागें तापानें आजारी पडून त्या तापांतच तिचा अंत झाला. मी एकटा पडलों. माझ्या हृदयाला मोठा धक्का बसला— जबरदस्त धक्का बसला. मला जीव नकोसा झाला. ती मेल्यावर मी एका महिन्यांत दहा पंधरा वेळ गंगेंत जीव द्यावयाच्या निश्चयानें घाटावर गेलों. परंतु आत्महत्या हें पातक आहे, असें जाणून तितके वेळां परतून घरीं आलों. परंतु माझ्या जिवाला चैन म्हणून कसें तें पडेना, म्हणून मी अतिशय वैतागलों आणि एका गोसाव्यांच्या तांड्याबरोबर रामेश्वरास जावयाच्या इरायानें काशीहून निघालों. वाटेंत जीं क्षेत्रें आम्हांला लागलीं, त्यांचें दर्शन घेत घेत आम्ही सहा महिन्यांनीं नर्मदेच्या दक्षिणेस आलों. आम्ही महाराष्ट्रांत आलों तेव्हां महाराष्ट्राची स्थिति आणि परिस्थिति पाहून माझ्या मनांतील विचारांना कांहीं वेगळीच दिशा लागली. रामेश्वराला जाण्याचा माझा विचार मंदावत चालला, आणि याच महाराष्ट्रांत राहाण्याचा विचार माझे मनांत येऊं लागला. तेव्हां मी आपल्या सोबत्यांस माझा विचार कळविला. ते पुढें रामेश्वराकडे रवाना झाले आणि मी येथेंच महाराष्ट्रांत हिंडावें असें ठरविलें."

धोंडीबानें विचारलें, " महाराष्ट्रांत राहून तुमच्या मनाला शांति मिळेल असें वाटतें काय ? "

गोसावी म्हणाला, " होय. माझ्या विचारांना वेगळें वळण नर्मदेच्या दक्षिणेस आल्यावर लागलें. "

धोंडीबानें विचारलें, " तें कसें ? "

गोसावी म्हणाला, " तें सांगतों, ऐका. महाराष्ट्रांत आतांपर्यंत मीं शंभर गांवें पाहिलीं आहेत, आणि प्रत्येक गांवांत मला असें दिसलें कीं हिंदू लोक मुसलमानी रियासतीला अतोनात त्रासलेले आहेत. मुसलमानांचा अंमल हिंदूंना अगदीं असह्य झाला आहे. मुसलमानांच्या राज्यांत हिंदूंना न्याय नाहीं, हिंदूंच्या जिवाला, संपत्तीला, किंवा अब्रूला सुरक्षितपणा नाहीं. कोणा हिंदूवर केव्हां कोणतें संकट येईल याचा नेम नाहीं. आजचा दिवस गेला तो पदरांत पडला, उद्यां काय होईल कोण जाणे, असें जो तो हिंदू म्हणत आहे. सर्व हिंदू हवालदील असे मला आढळले

परंतु उलटपक्षीं मुसलमान लोक चैनींत आहेत. त्यांनीं कोणाही हिंदूचा कांहींही अपराध केला, तरी त्यांना कांहीं शिक्षा होत नाहीं. मुसलमान लोक निर्दोषी ठरतात आणि हिंदूंवर गुन्हा शाबीत होतो. अशी हल्लीं महाराष्ट्रांतील हिंदू लोकांची दीनवाणी स्थिति मला दिसून आली."

तेव्हां धोंडीबा म्हणाला, "तुम्ही वर्णितां तशी हिंदूंची स्थिति आहे खरी. परवां आमच्या केंजळगडावर राहाणाऱ्या एका ब्राह्मणाचें जानवें एका मुसलमानानें वात्रटपणानें तोडलें. तो ब्राह्मण रडत रडत गडावरच्या काजीकडे गेला. तेव्हां तो काजी त्या ब्राह्मणाकडे पाहून खो खो हंसला आणि म्हणाला, 'अरे भटा, दीड दमडी किमतीच्या जानव्याबद्दल मजकडे तूं तक्रार आणीत आहेस, मग तुझ्या बायकोच्या गळ्यांतील सरी त्यानें मोडली असती तर तें पाहूनच तूं मेला असतास ! अरे, दीड दमडीच्या जानव्यासाठीं कसची तक्रार करतोस ? जा ! पुन्हा असली तक्रार माझ्याकडे आणलीस तर मी तुला जल्लादाकडून फटके मारवून हाकलून देववीन ! जा ! काळें कर !' हा काजीसाहेबांचा न्याय ऐकून तो बिचारा ब्राह्मण घरीं आला. हा आमच्या केंजळगडावरच्या न्यायाचा एक नमुना मीं तुम्हाला सांगितला. असले न्याय आम्हाला रोज पहावयाला सांपडतात."

त्यावर गोसावी म्हणाला, "मी हिंडतां हिंडतां एका गांवांत आलों. तेथें कांहीं मुसलमान लोक वात्रटपणानें एक मारुतीचें देऊळ पाडवीत होते. हिंदूंनीं त्यांना हरकत केली. मारामारी जुंपली. दोन तीन हिंदू मरण पावले. बाकीच्या हिंदूंनीं काजीकडे फिर्याद नेली. काजीनें असा न्याय केला कीं ज्या अर्थी तें देऊळ मोडकळीस आलेलें होतें आणि त्या देवळांत जाणाऱ्या हिंदूंची डोक्यावर तें कोसळून प्राणहानि होण्याची भीति होती, त्या अर्थी तें देऊळ मुसलमानांनीं पाडून टाकलें हे त्यांनीं तुम्हा हिंदूंवर उपकारच केले; तर ह्या त्यांच्या उपकाराची फेड करण्यासाठीं तुम्ही सर्व गांवकऱ्यांनीं वर्गणीनें शंभर रुपये जमवून त्यांना बक्षीस द्या."

धोंडीबा म्हणाला, "हा मोठा विचित्र न्याय म्हणावयाचा !"

गोसावी म्हणाला, "हा न्याय विचित्र आहे असें तुम्ही म्हणतां पण ह्याच्याही पेक्षां अधिक विचित्र न्यायाचे नमुने मला महाराष्ट्रांतून प्रवास करतांना दिसले. एकदां एका गांवांत एका सोनाराची फार सुंदर मुलगी होती. तिचा बाप कांहीं कामानिमित्त परगांवीं गेला होता. अशी संधी साधून एक उन्मत्त मुसलमान

मागल्या दारानें तिच्या घरांत शिरला. दुसरें कोणी माणूस त्या वेळीं त्या घरांत नव्हतें. त्या मुसलमानानें त्या सुंदर मुलीला भ्रष्ट केलें. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें त्या मुलीचा बाप घरीं परत आला, तेव्हां त्यानें आणि शेजारचे लोक तेथें जमा झाले होते त्यांनीं त्या मुसलमानाला पकडून काजीपुढें उभें केलें. तेव्हां काजी मुलीच्या बापाला म्हणाला, 'स्त्री ही वस्तु देवानें उपभोग्य वस्तु म्हणून निर्माण केली आहे. तूं तिचें लग्न करून दिलें नाहींस म्हणून तिचा उपभोग कोणी मनुष्य घेऊं शकत नाहीं. त्या मुलीचा उपयोग हल्लीं कोणी घेत नाहीं आणि देवानें उपभोग्य म्हणून जी वस्तु उत्पन्न केली ती निरुपयोगी पडून राहात आहे; तिचा उपभोग ह्या मुसलमानानें केला तर त्यांत गैर काय आहे ? त्यानें केलें तें योग्यच केलें. त्यानें तुझ्यावर आणि तुझ्या मुलीवर हे उपकारच केले असें म्हणावयाचें तें न म्हणतां तूं माझ्यापुढें फिर्याद आणतोस? तुझ्या कृतघ्नपणाला सीमा नाहीं. मी तुझ्यावर दया करून तुला माफ करतों. पुन्हां असली फिर्याद मजपुढें आणलीस तर तुला जल्लादाकडून फटके मारविण्याची सजा देववीन. जाः !' असें म्हणून त्या काजीनें त्या सोनारास घालवून लावलें! कसा आहे हा न्यायाचा नमुना ?"

धोंडीबा म्हणाला, "तुम्ही हा नमुना सांगितला तसा एक नमुना आमच्या केंजळगडावर नुकताच घडून आला. मुसलमान राज्यकर्ते असल्यामुळें ते आपल्या मुसलमान जातभाईंना आणि धर्मबांधवांना गुन्ह्याबद्दल कांहींच शिक्षा करीत नाहींत. तेणेंकरून हिंदू लोकांना अतिशय पीडा, त्रास, जुलूम, अन्याय सोसावा लागतो. मुसलमान फार शेफारून गेले आहेत. त्यांना हिंदुस्तान थयमान घालावयाला मोकळें सांपडलें आहे. आपणा हिंदूंचा कोणी कैवारी नाहीं !"

गोसावी म्हणाला, "मुसलमान लोकांच्या अत्याचाराला धरबंध राहिला नाहीं. ते अधिकारानें उन्मत्त झाले आहेत."

धोंडीबा म्हणाला, "होय, मुसलमान लोक उन्मत्त झाले आहेत, परंतु दुःखाची गोष्ट ही कीं त्यांचा उन्माद उतरविण्याची ताकद आपणां हिंदूंमध्यें नाहीं."

गोसावी म्हणाला, "मला महाराष्ट्रामध्यें मुसलमान लोकांच्या अन्यायाचीं, अनीतीचीं, पक्षपाताचीं, जुलमाचीं, निर्लज्जपणाचीं, क्रूरपणाचीं, शेंकडों उदाहरणें दिसून आलीं. मुसलमानांच्या त्रासांतून मुक्त व्हावयाची कांहीं तरी खटपट जर आपण हिंदूंनीं केली नाहीं, तर ह्या महाराष्ट्रांत औषधालाही कोणी हिंदू राहणार नाहीं."

धोंडीबा म्हणाला, "अशी कांहीं खटपट कांहीं मावळे करीत आहेत अशी बातमी आमच्या केंजळगडावर आलेली आहे. त्या बातमींत कितपत तथ्यांश आहे हें मला ठाऊक नाहीं. कारण, मला माझ्या कामांतून वर डोकें काढावयाला फुरसतच मिळत नाहीं. महाराष्ट्रांत काय काय गोष्टी घडत आहेत त्या सर्व मला कळत नाहींत!"

गोसावी म्हणाला, "मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंना सोडविण्याची खटपट कांहीं मावळे करीत आहेत अशी बातमी तुम्हीं जशी ऐकिली आहे तशी मींही ऐकिली आहे. परंतु ती बातमी कितपत खरी आहे हें मला ठाऊक नाहीं. मी गेलीं पंधरा वर्षें महाराष्ट्रांत मुळींच नव्हतों. अलीकडे एका महिन्यांत जें कांहीं मला दिसलें किंवा ऐकूं आलें तेवढीच माझी माहिती."

धोंडीबा म्हणाला, "आणि मी महाराष्ट्रांत असून मलाही तेवढीच माहिती आहे. तुमच्याहून मला कांहीं जास्ती माहिती नाहीं. पण मीं इतकें जास्ती ऐकिलें आहे कीं त्या मावळ्यांचा शिवाजी ह्या नांवाचा एक पुढारी आहे. आणि तो ह्या मावळ्यांना हाताशीं धरून मुसलमानांचा अंमल नामशेष करणार आहे."

गोसावी म्हणाला, "त्या मावळ्यांच्या पुढाऱ्याचें नांव मीं ऐकिलें नव्हतें. परंतु तो पुढारी हिंदूंचें स्वराज्य स्थापून हिंदूंचा धर्म आणि हिंदूंचें चातुर्वर्ण्य, आणि हिंदूंची संस्कृति, हीं अबाधित राहतील, असें करणार आहे, असें मीं ऐकिलें आहे."

धोंडीबा म्हणाला, "तो शिवाजी गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करण्यासाठीं स्वराज्य स्थापणार आहे असें मीं ऐकलें आहे."

गोसावी म्हणाला, "त्याचा अर्थ तोच! गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करणें काय आणि हिंदूंचा धर्म अबाधित राखणें काय एकच! हें केल्यानें तें होतें आणि तें केल्यानें हें होतें."

धोंडीबा म्हणाला, "होय, तें खरें आहे. पण बोवा गंमत ही आहे कीं शिवाजी हा काल्पनिक पुरुष आहे असेंही कांहीं लोक म्हणतात."

गोसावी म्हणाला, "होय. खरी गोष्ट अशी आहे कीं शिवाजीसंबंधानें उलट सुलट बातम्या पुष्कळ प्रसृत आहेत. कोणी म्हणतात कीं त्या नांवाचा खराखुरा कोणी माणूस आहे, कोणी म्हणतात नाहीं. कोणी म्हणतात तो शंकराचा अवतार आहे, कोणी म्हणतात तो भुरटा लुटारू आहे. कोणी म्हणतात तो वयस्कर आहे,

कोणी म्हणतात तो सतरा अठरा वर्षांचा पोरगा आहे. त्याला दाढी नाहीं मिशी नाहीं, आणि ओठ पिळला तर दूध निघेल, असेंही लोक बोलतात. ”

धोंडीबा म्हणाला, “ होय. शिवाजीसंबंधानें अशा भिन्न भिन्न बातम्या आहेत खऱ्या. खरें काय असेल तें परमेश्वर जाणे. ज्या माणसानें शिवाजीला प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें आहे असा कोणी माणूस मला भेटला नाहीं. ”

गोसावी म्हणाला, “ होय, मीं शिवाजीला प्रत्यक्ष पाहिलें आहे असें सांगणारा एकही माणूस मला आढळला नाहीं. परंतु मी तो तपास करणार. हा तपास करावा, आणि शिवाजी म्हणून जर कोणी खराखुरा माणूस असला, आणि जर तो मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंना सोडविण्याचा प्रयत्न करीत असला, तर त्याला मिळावें, अशा विचारानें मी रामेश्वराला जावयाचा बेत रहित केला, आणि शिवाजीचा माग काढीत काढीत हिंडत आहें. ”

धोंडीबा म्हणाला, “ एकूण रामेश्वराला जावयाचा तुमचा बेत रहित झाला तर ! ”

गोसावी म्हणाला, “ माझा विचार कसा पालटला तें सांगतों, ऐका. प्रत्येक मनुष्याच्या पाठीमागें देवानें दोन जातींचीं कर्तव्यें लावून दिलीं आहेत. स्वताच्या कुटुंबासंबंधाचीं कर्तव्यें आणि समाजरूपी कुटुंबासंबंधाचीं कर्तव्यें. हीं दोन्ही जातींचीं कर्तव्यें जो कोणी आपल्या बुद्धीप्रमाणें, आपल्या सामर्थ्याप्रमाणें, आणि प्रामाणिकपणानें करीत राहातो, तो मनुष्य देवाला प्रिय होतो. हीच देवाची खरी भक्ति आणि हाच देवाला प्रसन्न करण्याचा खरा मार्ग. तीर्थें हिंडणें किंवा देवाच्या मूर्तीवर अभिषेक करणें, गंधफूल वाहाणें, हा, दोन्ही जातींचीं कर्तव्यें करून उरलेल्या वेळांत देवाला प्रसन्न करण्याचा मार्ग. परंतु जो कोणी मनुष्य हीं दोन्ही जातींचीं कर्तव्यें यथाशक्ति न करतां ह्या तिसऱ्या मार्गाचें अवलंबन करतो, तो देवाचा खरा भक्त नव्हे. आपलीं कर्तव्यें न करतां कोणी मनुष्य कितीही तीर्थें हिंडला, त्यानें कितीही घागरी पाण्याचा अभिषेक केला, देवाच्या मूर्तीला कितीही गंध लाविलें, आणि कितीही फुलें वाहिलीं, तरी फुकट ! माझें वैय्यक्तिक कुटुंब माझ्यापासून काळानें हरण करून नेलें म्हणून त्या माझ्या वैय्यक्तिक कुटुंबासंबंधानें मला कांहीं कर्तव्यें करावयाला उरलीं नाहींत; म्हणून माझ्या समाजासंबंधाचीं कर्तव्यें मी सर्व सामर्थ्य वेंचून केलीं पाहिजेत. तीं कांहीं चुकत नाहींत. तीं कर्तव्यें करावयासाठीं मीं महाराष्ट्रांतच राहावें असें मनांत योजलें आहे. हीं कर्तव्यें न करतां रामेश्वरास गेल्यानें मी देवाच्या घरीं अपराधी ठरेन. मी आतां

असें ठरविलें आहें कीं सर्व महाराष्ट्रभर हिंडावें, शिवाजी हा कोणी खराखुरा माणूस असेल आणि तो जर खरोखरीं मुसलमानी अमल उलथून पाडण्याचा प्रयत्न करणार असेल, तर त्याला मिळावें, आणि त्याला यथाशक्ति मदत करावी. परंतु शिवाजी असा जर कोणी मनुष्यच नसला, तर एकादा तरुण आणि कर्तबगार माणूस हुडकून काढून त्याला मराठ्यांचें राज्य स्थापित करण्याला प्रोत्साहन द्यावें. रामेश्वराकडे न जातां अशा रीतीची समाजसेवा करण्यामध्यें आपलें उरलेलें आयुष्य घालवावें, असा माझा आतां विचार ठाम झाला आहे."

हे त्या गोसाव्याचे विचार ऐकून धोंडीबाला अतिशय आनंद झाला, आणि तो त्याच्याकडे आश्चर्यानें आणि कुतूहलपूर्ण दृष्टि लावून पाहात राहिला. मग त्याला म्हणाला, "बोवाजी, तुमचा जो विचार तोच माझा. तुम्हांला स्वतांचें कुटुंब नाहीं म्हणून तुम्हाला सर्व लक्ष्य समाजरूपी कुटुंबाकडे लावितां येईल. परंतु मला माझें स्वतांचें कुटुंब असल्या कारणानें मला सर्व लक्ष्य समाजसेवेकडे लावतां यावयाचें नाहीं हें उघड आहे. माझा विचार ठरला. तुम्ही इतका वेळ जे विचार बोलून दाखविले, ते मला पूर्णपणें पटले. ते माझ्या अंतःकरणांत ठसले. कुटुंबसेवा आणि समाजसेवा ह्या दोहोंचा संयोग हीच खरी ईश्वरसेवा होय, हें तत्व माझ्या हृदयांत चांगलें बिंबलें. तुम्ही मला मार्गदर्शक झालां. तुम्ही मला गुरूच्या ठिकाणीं आहां."

त्यावर गोसावी म्हणाला, "माझे विचार तुम्हांला पटले हें पाहून मला भारी आनंद होत आहे. आपण दोघेही बरोबरच महाराष्ट्रांत हिंडूं. पण धोंडीबा, तुम्हांला अगोदर विजापुरास जाऊन तुमच्या माणसांची खुशाली पाहून यावयाची आहे, आणि त्यासाठीं तुम्हांला प्रवासाची तयारी करावयाची आहे."

नंतर आकाशाकडे पाहून गोसावी म्हणाला, "आपण फार वेळ बोलत बसलों. आतां तिसरा प्रहर उलटून गेला आहे. आपण दोघे जण एकाद्या गांवाकडे चालत जाऊं. तेथें तुम्हाला मुंडासें वगैरे जे पदार्थ प्रवासांत पाहिजेत ते विकत घ्या. मग तुम्ही विजापुराला जाऊन परत येई तोंपर्यंत मी त्याच गांवांत मुक्काम करून राहीन."

धोंडीबा म्हणाला, "होय, तसेंच करूं. आपण ह्या रस्त्यानें जाऊं. एकादा मोठासा गांव लागला म्हणजे त्यांत शिरू."

याप्रमाणें बेत ठरवून धोंडीबा आणि गोसावी मार्गक्रमण करूं लागले.

---

## प्रकरण १४ वें.

# मुक्ताबाई तावरे.

धोंडीबाच्या प्रवासाला जरूर असे पदार्थ आणि घोडा विकत घ्यावयासाठीं तो आणि गोसावी असे दोघेजण एकादा गांव गांठावा ह्या उद्देशानें तेथून उठले आणि विजापुराकडे जाणारी वाट धरून चालूं लागले.

हें मार्गक्रमण चाललें असतां त्या दोघांच्या गप्पागोष्टी चाललेल्या होत्या. मुसलमानी अमलापासून हिंदूंवर होत असलेले जुलूम आणि मुसलमान लोकांच्या अनियंत्रित उद्दामपणामुळें हिंदूंना होत असलेला त्रास, ह्यांचीं उदाहरणें जीं गोसाव्याला आढळलीं होतीं, तीं तो धोंडीबाला सांगत होता; आणि धोंडीबानें पाहिलेलीं उदाहरणें तो गोसाव्याला सांगत होता. त्या दोघांच्या संभाषणाचा आणखीही एक विषय होता. धोंडीबानें आपलीं नातलग माणसें कोण कोण आहेत, त्यांचे उद्योग काय काय आहेत, वगैरे माहिती गोसाव्याला सांगितली. परंतु गोसाव्यानें धोंडीबाला पूर्वीं जी स्वतांच्या संबंधानें माहिती सांगितली होती, तिचेपेक्षां अधिक कांहीं माहिती धोंडीबाला त्याच्यासंबंधानें कळली नाहीं.

अशा रीतीनें गप्पागोष्टी करीत करीत ते दोघेजण सूर्यास्ताच्या अगोदरच नांदेड गांवाला येऊन पोंचले आणि ह्या गांवांत आपणाला घोडा मिळूं शकेल, मुंडासें, तरवार, वगैरे पदार्थ मिळूं शकतील, अशा भरंवशानें त्या गांवाच्या वेशींतून ते आंत शिरूं लागले.

ते वेशींतून शिरत असतां एक सुमारें वीस वर्षांच्या वयाचा मुलगा त्यांना दिसला. हा मुलगा वर्णानें गोरा, काठीनें उंच, आणि अंगानें गुटगुटीत होता. त्याचा चेहरा सुंदर आणि मोहक होता. ह्या वेळीं त्याच्या कमरेला एक तंग मांडचोळणा, अंगांत तंग आणि लांडी बडी, आणि डोक्यावर कटोरी टापी होती. त्यामुळें त्याच्या गात्रांचा बांधेसूदपणा स्पष्टपणें दृग्गोचर होत होता. ह्या वेळीं त्याच्या डाव्या-हातामध्यें एक भेंड्यांची टोपली आणि उजव्या हातांत केळीच्या पानांची सुरळी होती, आणि त्याच्या कमरेला एक चकचकीत खुरपें लटकलेलें होतें ह्यावरून तो आपल्या शेतावरून हे पदार्थ घेऊन घरीं परत चालला असावा असा कोणालाही तर्क होण्याजोगा होता, आणि असाच तर्क धोंडीबा आणि गोसावी ह्यांचा झाला. ह्या तर्कावरून गोसाव्यानें त्याला विचारलें, "मुला, तूं ह्याच गांवचा राहाणारा आहेस काय?"

त्या मुलानें उत्तर दिलें, " होय, बोवाजी."

धोंडीबानें विचारलें, " ह्या गांवाचें नांव काय ? "

मुलानें उत्तर दिलें, "नांदेड. तुम्ही ह्या गांवीं पूर्वी कधीं आलेले नव्हतां काय ?"

धोंडीबा आणि गोसावी ह्या दोघांनीं एकदम उत्तर दिलें, " नव्हतों. "

मुलगा म्हणाला, " तर मग तुह्माला उतरावयाला जागा वगैरे मी दाखवून देऊं काय ? "

गोसावी म्हणाला, " दाखवून दिलीस तर तुझे आम्ही उपकार मानूं. "

मुलगा म्हणाला, " ह्यांत कसचे उपकार ? आपल्या गांवांत कोणी परस्थ माणूस आला, तर त्याच्या सोयी आपण नको करून द्यावयाला ? हें तर आपलें कर्तव्य आहे. "

त्या मुलाची ही उपकारशीलता पाहून आमच्या दोन्ही प्रवाशांना मोठें कौतुक वाटलें. मग गोसावी म्हणाला, " आह्माला उतरावयाला जागा पाहिजे. आम्हाला भाकऱ्या भाजून द्यावयाला एक मराठे जातीची बाई पाहिजे. तिला आम्ही ती मागेल तितके पैसे देऊं. पण मुला, तुझें नांव काय ? "

तो मुलगा म्हणाला, " माझें नांव पुंडरीक. "

इतकें संभाषण होत आहे तों हीं तिन्ही माणसें एका घरापाशीं येऊन पोंचलीं. तेव्हां तो मुलगा म्हणाला, " भाऊ, हें आमचें घर. येथें तुम्हाला उतरावयाला पुष्कळ जागा आहे. येथेंच तुम्ही उतरा. "

असें म्हणून तो मुलगा आपल्या दोन सोबत्यांना घेऊन घराच्या अंगणांतून पडवींत आला, आणि म्हणाला, " येथें तुम्ही मुक्काम करा. "

असें म्हणून तो घरांत गेला आणि तेथें भेंड्या आणि केळीचीं पानें ठेवून बाहेर येऊन म्हणाला, " भाई, तुम्ही येथें जरा टेकतां तों मी मुक्ताबाई तावरे हिला घेऊन येतों. ती मराठे जातीची आहे. ती गरीब परंतु गरजेला उपयोगी पडणारी बाई आहे. ती तुम्हाला भाकऱ्या बिकऱ्या भाजून देईल. तिचीं कोणी नातलग माणसें नाहींत. ती तुम्हासारख्या हिंदू प्रवाशांना भाकऱ्या भाजून देऊन आपली गुजराण करीत असते. ती प्रामाणिक आणि आस्थाळू अशी आहे. तिचें करणें सवरणें स्वच्छ असतें. मी तिला बोलावून आणतों. माझी आई तुम्हाला कांदे, लोणचें, ताक, वगैरे देईल. मी त्या बाईकडून आल्यावर तुम्हाला भांडीं कुंडीं वगैरे देईन, आणि विहीर दाखवीन. अजून सूर्य मावळला नाही. मी धावत पळत येतों. "

असें म्हणून तो मुलगा तेथून निघाला. तो गेल्यावर आमचे प्रवासी पडवीमध्यें सुखासीन झाले आणि त्या मुलाच्या संबंधानें बोलूं लागले.

गोसावी म्हणाला, " हा मुलगा किती उपकारशील आहे हो धोंडीबा ? "

धोंडीबा म्हणाला, " होय, आणि तो उपकारशील असून भारी मर्यादशील आहे. "

गोसावी म्हणाला, " आणि पुन्हा तो सुंदर आणि मोहक आहे. त्याच्या तोंडाकडे कितीही पाहिलें तरी दृष्टि दुसरीकडे वळतच नाहीं. "

धोंडीबा म्हणाला, " आणि त्याचें शरीर तरी किती बांधेसूद आहे !"

गोसावी म्हणाला, " होय. आणि त्याची छाती पाहिलीत का धोंडीबा ? खूप रुंद आहे. त्याच्या मणगटाची कांब देखील सहा बोटें रुंद आहे; आणि त्याची कंबर तरी किती बारीक आहे ? मला वाटतें त्याचें तालमीचें शरीर असेल. तो कुलीन घराण्यांतील आणि खात्यापित्यांचा मुलगा दिसतो. "

धोंडीबा म्हणाला, " होय. मला असेंच वाटतें. त्याचा आवाजही भारी गोड आहे. "

येणेंप्रमाणें त्या मुलासंबंधानें आमचे दोन प्रवासी प्रशंसापर उद्गार काढीत आहेत तोंच तो मुलगा मुक्ताबाई तावरे हिला घेऊन तेथें आला, आणि त्यांना म्हणाला, " ह्या मुक्ताबाई तावरे. तुम्हाला कसल्या भाकऱ्या पाहिजे आहेत आणि केव्हांला पाहिजे आहेत तें ह्यांना सांगा. त्या तुम्ही सांगितल्याप्रमाणें करतील. मी आतां परसांत गोवऱ्यांची रास करावयाला जातों. "

असें म्हणून पुंडरीक तेथें पडवींत धोंडीबा आणि गोसावी ह्यांना सोडून घरांतून परसांत गोवऱ्यांची रास करावयासाठीं निघून गेला.

मुक्ताबाई तावरे ही बाई अदबशीरपणानें आमच्या दोन प्रवाशांच्या पुढें उभी राहिली. तिच्याजवळ भाकऱ्यांच्या संबंधाचें बोलणें सुरू करावयाच्या अगोदर त्या दोघांनीं तिच्याकडे लक्ष्यपूर्वक पाहिलें.

आतां पडवींत धोंडीबा, गोसावी आणि मुक्ताबाई, अशीं तीन माणसें राहिलीं. ही मुक्ताबाई आमच्या गोष्टींतील बऱ्याच महत्वाचें पात्र असल्या कारणानें तिची थोडीशी माहिती वाचकांना असणें जरूरीचें आहे.

ही बाई वयानें तीस वर्षांची असून वर्णानें निमगोरी, काठीनें मध्यम उंचीची आणि अंगानें सडपातळ होती. तिचा चेहरा नीटस होता; कपाळ रुंद होतें, गाल जरासे फुगीर होते, आणि डोळे काळेभोर आणि विशाळ होते. तिचे ओंठ किंचित्

जाडसर परंतु तांबडे लाल होते, आणि त्या ओठांच्या आंत दांत पांढरे स्वच्छ आणि सरांतील मोत्यांप्रमाणें हारीनें होते. तिचा चेहेरा एके काळीं सुंदर होता, परंतु आतां त्या सौंदर्याची चटकदारी कमी झाली होती आणि तिच्या मुद्रेवर औदासिन्याची छटा मारीत होती, आणि त्यामुळें तिच्याकडे प्रेक्षकाची सानुकंप दृष्टीनेंच पाहाण्याची प्रवृत्ति होत असे.

ह्या वेळीं ती एक साधें आणि गरीबाऊ लुगडें नेसलेली होती, आणि तें ती नीटनेटकेपणानें नेसलेली असल्या कारणानें तिच्या शरीराचा नीटसपणा उठावदार रीतीनें व्यक्त होत होता.

ही स्त्री मराठे जातीची होती हें वाचकांना पूर्वी कळलेलेंच आहे. आतां आम्हाला ह्या स्त्रीच्या संबंधानें जास्ती माहिती द्यावयाची आहे ती इतकीच कीं तिच्या कपाळीं कुंकू नव्हतें आणि हातांत बांगड्या नव्हत्या.

असो. ही स्त्री आमच्या दोन प्रवाशांपुढें आदबशीरपणानें येऊन उभी राहिली; तेव्हां त्या दोघांनीं तिच्याकडे कांहीं क्षण दृष्टि लाविली. मग बोवाजो म्हणाला, "मुक्ताबाई, तूं याच गांवची राहाणारी काय ?"

मुक्ताबाईनें उत्तर केलें, "नाहीं. माझें सासर अक्षेखवली येथें होतें आणि माझें माहेर सातारा येथें होतें. मी ह्या गांवांत येऊन राहिल्याला दोन वर्षें झालीं."

बोवाजीनें विचारलें, "तुझीं माणसें कोण कोण आहेत ? आणि येथें तुझी गुजराण कशावर होते ?"

मुक्ताबाईनें उत्तर केलें, "बोवाजी, तुमच्यासारखे कोणी प्रवासी ह्या गांवांत मुक्कामाला आले, तर त्यांना भाकऱ्या भाजून देऊन माझी चांगली गुजराण होते. शिवाय गांवांत एक दोन बाळंतिणींच्या अंगाला लावण्याचेंही काम नेहमीं माझ्याकडे असतें. त्यांचे योगानें मला लुगडीं वगैरेंची कांहीं ददात पडत नाहीं, इतकेंच नव्हे, तर चार पैसे शिल्लक राहून देवाधर्माच्या कामांकडे देखील मला लावतां येतात, गोरगरिबांचा समाचार घेतां येतो, आणि चार सहा महिन्यांनीं काशा तीर्थांच्या ठिकाणीं सुद्धां जातां येतें; आणि बोवाजी, मी ह्या गांवांत कांहींच जरी काम केलें नाहीं, तरी मजजवळ माझ्या जन्माला पुरण्याइतके पैसे आहेत. पण बोवाजी, आपल्या प्रेमाचीं कोणी माणसें उरलीं नाहींत तर पैसा घेऊन काय चाटावयाचा आहे ? मनाला विरंगुळा पडण्यासाठीं मी लोकांचीं कामें पतकरतें. मला रिकामें बसवत नाहीं."

मुक्ताबाईनें सांगितलेली ही हकीगत ऐकून गोसाव्याला आणि धोंडीबाला तिचें कौतुक वाटलें. तिचें रमणीय दर्शन, तिचें साधें, सरळ आणि निष्कपट भाषण, तिची उपकारशीलता, गरीबांविषयीं कळवळा, देवाधर्माकडे प्रवृत्ति, निरुद्योगी बसण्याचा कंटाळा, इत्यादि गुण पाहून तिच्याकडे त्या दोघां प्रवाशांचें लक्ष्य विशेष प्रकारानें वेधलें गेलें.

तसेंच तिची कौटुंबिक विपन्नता पाहून तर गोसाव्याचें अंतःकरण तिच्याकडे विशेष रीतीनें आकृष्ट केलें गेलें, आणि तिची हकीगत जास्ती तपशीलवारपणें ऐकून घ्यावी असें त्याला वाटलें. तो अनुकंपेच्या स्वरानें तिला म्हणाला, "मुक्ताबाई, तूं उभी राहून किती वेळ बोलशील ? बैस येथें आणि आम्हाला सांगावयाला तुझी कांहीं हरकत नसली तर तुझी हकीगत आम्हाला सविस्तर सांग."

मुक्ताबाई अदबशीरपणानें बसली आणि म्हणाली, "बोवाजी, माझी हकीगत तुम्हाला तपशीलवारपणानें सांगावयाला माझी कांहीं हरकत नाहीं. कारण, पूर्वजन्मींचीं पातकें आपणाला ह्या जन्मीं भोगावीं लागतात, ह्या जन्मीं आपण कितीही नीतीनें आणि धर्मानें वागलों, तरी प्राक्तनाचीं फळें ह्या जन्मीं आपल्या भोगाला येतात हें तत्त्व माझ्या हकीगतींत स्पष्टपणें दिसतें. ऐका माझी हकीगत. ही माझी हकीगत ह्या गांवांत मीं कोणालाच सांगितली नाहीं. प्रत्येक मनुष्याला कांहीं तरी दुःखें असतातच. त्यांत आणखी माझ्या कौटुंबिक कर्मकथेची भर घालून त्यांच्या दुःखांत भर कशाला घालावी ? परंतु तुम्हाला माझी हकीगत ऐकण्याची इच्छा असली तर मी सांगतें, ऐका."

असें म्हणून तिनें आपली हकीगत सांगावयाला प्रारंभ केला. ती हकीगत वाचकांना आम्ही पुढील प्रकरणीं निवेदूं.

---

## प्रकरण १५ वें.

# मुक्ताबाईची हकीगत.

मुक्ताबाई म्हणाली, "माझें माहेर सातारा गांवीं होतें. माझ्या बापाला पांच मुलगे आणि मी एक मुलगी अशीं एकंदर सहा अपत्यें होतीं. माझी आई प्रेमळ असून आम्हां सहा भावंडांवर सारखी प्रीति करीत असे; माझ्या बापाचें आईबर

आणि आईचें बापावर भारी प्रेम असे, आणि सर्व सातारा शहरांत आमचें कुटुंब अत्यंत सुखी आणि नमुनेदार म्हणून गणलें जात असे.

माझ्या बापाचा तांदळांचा व्यापार मोठ्या दांडग्या प्रमाणावर चालत असे आणि तो थोडीशी सावकारीही करीत असे. त्यामुळें आमचें कुटुंब मराठे जातीमध्यें अत्यंत श्रीमंत असे. माझे पांची भाऊ माझ्यापेक्षां वडील होते. ते बापाच्या व्यवहारांत त्याला पुष्कळ मदत करीत असत. त्या सर्वांचीं लग्नें झालेलीं होतीं, पण मूल कोणालाच नव्हतें.

अशा रीतीनें आमचें कुटुंब सुखांत आणि वैभवांत असतां माझें लग्न झालें. मी तेव्हां दहा वर्षांची होतें. माझा सासरा असेंखवलीचा राहाणारा असून खाऊन पिऊन सुखी होता, पण माझ्या बापाच्या तोलाचा नव्हता. तथापि त्याचा आणि माझ्या बापाचा पूर्वीचा प्रेमाचा ऋणानुबंध असल्याकारणानें माझ्या बापानें त्याच्या एकुलत्या एका मुलाशीं माझें लग्न करून दिलें. माझा सासरा आणि सासू हीं दोघें नीतिमान् होतीं आणि मला तीं पोटच्या मुलीप्रमाणें जपत असत. माझें लग्न झालें तेव्हां माझे धनी सोळा वर्षांचे होते, आणि ते केंजळगडावर पागनीसांच्या हाताखालीं तोबऱ्याच्या कामावर होते. ते रोज असेंखवलीहून केंजळगडावर नोकरीच्या वेळेला हजर राहात असत. त्यांच्या कामाचा कधीं बोभाटा नसे.

याप्रमाणें माझें सासर आणि माहेर सुखासमाधानाच्या स्थितींत असतां आमच्या दुर्दैवाला सुरवात झाली. प्रथम माझी सासू मेली. तिच्या पाठोपाठ दोन महिन्यांनीं माझा सासरा मेला. हें दुःख मागें पडतें तों आमचें घर जळालें आणि आमचें धान्य धून्य, चिरगुट पांघरूण, पैसा अडका, सामानसुमान, सर्व कांहीं अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडलें. तांब्यापितळेचीं कांहीं भांडीं मात्र राहिलीं. तेव्हां आम्ही दोघें जण केंजळगडावर राहावयास गेलों. धन्यांना तोबऱ्याच्या कामावर जो पगार मिळे तो आम्हां उभयतांना चांगला पुरत असे. शिवाय मी चुणचुणीत आणि बोलकी पोरगी असल्याकारणानें आणि शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या मुलांचीं कौतुकें करणारी असल्याकारणानें त्या वेळच्या हिंदू गडकऱ्यानें आपल्या पुतण्याला संभाळण्याच्या कामावर मला ठेविलें."

गोसाव्यानें विचारलें, "तो हिंदू गडकऱ्याचा पुतण्या किती वर्षांचा होता आणि त्याचें नांव काय होतें?"

मुक्ताबाई म्हणाली, "तें कोंवळें पोरगें अवघें चार वर्षांचें होतें. तें भारी सुंदर होतें. तें अतिशय खेळकर होतें. रडणें ही काय वस्तु ती त्याला स्वप्नांतही

ठाऊक नव्हती. पोरगें अगदीं नक्षत्रासारखें होतें. त्याचे डोळे तर असे मोठे आणि चमकदार होते कीं सांगतां सोय नाहीं. त्याला गडकरीसाहेब आणि त्यांची बायको नुसतें पोरगें म्हणत असत. पण इतर माणसें त्यांना धाकटे रावसाहेब, छोटे गडकरी, असें म्हणत. त्या मुलाचें खरें नांव काय होतें तें मला ठाऊक नाहीं."

गोसाव्यानें विचारलें, "त्या मुलाला त्या वेळीं बोलतां येत होतें काय?"

मुक्ताबाई म्हणाली, "अगबाई, त्याची एकसारखी बुलबुल चाललेली असे. हें झाड कसलें? हें फूल कसलें? ह्या दागिन्याला काय म्हणतात? तो दागिना पुरुष कां नाहीं घालीत? कुत्र्याचें शेंपूट वांकडें कां असतें? घोड्याला शिंगें कां नसतात? कावळ्याला बुबुळें किती असतात? मांजराला अंधेरांत कसें दिसतें? इत्यादि असंख्य प्रश्न विचारून तो मला अगदीं भंडावून सोडीत असे. त्या पोराचा आवाज भारी गोड असे आणि त्याची बुलबुल ऐकून दुःखी माणसाला देखील दुःखाचा विसर पडत असे."

गोसाव्यानें विचारलें, "तें पोर कधीं आजारी बिजारी पडत असे काय?"

मुक्ताबाई म्हणाली, "छेः, अगदीं कधीं देखील तें मूल आजारी पडत नसे. सदा टवटवीत, सदा हंसतमुख, सदा खेळकर! त्याला आजार कसा तो ठाऊक नव्हता."

गोसावी म्हणाला, "बरें पुढें?"

मुक्ताबाई म्हणाली, "हें मुलाला संभाळण्याचें काम मी फार तर पांच सहा महिने केलें असेल नसेल, तों एके दिवशीं दुपारीं गडकरीसाहेब मी मुलाला घेऊन बसलें होतें तेथें आले आणि म्हणाले, 'मी ह्या मुलाला आमच्या कुलदेवतेच्या पायांवर घालावयाला घेऊन जाणार आहें. मी आतांच त्याला घोड्यावर घालून घेऊन जातों; तीन दिवसांनीं परत येईन. कर त्याची तयारी.' घोड्यावर बसून जावयाला सांपडेल म्हणून त्या मुलाला भारी आनंद झाला. मी त्याच्या अंगावर कपडे चढविले आणि त्याची तयारी केली. तों इतक्यांत गडकरीसाहेब घोड्यावर स्वार होऊन आले. त्यांच्या खोगिरावर मी त्या मुलाला बसविलें. गडकरीसाहेबांनीं त्याला डाव्या हाताचा विळखा घालून घट्ट धरलें आणि घोडा उडवीत उडवीन ते गडांतून बाहेर पडले. त्या मुलाचें हें मला शेवटचेंच दर्शन! कारण, तीन दिवसांनीं गडकरीसाहेब एकटेच परत आले. मुलगा त्यांच्याबरोबर नव्हता."

गोसाव्यानें विचारलें, " मुलाचें काय झालें ? "

मुक्ताबाई म्हणाली, " तें सांगतें. गडकरी साहेब कार्तिक वद्य चतुर्दशीला मुलाला घेऊन गडावरून गेले. तो सोमवारचा दिवस होता. मला पक्कें आठवतें. कारण, दुसऱ्या दिवशीं देवाची दिवाळी होती, आणि त्या मुलासाठीं मी ओल्या नारळाच्या करंज्या करणार होतें. कारण, त्यानें मला ओल्या नारळाची करंजी आवडते असें म्हटलें होतें; आणि आमच्यासाठीं आम्ही घारगे तर करणार होतोंच, म्हणून मला तो दिवस पक्का आठवतो. असो. सोमवारीं रात्रीं जोराचा पाऊस आला. मंगळवारीं सकाळीं आभाळ स्वच्छ होतें, परंतु तिसऱ्या प्रहरास आभाळांत ढग येऊं लागले आणि संध्याकाळीं जो पाऊस सुरू झाला तो मध्यरात्रीपर्यंत पडत होता. विजाही कडकडत होत्या. बुधवारीं पाऊस पडला नाहीं, पण आभाळांत दाट ढग पसरलेले होते आणि पाऊस पडेल असा रंग दिसत होता, पण पडला नाहीं. गुरुवारीं तिसऱ्या प्रहरीं गडकरीसाहेब परत आले पण ते एकटे आले. मुलगा वाटेंत पावसानें भिजला, त्याला थंडी वाजून ताप आला, आणि त्या तापानें तो मेला. 'त्याला वाटेंतच मी जाळला,' असें गडकऱ्यानें सर्वांस सांगितलें."

ही हकीगत सांगतांना मुक्ताबाई दोन तीन वेळां सद्गदित कंठ होऊन रडत होती. धोंडीबा आणि गोसावी ह्यांचीं हृदयें दुःखानें कळवळून गेलीं होतीं.

कांहीं वेळ थांबून नंतर मुक्ताबाई म्हणाली, " त्यानंतर पंधरा दिवस मला अन्न गोड लागलें नाहीं. रात्रीं, दिवसा, जेवतांना, निजतांना, मला त्याची आठवण होई, आणि आतां सोळा वर्षांनीं देखील त्या मुलाची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी राहात आहे. किती गोड मुलगा होता तो !"

गोसाव्यानें विचारिलें, " मग पुढें काय झालें ? "

मुक्ताबाई म्हणाली, " त्या मुलाबद्दल गडावरील सर्व माणसें भारी हळहळलीं. पुढें मुलगा नाहीं म्हणून माझी नोकरी बंद झाली असें समजून मी सरकारवाड्यांत जाईनाशी झालें. पुढें पंधरा वीस दिवसांनीं मला गडकरी साहेबांनीं बोलवून नेऊन 'माझ्या बायकोची दासी होतेस' काय म्हणून विचारलें. मी होय म्हणून ती नोकरी पतकरली. ही नोकरी मी दहा पंधरा दिवस केली, तों एके दिवशीं गडकरीण बाईचा कांहीं निरोप गडकरीसाहेबांना सांगावयासाठीं मी त्यांच्या महालांत दुपारीं तिसऱ्या प्रहरीं गेलें असतां ते निरोप न ऐकतां माझ्या तोंडाकडे निर्लज्जपणानें पापी दृष्टि करून मला कांहीं बीभत्स खुणा करूं लागले. इतक्यांत त्याच महालांत गडकरीणबाई स्वतां आल्या. त्या आल्या असें पाहून

मी सुळुकदिशीं तेथून बाहेर पडलें. मग ती हकीगत मी धन्यांना सांगितली. तेव्हां इतःपर गडावर राहाणें धोक्याचें आहे, असें आम्ही ठरवून तेथून पळालों आणि साताऱ्यास येऊन राहिलों. केंजळगडावर मी एकंदर सहा सात महिन्यांहून अधिक दिवस राहिलें नाहीं."

धोंडीबानें विचारलें, "पुढें काय झालें?"

मुक्ताबाई म्हणाली, "साताऱ्यास आणि आजूबाजूस पंचवीस तीस कोश प्रदेशांत ह्या सालीं भयंकर दुष्काळ पडलेला होता. ह्या वेळीं माझ्या बापाचा धंदा चालेनासा झाला होता. दोन तीन वर्षें त्याचा धंदा बसत बसत चालला होता. येणीं येईनात आणि देणीं चुकेनात. अशा रीतीनें देणीं देतां देतां त्याची सगळी संपत्ति खलास झाली. नंतर भयंकर पटकीचा आजार त्या प्रांतांत सुरू झाला, आणि एका महिन्यांत माझा बाप, आई, पांच भाऊ, त्यांच्या बायका, अशीं बारा माणसें मरण पावलीं, आणि शेवटीं त्यांच्या घराला आग लागली आणि सर्व नाश झाला."

धोंडीबा आणि गोसावी ही हृदयद्रावक हकीगत ऐकून दुःखानें कळवळून गेले. मुक्ताबाई मेलेल्या माणसांच्या आठवणी काढून रडूं लागली. तिचें रोदन ओसरल्यावर तिला त्यांनीं विचारलें, "पुढें तुम्हीं काय केलें?"

मुक्ताबाई म्हणाली, "मग आम्ही तेथून नाशकास माझी मावशी असे तिच्या आश्रयाला गेलों. येथें धन्यांना एका सराफाच्या दुकानांत नोकरी लागली. ह्या नोकरीच्या पैशावर आमची चांगली गुजराण होऊन आम्ही चार पैसे बाळगून होतों. ही नोकरी धन्यांनीं दहा बारा वर्षें केली. माझे धनी सराफाला फार आवडत असत. कारण, ते सांगितलेलें काम अगदीं न विसरतां वेळच्या वेळीं करीत असत. त्याच्या गुंजभर सोन्याला ते कधीं शिवले नाहींत. ते मर्यादशील, खरें बोलणारे आणि प्रामाणिक होते. परंतु दोन वर्षांमागें माझे धनी विषमज्वरानें आजारी पडले आणि त्यांत त्यांचा अंत झाला—मी एकटी पडलें."

असें म्हणून मुक्ताबाईना पुन्हां रडण्याचा हुंदका आला, तो ओसरल्यावर गोसावी म्हणाला, "मुक्ताबाई, ह्या जगांत दुःखी नाहीं असा कोण मनुष्य आहे? सर्वांच्या मागें दुःखें लागलींच आहेत! कमी किंवा जास्ती इतकाच फरक!"

धोंडीबा म्हणाला, "मग तुम्ही नाशकाहून येथें नांदेडला आलांत काय?"

मुक्ताबाई म्हणाली, "तो नाशिकाचा सराफ कुटुंबवत्सल होता. संसारांत त्याच्यावर अनेक आपत्ति कोसळलेल्या होत्या. त्याला माझ्या स्थितीची बरोबर

कल्पना आली. माझें सांत्वन करावयाला त्यानें आपल्या बायकोला माझ्याकडे सात आठ वेळां पाठविलें, आणि धन्यांना जितका पगार ठरलेला असे तितका पगार ते फुकट मजकडे पाठवून देत असत. अशा रीतीनें पांच सहा महिने गेले. पुढें एक दिवस मी सराफाच्या घरीं जाऊन नाशीक सोडण्याचा माझा विचार त्याला सांगितला. मी त्याला म्हटलें, 'मी आतां अशा ठिकाणीं जातें कीं तेथें जुन्या ओळखीचीं किंवा परिचयाचीं किंवा तोंड ओळखीचीं मला कोणी माणसें दिसणार नाहींत, किंवा त्यांच्या आठवणी करून देणाऱ्या वस्तूही मला दिसणार नाहींत. मी नांदेडला जाऊं इच्छितें असें त्याला सांगितलें. पुष्कळ वेळ 'नको नको, मी तुझा माझ्या पोटच्या मुलीप्रमाणें प्रतिपाळ करीन,' असें तो म्हणाला; पण शेवटीं माझ्या आग्रहावरून त्यानें मला जाण्याला मोकळीक दिली. त्यानें मला एक मोहोरांची पिशवी बक्षीस दिली, आणि मला या गांवीं आणून सोडण्यासाठीं आपला एक गडी माझ्याबरोबर दिला. येथें मीं दोन वर्षें आहें. ही माझी दुःखकारक हकीगत."

गोसाव्यानें विचारलें, "मुक्ताबाई, तुला मुलेंबाळें झालीं नाहींत काय ?"

मुक्ताबाई म्हणाली, "मीं अठरा वर्षें वैवाहिक स्थितीमध्यें होतें. मला दहा मुलें झालीं. पण चार महिन्यांहून अधिक दिवस एकही मूल जगलें नाहीं. मी आतां जगांत एकटी आहें. मजजवळ पैसा पुष्कळ आहे, पण त्याचा मला काय उपयोग ?"

ही मुक्ताबाईची दुःखमय हकीगत ऐकून त्यांना तिची दया आली. तिचीं मेलेलीं माणसें परत आणून देण्याचें त्यांच्या अंगीं सामर्थ्य नव्हतें. त्यांनीं तिचें सांत्वन औपचारिक रीत्या केलें. ते तरी अधिक काय करणार ?

---

## प्रकरण १६ वें.

# महेश्वराचें हृद्गत.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मुक्ताबाई तावरे हिचें पूर्ववृत्त समाप्त झालें. तें समाप्त झाल्यावर आमच्या दोन प्रवाशांनीं तिला भाकऱ्यांच्या संबंधानें जें कांहीं सांगावयाचें होतें तें सांगून तिला रुखसत दिली.

ती तेथून गेल्यावर कांहीं वेळानें तेथें पुंडरीक आला. त्यानें ह्या दोन प्रवाशांना त्या घराच्या सर्व सोयी दाखविल्या. मग ते तिघेजण परत पडवींत आले.

इतक्यांत त्या घराचा यजमान घरीं परत आला. तो ह्या दोन प्रवाशांकडे आणि आपल्या मुलाकडे पाहून म्हणाला, " नाना, ( तो आपल्या ओळखीचा पुंडरीक ) हे दोघे इसम आपल्या येथें मुक्कामाला उतरले आहेत काय ? "

नाना म्हणाला, " होय, बाबा. "

हीं बापलेकांचीं प्रश्नोत्तरें होत आहेत तों धोंडीबा आणि गोसावी,—जे पडवींत बसले होते,—ते उठून आणि पुढें येऊन घराच्या मालकाला म्हणाले, " बाबा, तुमच्या नानानें आमची विचारपूस करून आमच्या सर्व सोयी जुळवून दिल्या. तो चांगला मुलगा आहे. "

हे नानाच्या संबंधानें उच्चारलेले शब्द ऐकून महेश्वराला आनंद झाल्याचें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें. मग महेश्वर म्हणाला, " नाना, त्यांना भांडेंकुंडें, ताकपाणी, वगैरे जें कांहीं पाहिजे असेल तें आणून दे. " मग ह्या दोन प्रवाशांकडे पाहून महेश्वर म्हणाला, " बोवाजी, कांहीं संकोच करूं नका. जें कांहीं तुम्हाला पाहिजे लागेल तें मागून घ्या. " मग नानाकडे वळून महेश्वर म्हणाला, " नाना, त्यांच्याजवळ कांबळीं दिसत नाहींत. दोन कांबळीं त्यांना आणून दे."

सारांश, महेश्वर आणि नाना ह्या दोघांच्या आस्थाळुपणामुळें आमच्या दोन प्रवाशांच्या सर्व सोयी अगदीं घरच्याप्रमाणें जुळल्या. आतां आम्ही कांहीं पाल्हाळ न लावतां वाचकांना इतकेंच सांगतों, कीं धोंडीबा आणि गोसावी ह्या दोघांचीं रात्रीचीं जेवणें झालीं. महेश्वराच्या घरांतील सर्व माणसांचींही जेवणें झालीं. मग महेश्वर आणि नाना हीं दोन घरचीं माणसें, आणि गोसावी आणि धोंडीबा, हीं दोन प्रवासी माणसें ओटीवर गप्पागोष्टी करावयाला बसलीं.

संभाषणाला सुरवात करतांना गोसावी म्हणाला, " बाबा, तुम्ही ह्याच गांवचे रहिवासी काय ? "

महेश्वर म्हणाला, " होय. मी ह्याच गांवचा रहिवासी आहें. येथें माझें हें घर असून, माझीं चार शेतें आहेत. त्यांवर आह्मा तिघांची चांगली गुजराण होऊन चार पैसे शिल्लक टाकतां येतात. तुम्ही ह्या गांवीं पूर्वी कधीं आलेले नव्हतां काय ?"

धोंडीबा म्हणाला, " ह्या गांवाचें नांव आम्ही ऐकिलेलें होतें, पण येथें कधीं आलेले नव्हतों. "

गोसावी म्हणाला, " मीही ह्या गांवाचें नांव ऐकिलेलें होतें; पण हा गांव मी कधीं पाहिलेला नव्हता. "

महेश्वरानें विचारलें, " बोवाजी, तुम्ही आतां कोणत्या तीर्थाकडे जावयाला निघालां आहां ? "

गोसावी म्हणाला, " माझीं प्रेमाचीं सर्व माणसें मरण पावल्याकारणानें मी अगदीं वैतागून गेलों, आणि तीर्थाटनानें मनाला शांति मिळाली तर पाहावी, म्हणून काशीहून रामेश्वराकडे जावयाला निघालों होतों. परंतु महाराष्ट्राची हीन दीन स्थिति पाहून महाराष्ट्रीयांच्या दुःखाचा वांटेकरी होण्यासाठीं मी महाराष्ट्रांतच हिंडावयाचा निश्चय केला आहे. मी आतां रामेश्वराला जावयाचा विचार सोडून दिला आहे. माझ्या ह्या पालटलेल्या मनोवृत्तीला न शोभणारा हा गोसाव्याचा वेश टाकून देऊन मी तुमच्यासारखा वेष धारण करणार आहें. हे गृहस्थ, ( धोंडीबाकडे पाहून ) आजच मला रस्त्यांत भेटले. त्यांना विजापुरास जावयाचें आहे. त्यांना एक घोडा, मुंडासें, तरवार, वगैरे विकत घेणें आहे. ह्या गांवांत अस्सल अवलादीचे घोडे विकत मिळतील काय ? "

महेश्वरानें उत्तर दिलें, "होय. मिळतील. पण हे आले कोठून ? आणि येथपर्यंत आले कसे ?" मग धोंडीबाकडे पाहून, "भाऊ, तुम्हाला मुसलमानांनीं वाटेंत नागवलें कीं काय ?"

तेव्हां धोंडीबानें उत्तर दिलें, "मी केंजळगडावर राहात असतों; किंवा राहात असें, असें म्हटलें तर तें बरोबर होईल. कारण, आतां केंजळगडावर माझें कोणी माणूसही नाहीं आणि तिकडे परत जाणेंही मला शक्य नाहीं."

तें ऐकून महेश्वर म्हणाला, " काय ? तुम्हीं केंजळगडावर राहात होतां ? "

धोंडीबा म्हणाला, " होय, इतके दिवस मी केंजळगडावर रहात असें."

महेश्वरानें विचारलें, "केंजळगडाच्या जवळच अस्रेंखवली हा गांव आहे ना ?"

धोंडीबा म्हणाला, " होय, केंजळगडाच्या पूर्वेकडे कोश दीड कोशावर अस्रेंखवली आहे. तुम्हांला त्याची काय माहिती ? किंवा तुमचें कोणी नातलग माणूस त्या गांवीं आहे काय ? "

महेश्वर म्हणाला, " छे:, तशांतला कांहीं प्रकार नाहीं. पण त्या अस्रेंखवलीहून विजापुराला जावयाला निघालेलीं तीन माणसें काल रात्रींच्या मुक्कामाला आमच्याच घरीं उतरलीं होतीं. तीं माणसें आज सकाळीं येथून रवाना झालीं. वाटेवर पुढें एक जंगल आहे, त्यांत चोरट्यांचा उपद्रव आहे म्हणून जंगलांतून तीं तीन माणसें पार पडें तोंपर्यंत त्यांना सोबत म्हणून हाच माझा नाना गेला होता. वाटेंत कांहीं

मुसलमान लोक त्यांना भेटले. पण त्यांचा पराभव करून आणि त्यांना माफी मागावयाला लावून ह्या वाटसरांना नानानें सागर गांवापर्यंत पोंचविलें. मग नाना परत फिरला."

धोंडीबानें विचारलें, " तीं तीन माणसें कोण होतीं ? "

महेश्वर म्हणाला, " एक पोक्त स्त्री मालिनीबाई, दुसरी तिची मुलगी अरुंधती, आणि त्यांना पोंचविणारा पुरुष मालिनीबाईंचा भाचा अशीं तीं तीन माणसें होतीं."

धोंडीबा म्हणाला, " तीं माझींच तीन माणसें. पोक्त स्त्री ती माझी बायको आणि अरुंधती आमची मुलगी आणि गजानन आमचा भाचा. हीं तीन माणसें काल रात्रीं मुक्कामाला तुमच्या येथें होतीं काय ? "

महेश्वर म्हणाला, " होय. कर्मधर्मसंयोगानें आज तुम्हीही मुक्कामाला येथेंच आलां आहां. तुम्ही आतां कोठें निघालां आहां ? आणि तुम्ही चारी माणसें एकदमच कां नाहीं निघालां ? "

तेव्हां गोसावी म्हणाला, " धोंडीबा, तुम्ही आपली सगळी हकीगत ह्यांना सांगितल्याशिवाय ह्यांना कांहीं बोध व्हावयाचा नाहीं. सगळी हकीगत मूळापासून ह्यांना सांगा. "

" होय, तसेंच केलें पाहिजे " असें म्हणून धोंडीबानें आपली हकीगत मूळापासून सांगण्याला सुरवात केली. अरुंधतीवर केंजळगडाच्या नबाबाची पापी नजर गेली, आणि त्यानें धोंडीबाजवळ तिच्याबद्दल मागणी केली, धोंडीबानें पुढचे प्रकार टाळण्यासाठीं तिला आणि तिच्या आईला गजाननाच्या सोबतीनें विजापुराकडे रवाना करून दिलें, मग निराश झालेल्या नबाबानें धोंडीबाला कैदेंत घातलें, तेथून तो पळाला, मग पायानें चालत चालत तो पुष्कळ वाट चालला, तों त्याला जाफरखान अरुंधतीला घोड्यावर घालून केंजळगडाकडे घेऊन जात असलेला दिसला, नंतर पुढें गोसावी भेटला, मग ते प्रवासासाठीं घोडा वगैरे मिळविण्यासाठीं गोसावी आणि धोंडीबा नांदेडला आले, इत्यादि सर्व हकीगत —जी वाचकांना ठाऊकच आहे—ती धोंडीबानें महेश्वराला सांगितली.

ही हकीगत सांगणें संपल्यावर धोंडीबा वैतागाच्या स्वरानें म्हणाला, " हे परधर्मी परदेशी मुसलमान म्हणजे केवळ दैत्य होत. हे मुसलमान राज्यकर्ते रयतेला किती गांजतात, नाडतात, पीडितात, छळतात, ह्याचें वर्णन करणें अशक्य आहे. हे मुसलमान राज्यकर्ते हिंदू रयतेवर अनेक जबर आणि जुलमी कर लादतात,

झजियासारखे अन्यायी कर बसवितात, हिंदूंना खरा न्याय मिळूं शकत नाहीं, आणि मुसलमानांच्या हातून गुन्हा घडणेंच शक्य नाहीं असें हे मुसलमान राज्यकर्ते समजतात. मुसलमान राज्यकर्त्यांचें असें मत आहे कीं दरवडे घालतात ते हिंदू, चोऱ्या करतात ते हिंदू, खून करतात ते हिंदू, गवताच्या गंजी आणि घरें जाळतात ते हिंदू, लांच खातात ते हिंदू, सगळे अपराध, सगळे गुन्हे, सगळीं पातकें करतात ते हिंदू. राज्यकर्ते मुसलमान असल्याकारणानें सगळे मुसलमान शेफारून गेले आहेत आणि हिंदूंना बाटविणें, हिंदूंच्या देवांचीं देवळें फोडणें, हिंदूंच्या शेंड्या कापणें, ब्राह्मणांचीं जानवीं कापणें, हीं आणि अशाच जातीचीं असंख्य दुष्कृत्यें मुसलमान लोक दिवसाढवळ्या करतात, आणि हिंदूंची दाद लागत नाहीं. ह्या मुसलमानांनीं त्राही भगवान असें हिंदूंना करून सोडलें आहे !"

त्याप्रमाणें धोंडीबानें क्रोधानें प्रेरित होऊन भाषण केलें आणि शेवटीं शेवटीं त्याचा क्रोध अधिक अधिक उग्र होत गेला. त्याला शांत करण्याच्या उद्देशानें महेश्वर म्हणाला, " धोंडीबा, देव दयाळू आहे, देव न्यायी आहे, आणि देव सर्वसाक्षी आहे. ह्या महाराष्ट्रांत हिंदू लोकांना किती दुःख होत आहे हें त्याला कळत नाहीं असें नाहीं. परंतु तो मुसलमानांचे शंभर अपराध भरण्याची वाट पहात आहे. शंभर अपराध भरल्याबरोबर तो खचित अवतार घेईल, आणि परशुरामानें पृथ्वी जशी निःक्षत्रिय करून टाकली, तसा तो अवतारी पुरुष ह्या महाराष्ट्राला निर्मुसलमान करून टाकील. मीं असें ऐकिलें आहे कीं देवानें अवतार घेतला देखील आहे. शिवाजी हा तो अवतारी पुरुष होय असें म्हणतात. कोणी म्हणतात शिवाजी हा कोणी माणूस नाहीं. ही उगीच कांहीं तरी बातमी उठलेली आहे. खरें काय असेल तें असो. पण हा शिवाजी जरी कोणी खराखुरा पुरुष नसला, तरी कोणी खरा अवतारी पुरुष जन्माला येईल, अशी मला खात्री वाटते. आज नाहीं तर उद्यां, उद्यां नाहीं तर परवां, कोणी तरी अवतारी पुरुष जन्माला येईल हें खास, आणि तो ह्या महाराष्ट्राचें नष्टचर्य घालवील ह्यांत कांहीं शंका नाहीं."

त्यावर गोसावी म्हणाला, " मीही ह्या शिवाजीचें नांव ऐकिलें आहे. कोणी म्हणतात शिवाजी हा खरा आहे, कोणी म्हणतात ती केवळ अफवा आहे, हे धोंडीबा विजापुराला जाऊन परत आले म्हणजे ते आणि मी असे दोघे जण त्या शिवाजीचा माग काढणार आहों, शिवाजी आम्हाला भेटला तर आम्ही त्याचे

अनुयायी होणार, आणि तसा कोणी पुरुष नसलाच तर मी सर्व महाराष्ट्रभर हिंडून कोणी तरी तरुण, उत्साही, कर्तबगार, आणि शूर पुरुष हुडकून काढून त्याला अनुयायी मिळवून देणार ! हिंदूंच्या देशांत हिंदूंचें राज्य असल्याशिवाय हिंदूंना सुखानें भाकरी खातां येणार नाहीं असें माझें मत आहे. मी उद्यांच्या उद्यांच हा गोसाव्याचा वेष टाकून देऊन साध्या गृहस्थाचा वेष धारण करणार. माझें स्वताचें कुटुंब जरी नष्ट झालेलें असलें, तरी मला समाजरूपी कुटुंब आहे. ह्या कुटुंबांत जें कर्तव्य मला करतां येण्याजोगें आहे, तें मी करणार, आणि असें केल्यानेंच आतां माझ्या मनाला शांति मिळूं शकेल."

तेव्हां महेश्वर म्हणाला, "तुम्ही जर शिवाजीचा माग काढावयाला जाणार असलां, तर मीही तुमच्याबरोबर येणार आणि शिवाजी दिसला तर त्याला डोळे भरून पाहाणार आणि त्याच्या कार्याला माझ्या हातून होईल तितकी मदत करणार."

तेव्हां गोसावी म्हणाला, "तुमचा निश्चय ऐकून मला भारी आनंद होत आहे. आपण सर्वांनीं नेत्याला मदत केली तर नेता कांहीं तरी पराक्रम करील. रामाला माकडांचें आणि आस्वलांचें साहाय्य झालें म्हणूनच त्याच्या हातून रावणाचा कांटा उपटला गेला."

तेव्हां महेश्वर म्हणाला, "पण बोवा, अगोदर शिवाजी असला तर आपण त्या शिवाजीला साहाय्य करणार ! नसला तर आपले बेत आपल्या जागीं."

तेव्हां गोसावी म्हणाला, "शिवाजी म्हणून कोणी पुरुष नसला, तर आपण एक खरा शिवाजी उत्पन्न करूं."

हें आणि अशाच प्रकारचें संभाषण कांहीं वेळ झालें. मग महेश्वर आपल्या प्रवाशांना म्हणाला, "आतां रात्र बरीच चढलेली आहे. तुम्ही दोघे दमलेले आहां. आतां स्वस्थ निजून विश्रांति घ्या." मग नानाकडे पाहून तो म्हणाला, "नाना, ह्यांना आपल्या घोंगड्या आणून दे. त्यांच्याजवळ घोंगड्या दिसत नाहींत."

नानानें लागलीच घरांत जाऊन त्यांना घोंगड्या आणून दिल्या. मग ते बापलेक निजावयाला गेले. हे प्रवासी ह्या पडवीमध्यें निजले. त्यांना तत्काळ गाढ झोंप लागली.

---

## प्रकरण १७ वें.

# दयाळसिंग.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे सोमवारीं सकाळीं गोसावी आणि धोंडीबा असे दोघे जण जागे झाले, तेव्हां त्यांना रात्रीच्या विश्रांतीमुळें फार हुशारी वाटली. मग प्रातः-काळचे विधि आटोपतांच गोसाव्यानें गांवांतील एका नापिताला बोलावून आणून त्याच्याकडून आपलें बाह्य रूप पूर्णपणें बदलून घेतलें. त्यानें आपल्या डोक्यावरील जटांचा भार नाहींसा करविला, आणि हिंदुत्वाचें द्योतक म्हणून शेंडी आणि घेरा राखविला. दाढी साफ उडवून देवून त्यानें आपली हनुवटी आणि गाल गुळगुळीत करविले,—मात्र गालांवर त्या काळच्या रिवाजाप्रमाणें कल्ले ठेवविले.

अशा रीतीनें स्वतांचें रूपांतर करवून घेऊन त्यानें अंगाला तेल लावून स्नान केलें, आणि महेश्वर आणि पुंडरीक यांनीं बाजारांत जाऊन विकत आणलेले कपडे अंगावर घालून नंतर यथास्थान हत्यारें लटविलीं.

धोंडीबानें अभ्यंग स्नान करून अंगावर कपडे चढविले आणि नंतर यथास्थान हत्यारें लटकाविलीं.

आपला गोसावी वर्णानें गोरा आणि काठीनें उंच असल्याकारणानें ह्या नव्या पोशाखांत तो फारच खुलून दिसूं लागला. त्याचें उंच कपाळ, विशाळ काळेभोर आणि पाणीदार डोळे, त्याचें चांफेकळीसारखें सरळ नाक, आणि फुगीर गाल, ह्यांच्या योगानें तो एकाद्या राजबिंड्या पुरुषाप्रमाणें शोभत होता.

धोंडीबा हाही काठीनें उंच होता आणि त्याच्या पोटऱ्या, दंड, छाती, मांड्या, वगैरे गात्रें भरदार असल्याकारणानें तोही ह्या नव्या पोशाखांत भारी खुलून दिसत होता.

ह्याप्रमाणें पोशाख करून ह्या दोघांही गड्यांनीं महेश्वराच्या घरच्या देवाला नमस्कार केला. नंतर ते दोघे नांदेड गांवांतील मारुतीच्या दर्शनास गेले. देवाचें दर्शन घेऊन हात जोडून आणि डोळे मिटून बोवाजीनें मनांत प्रार्थना केली, " हे मारुतिराया, मी आपलें स्वतःचें दुःख मागें टाकून समाजाचें दुःख मनांत आणीत आहें. कारण, समाजाच्या दुःखापुढें माझ्या स्वतांच्या दुःखाची काय मातब्बरी ? आज मुसलमानी अमलाखालीं हिंदू लोकांना अनंत प्रकारचीं दुःखें सहन करावीं लागत आहेत. ह्या दुःखांतून महाराष्ट्रांतील हिंदू लोकांना सोडविण्याच्या प्रचंड कार्यांत माझ्या वांट्याला जो अंश येईल, तो यथाशक्ति यथाबुद्धि करण्याची मला

ताकत दे. मी गोसाव्याचा वेश टाकून ह्या वीराचा पोशाख आजपासून धारण करीत आहें. हा पोशाख वीराच्या अंगावर चढला आहे हें महराष्ट्राला दाखवून देण्याच्या कामीं मला सहाय हो. त्या पोशाखाला न शोभेल असें वर्तन माझ्या हातून न होवो ! ”

धोंडीबानें मारुतीपुढें हात जोडून प्रार्थना केली, “ मारुतिराया, मी कुटुंबवत्सल मनुष्य आहें. माझीं सर्व माणसें खुशाल असून मला पुन्हां भेटतील असें कर, आणि माझ्या स्वतांच्या कुटुंबाचें योगक्षेम माझ्या हातून चालो आणि समाजरूपी कुटुंबांत माझा भाग माझ्या हातून उचलला जावो ! मुसलमानी अमलापासून आह्मा मराठे लोकांना सोडविण्याच्या कामीं जो कोणी पुरुष कांस कशील, त्याचें यथाशक्ति साहाय्य करण्याची मला बुद्धि दे ! मारुतिराया, नमस्कार !”

ह्याप्रमाणें गोसावी आणि धोंडीबा ह्यांनीं प्रार्थना केल्यावर ते दोघेजण देवळाच्या बाहेर पडले. तों रस्त्यांत त्यांची वाट पाहात उभे असलेले महेश्वर आणि पुंडरीक त्यांना दिसले. ह्या चौघां जणांनीं मिळून दयाळसिंग म्हणून घोड्यांचा व्यापारी होता त्याच्या पागेंत जावें असें पूर्वीं ठरलेलें होतें.

ते चौघेजण वाट चालत असतां महेश्वर विनोद करण्याच्या बुद्धीनें गोसाव्याला म्हणाला, “ बोवा, तुम्ही अंतर्बाह्य पालटले आहां. तुमची दाढी आणि जटा ह्यांना तुम्ही रजा देऊन आणि नारळाची आई टाकून तरवार, आणि धनुष्यबाण ह्यांचा स्वीकार केला आहे. गोसाव्याचा वेष जाऊन त्याच्या जागीं वीराचा वेष आला आहे. तसेंच तुमची तीर्थाटनाची इच्छा जाऊन देशसेवेची इच्छा तिच्याजागीं आली आहे. असे तुम्ही बाहेरून आणि आंतून पालटलेले आहां. तुम्ही आतां गोसावी नसून वीर पुरुष झालां आहां. आतां तुम्हांला बोवाजी म्हणणें बरोबर होणार नाहीं. तुम्ही दुसरें काहींतरी नांव घ्या. आम्ही तुम्हांला इतःपर बोवाजी म्हणणार नाहीं. तुम्ही कुटुंबी होतां तेव्हांचें तुमचें नांव जें होतें तें सांगा किंवा तें नांव तुम्हाला बुझवून टाकावें असें वाटत असल्यास दुसरें कोणतें तरी नांव सांगा. बोला कोणचें नांव सांगतां. काशीनाथ, गोविंदा, रंगनाथ...... ”

हें महेश्वराचें भाषण ऐकून धोंडीबा आणि पुंडरीक हे हंसले. बोवाजीही खो खो करून हंसत म्हणाला, “ मी आतां कुटुंबी नसल्याकारणानें त्या वेळचें माझें नांव माझ्या कानीं पडूं नये असें मला वाटतें. आणि नवीन कांहीं नांव घ्यावें तर तुम्ही तें मला सुचविलें पाहिजे. इतका वेळ तुम्ही जीं नांवें सुचविलीं त्यांपैकीं एकही

माझ्या पसंतीस येत नाहीं. काशीनाथ हें नांव ज्यांचें असतें ते सर्व लोक बढाईखोर असून खुशामतीनें वैभवाला चढलेले असतात असें माझ्या पाहाण्यांत आलें आहे. म्हणून काशीनाथ हें नांव नापसंत आहे. तसेंच गोविंदा हें ज्यांचें नांव असतें ते सर्व लोक स्वार्थी, लुच्चे आणि परोत्कर्षासहिष्णु असतात, असें माझ्या पाहाण्यांत आहे; म्हणून गोविंदा हें नांवही मला आवडत नाहीं. तसेंच रंगनाथ ह्या नांवाचे सर्व लोक छाकटे आणि लफंगे असतात, असें मीं पाहिलें आहे, म्हणून तेंही नांव मी घेऊं इच्छीत नाहीं."

तेव्हां महेश्वर म्हणाला, "आम्ही जें जें नांव सुचवूं तें तें तुम्ही नापसंत म्हणून ठरवूं लागलां तर आम्ही नांवें तरी कोठवर सुचवावीं?"

तेव्हां बोवाजी म्हणाला, "असें होण्याचा संभव आहे खरा. त्याला माझी एक तोड आहे."

महेश्वर म्हणाला, "ती कोणती?"

त्यावर बोवाजी पुंडरीकाच्या पाठीवर हात थोपटून म्हणाला, "हा गोड आवाजाचा छोकरा जें नांव सुचवील तें नांव मला गोड वाटेल. बोल नाना?"

हें भाषण ऐकून सर्व माणसें हंसलीं. पुंडरीक हंसून म्हणाला, "बोवाजी, मी जें नांव सुचवीन तें तुम्ही पत्करालना?"

तेव्हां गोसावी म्हणाला, "छोकऱ्या, तुझ्या गोड तोंडांतून गोड आवाजानें जें नांव उच्चारलें जाईल, त्या नांवाचा कोण अव्हेर करील?"

तेव्हां पुंडरीक म्हणाला, "मी तुम्हांला दादा म्हणेन."

दादा हें नांव अगदीं अकस्मात् रीतीनें कानीं पडतांच बोवाजी विजेचा धक्का बसल्याप्रमाणें दचकला आणि त्याच्या डोळयांत दोन अश्रुबिंदु उभे राहाण्याच्या बेतांत होते. परंतु त्यानें मनाच्या भावना नियंत्रित करून आणि हंसत हंसत उत्तर दिलें, "नाना, मी कुटुंबी होतों तेव्हां सामान्य व्यवहारांत दादा ह्याच नांवानें मी संबोधिला जात असें. हें नांव तुला आवडत असलें तर हेंच नांव मी आजपासून घेतों. यासाठीं बाबा, धोंडीबा, तुम्ही आणि नाना तुम्ही मला दादा असें म्हणा. बोवाजी असें म्हणूं नका."

असें बोलून आणि प्रेमानें पुंडरीकाची पाठ थोपटून बोवाजी त्याला म्हणाला, "नाना, तूं सुचविलेलें नांव मी स्वीकारीत आहें अं!"

नाना हंसला. इतर लोकही हंसले.

हीं विनोदाचीं भाषणें संपत आहेत तों हीं चारी माणसें दयाळसिंगाच्या पागे-पाशीं आलीं. त्यांना दारांतच दयाळसिंग भेटला. त्याला महेश्वर म्हणाला, "दयाळसिंग, तुमच्या जवळ उंची अवलादीचे घोडे आहेत काय ? आमच्या ह्या दोघां पाहुण्यांना दोन उंची अवलादीचे घोडे पाहिजे आहेत."

त्यावर दयाळसिंग म्हणाला, "या माझ्याबरोबर तबेल्यांत, म्हणजे सगळे घोडे तुम्हाला दाखवितों."

असें म्हणून दयाळसिंग ह्या चार मराठे गड्यांना घेऊन तबेल्यांत शिरला. मग एकएका घोड्याच्या पुठ्यावर थापटी मारून तो त्याचें वर्णन गिऱ्हाइकांना करून सांगत होता. एक घोडा थापटून तो म्हणाला, "बाबा, हा घोडा मी विकत घेतल्याला पुरते दहा दिवस देखील झाले नाहींत तों अल्लीखानानें इतक्यांत तो घेतला देखील. त्यानें मला त्याचे बद्दल विसाराचे पैसे देखील दिले. तीन दिवसांनीं मला बाकीचे पैसे देऊन तो घोडा घेऊन जाईल."

नंतर पुढच्या दोन घोड्यांचा निर्देश करून दयाळसिंग म्हणाला, "हे दोन घोडे अस्सल भिमथडी अवलादीचे आहेत. परंतु आज त्यांची किंमत मला अगदीं थोडी येईल म्हणून ते आज मी विकणार नाहीं. त्या घोड्यांचे पूर्वीचे मालक अगदीं गरीब होते. त्यामुळें त्यांना पोटभर खावयाला मिळालेलें नाहीं म्हणून त्यांची ताकद फार कमी झाली आहे. मी त्यांना महिना दोन महिने चांगल्या खुराकीवर ठेवीन म्हणजे ते पुन्हां ताकददार होतील आणि मला त्यांची पुष्कळ किंमत येईल.

नंतर बाकीच्या घोड्यांचा निर्देश करून दयाळसिंग म्हणाला, "बाबा, हे सगळे घोडे मिश्र अवलादीचे आहेत, ते दिसण्यांत लठ्ठ दिसतात तरी चालीला नादान आहेत. ते ओझीं वाहण्याच्या कामाचे किंवा म्हाताऱ्याकोताऱ्या माण-सांच्या स्वारीच्या कामाचे. तुम्हांला स्वारीकरतां घोडे पाहिजे आहेत कीं ओझ्याकरितां ?"

त्यावर महेश्वर म्हणाला, "आम्हांला स्वारीचे घोडे पाहिजे आहेत आणि ते अत्यंत जलद चालीचे असे पाहिजे आहेत. त्यांची जी तुम्ही किंमत सांगाल ती आम्ही देऊं."

दयाळसिंग म्हणाला, "तुम्हाला जसले घोडे पाहिजे आहेत तसलेही माझ्या-जवळ आहेत. पण ते आज तुम्हांला दाखवावयाला मजजवळ नाहींत. उद्यांपर्यंत

तुम्हांला थांबतां येईल काय ? ते दोन घोडे असे आहेत कीं, ज्याचें नांव तें ! मी ते दोन्ही घोडे स्वतां डोळयांनीं पाहिले आहेत, त्या दोहोंवर बसून मी रपेट केली आहे. ते दोघेही चालीला अत्यंत जलद आहेत. दिसण्यांत सुंदर आहेत आणि शुभलक्षणी आहेत. तेच घोडे तुम्ही घ्या."

त्यावर महेश्वर आणि धोंडीबा म्हणाले, "पण ते आहेत कोठें ?"

दयाळसिंग म्हणाला, "ते दोघे हल्लीं वाट चालून येत आहेत. ते उद्यां येथें येऊन पोंचतील, उद्यां दोन प्रहरांच्या आंत येतील. घोडे पण घोडे आहेत. तुम्ही खूष व्हाल."

महेश्वरानें विचारलें, "त्या दोन्ही घोड्यांचीं लक्षणें काय काय आहेत ?"

दयाळसिंग म्हणाला, "देवमणी, पंचकल्याणी, आणि जयमंगळी ह्या तीन शुभ लक्षणांपैकीं कोणचें तरी एक शुभलक्षण पुष्कळ घोड्यांचें असतें. दोन शुभलक्षणें ज्या घोड्यांना आहेत असे घोडे कमी असतात, परंतु तीन लक्षणें असणारे घोडे फारच थोडे असतात. मी तुम्हांला जे घोडे दाखविणार आहें, ते ह्या तिन्ही शुभ लक्षणांनीं संपन्न आहेत, आणि शिवाय ते दिसण्यांत अतिसुंदर आहेत. ते दोन्हीही पिवळया रंगाचे आहेत."

त्यावर धोंडीबा आनंदानें उद्गारला, "ओहो, ओहो !! ते घोडे येतात केव्हां आणि आम्हीं ते पाहातों केव्हां असें मला झालें आहे. ते उद्यां खास येतील ना ?"

दयाळसिंग म्हणाला, "होय, उद्यां ते येतीलच."

हें आश्वासन ऐकून धोंडीबाला आणि दादाला अतिशय आनंद झाला. धोंडीबाला आपली बायको आणि भाचा ह्यांची खुशाली पाहाण्यासाठीं विजापुरास जाण्याचीही भारी उत्कंठा लागली होती. त्याच क्षणीं मनाजोगा घोडा मिळता तर त्याच क्षणीं त्याची विजापुरास जाण्याची तयारी होती. पण घोड्यासाठीं एक दिवस वाट पाहिली पाहिजे हें मनांत आणून त्याची निराशा झाली. घोडा तर उत्तम पाहिजे आणि पुन्हां तो आतांच्या आतां मिळावा अशी त्याची इच्छा होती.

धोंडीबाच्या मनांत काय विचार चालले आहेत ते महेश्वर आणि दादा (म्हणजे बोवाजी) ह्यांनीं जाणले. तेव्हां दादा म्हणाला, "धोंडीबा, तुम्हाला आपल्या माणसांची खुशाली जाणावयाची उत्कंठा असली तरी ती उद्यांपर्यंत तुम्ही आवरून धरा. घोडा घेऊन घ्यावा तर तो उत्तम घ्यावा. सगळया गोष्टी एकदम आणि आपल्या मनाजोगया कधींच जुळून येत नाहींत."

महेश्वर म्हणाला, "धोंडीबा, माझेंही मत असेंच आहे. उद्यांपर्यंत तुम्ही धीर धरा. हे दयाळसिंग खात्री देत आहेत, कीं उद्यां दुपारपर्यंत त्यांचे दोन घोडे येथें येऊन पोंचतील आणि त्यांनीं त्या घोड्यांचीं जीं शुभ लक्षणें सांगितलीं, त्यावरून मला असें वाटतें कीं तेच घोडे घ्यावे. हे दयाळसिंग गिऱ्हाइकांना कधीं फसवीत नाहींत. अशुभलक्षणी घोडा ते कधीं गिऱ्हाइकाच्या गळयांत बांधीत नाहींत. ते घोड्याचें खरें वर्णन सांगतात आणि माफक किंमत घेतात. त्यांच्या शब्दावर भरंवसा ठेवून तुम्ही उद्यांपर्यंत धीर धरा."

तेव्हां धोंडीबा म्हणाला, " तुम्ही दोघेजण सांगतां तसेंच मी करतों. विजापुरास केव्हां जाईन असें मला झालें आहे. परंतु वाईट घोडा ह्याच क्षणीं विकत घेण्यापेक्षां एक दिवस धीर धरून उत्तम आणि शुभलक्षणी घोडा खरेदी करणें हेंच बरें."

तेव्हां दयाळसिंग म्हणाला, " मी ह्या येणाऱ्या दोन घोडयांचीं जीं वर्णनें केलीं आहेत तीं अगदीं खरीं आहेत. त्यांत कांहीं कमीपणा तुम्ही दाखवून दिला तर मी त्यांचा एक पैसाही घेणार नाहीं."

महेश्वर म्हणाला, " तुम्ही घोड्यांची खरीं वर्णनें करतां अशी तुमची ख्याति आहे. असो. आम्हांला तुमचे उद्यां येणारे दोन्ही घोडे पाहिजे आहेत बरें का! दुसऱ्या कोणाला देऊं नका."

" हा घ्या विसार," असें म्हणून दादानें दयाळसिंगाच्या हातावर कांहीं नाणीं ठेविलीं. अशा रीतीनें हा सौदा ठरल्यावर दयाळसिंगाची रजा घेऊन आमचे चार मित्र त्या तबेल्यांतून बाहेर पडले.

घराकडे परत येत असतां महेश्वरानें दादा आणि धोंडीबा ह्यांना त्या गांवांतील देवळें, विशिष्ट लोकांचीं घरें, शिकलगारांचीं दुकानें, तालिमी, वगैरे प्रेक्षणीय जागा दाखवून त्यांचीं वर्णनें तपशीलवारपणें केलीं. दादानें तालमींच्या संबंधानें विशेष खुलासेवार माहिती विचारून घेतली. नांदेड येथें एकंदर तालमी किती आहेत, त्यांत वस्ताद कोण आहेत, त्यांत रोज येणारे गडी किती किती आहेत, ते मुख्यत्वेंकरून कोणकोणत्या जातींचे आहेत, येणारे गडी साधारणतः कोणच्या वयाचे असतात, तालमींमध्यें कोणकोणचीं कामें विशेष आस्थेनें केलीं जातात, इत्यादि माहिती दादानें विचारली व ती महेश्वरानें सांगितली. तसेंच गांवामध्यें सार्वजनिक उत्सव कोणकोणचे आणि कितपत थाटानें केले जातात, ही माहिती दादानें महेश्वराला विचारून घेतली.

ह्या प्रकारचें भाषण करीत करीत ही मंडळी घरीं परत आली. घरांत आल्यावर दादा आणि धोंडीबा यांना महेश्वर म्हणाला, " गड्यांनो, आतां आपण मित्र झालेले आहों. तुम्ही दोघांनीं महाराष्ट्राची सेवा करण्याचा निश्चय केला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. देशसेवेची तुम्ही दीक्षा घेतली आहे, हें मंगल कार्य होय. लग्न, मुंज वगैरे सारखें मंगल कार्य कोणाच्या घरीं व्हावयाचें असलें, म्हणजे त्याचे मित्र त्याला गडगणेर करतात, तसा मी तुम्ही स्वीकारलेल्या मंगल कार्याच्या सफलतेप्रीत्यर्थ तुम्हाला आज माझ्या येथें जेवावयाला बोलावतों."

दादा आणि धोंडीबा यांनीं तें आमंत्रण आनंदानें स्वीकारलें हें सांगणें नलगे.

---

## प्रकरण १८ वें.

# विजापुरची मंडळी.

मंगळवारचा दिवस उजाडला. रात्रीं स्वस्थ झोंप लागलेली असल्याकारणानें दादा आणि धोंडीबा ह्यांना निजून उठतांच फार हुशारी वाटली. नंतर प्रातःकाळचे विधि आटोपल्यावर ते दोघेजण ओटीवर बसून गप्पागोष्टी करूं लागले. तों घरांतील दोन पुरुष महेश्वर आणि पुंडरीक असे दोघे तेथें येऊन बसले आणि त्यांच्या संभाषणांत मिळाले.

महेश्वर आणि पुंडरीक यांना नित्याप्रमाणें शेतावर जावयाचें होतें, परंतु घराच्या बाहेर पडावयाची वेळ अद्यापि झालेली नव्हती.

आपल्या मुलीची हल्लीं स्थिति कशी असेल, आपली बायको सुरक्षितपणें विजापुरास जाऊन पोंचली असेल किंवा नसेल, आपल्या मुलीला जसें जाफरनें पळविलें, तसें आपल्या बायकोलाही त्यानें किंवा त्याच्या जोडीदारांनीं पळवून नेलें असेल किंवा काय, गजाननाचें काय झालें असेल, इत्यादि अनेक विचार धोंडीबाच्या मनांत चाललेले होते, आणि आपण विजापुरास जाऊं केव्हां असें त्याला झालें होतें. ही मनांतील त्याची चिंता त्याच्या चेहऱ्यावर उमटलेली होती; आणि मनांतील चिंतेमुळें संभाषणांत तो फारसा रंगेलपणानें बोलूं शकत नव्हता. त्याची ही उदासीन वृत्ति त्याच्या मित्रांच्या लक्ष्यांत आली नव्हती असें नव्हे.

धोंडीबा दयाळसिंगाकडून येणाऱ्या घोड्यांच्या संबंधाची वर्दी यावयाची वाट पहात होता. कारण, घोडे येऊन पोंचतांच मी तुम्हांला वर्दी देईन असें दयाळसिंगानें आधल्या दिवशीं त्यांना वचन दिलें होतें.

दयाळसिंगाचे घोडे दुपारपर्यंत यावयाचे होते, आणि ते आल्याची वर्दी धोंडीबा सकाळपासून मनांत अपेक्षीत होता. मध्यान्हाला अद्याप पुष्कळच अवकाश होता; परंतु उत्कंठित मनाचे व्यापारच कांहीं विचित्र असतात !

असो. वर सांगितल्याप्रमाणें हीं चार माणसें ओटीवर गप्पा करीत बसलीं होतीं, तों अंगणांत घोड्यांच्या पाठीवरून जमिनीवर उड्या टाकणाऱ्या स्वारांच्या पायांचा आवाज आणि घोड्यांच्या पुठ्यांवर मारल्या जाणाऱ्या थापट्यांचा आवाज त्यांच्या कानीं पडला. तेव्हां हा आवाज कसला आहे, कोण माणसें आलीं आहेत, हें पाहाण्यासाठीं धोंडीबा सगळयांच्या आधीं उठून अंगणांत आला, आणि पाहातो तों ह्या मंडळींत त्याला त्याचा भाचा गजानन दिसला, आणि सासऱ्याच्या बहिणीचा जांवई काशीरामही त्याला दिसला ! त्या दोघांच्याच शेजारीं एक सुमारें अठरा वीस वर्षांचा सुंदर आणि नाजूक मुलगा दिसला. ह्या तीन माणसांखेरीज आणखी तीन इसम त्यांच्या गरीबाऊ पोशाखांवरून मोतद्दार असल्याप्रमाणें दिसणारे त्याला दिसले !

धोंडीबानें हीं सहा माणसें एका दृष्टिनिक्षेपांत पाहून टाकलीं. मग तो गजाननाला उत्कंठेनें म्हणाला, " अरे गजानन, तुझी मामी विजापुरास सुरक्षितपणें पोंचली काय ? "

गजाननानें उत्तर दिलें, "मामी विजापुरास सुरक्षितपणें पोंचल्या. त्या आपल्या वडिलांच्या घरीं खुशाल आहेत....पण...पण..."

" पण अरुंधतीला " धोंडीबानें त्याचें वाक्य पुरतावलें. " जाफरनें केंजळगडावर नेलें, असेंच कीं नाहीं गजानन ? "

त्यावर गजानन म्हणाला, " अरुंधतीचें संरक्षण मला करतां आलें नाहीं ह्याबद्दल मला लाज वाटते. अरुंधती आमच्या हातून गमावली. परंतु तिला जाफरनें पळविलें किंवा दुसऱ्या कोणी पळविलें, हें मला ठाऊक नाहीं. तसेंच तिला केंजळगडावर नेण्यांत आलें कीं दुसऱ्या कोठें नेण्यांत आलें हें मला ठाऊक नाहीं. पण जाफरनेंच तिला पळविलें आणि तिला केंजळगडावर नेलें, हें तुम्हाला कसें कळलें आणि तुम्ही येथें कसे ? "

त्यावर धोंडीबा म्हणाला, " तुम्ही सगळे अगोदर अंगणांतून ओटीवर चला. तेथें आपण बोलूं. "

आलेल्या सहा स्वारांपैकीं मोतद्दारांप्रमाणें दिसणाऱ्या तीन गड्यांनीं आपल्या तीन यजमानांचे घोडे आपल्या ताब्यांत घेतले. त्यांना महेश्वरानें मागच्या

बाजूस असलेल्या तबेल्याची वाट दाखविली आणि म्हटलें, "तिकडे हे घोडे न्या, तेथें तुम्हाला सगळ्या सोयी दिसतील."

तीन मोतद्दार सहा घोडे घेऊन तबेल्याकडे रवाना होतांच गजानन, काशीराम, आणि तो सुंदर आणि नाजूक मुलगा मुरारी, असे तिघे जण अंगणांतून ओटीवर आले. त्यांच्याबरोबर किंवा पाठोपाठ धोंडीबा, दादा, महेश्वर आणि पुंडरीक, अशीं चार माणसें ओटीवर आलीं.

येथें आल्यावर तीन पाहुण्यांनीं आपल्या अंगावरील हत्यारें, प्रवासी कपडे, वगैरे काढून खुंट्यांवर ठेविलीं. नंतर हीं बाहेरचीं तीन माणसें आणि घरांतील चार माणसें, अशीं सात माणसें ओटीवर गप्पागोष्टी करण्यासाठीं सुखासीन झाल्यावर धोंडीबा म्हणाला, "गजानन, तुला आणि तुझ्या मामीला कांहीं उपद्रव न करतां जाफर अरुंधतीला कसा उचलून पळाला, तुम्ही तेव्हां कोठें होतां वगैरे सर्व हकीगत तपशीलवारपणें मला सांग."

गजानन म्हणाला, "शनिवारीं रात्रींच्या मुक्कामाला आम्ही याच महेश्वरांच्या घरीं होतों. आदित्यवारीं सकाळीं आम्ही येथून विजापुराकडे जावयाला निघालों. वाटेंत पुढें जंगल आहे, त्यांत चोरट्यांचा उपद्रव आहे, म्हणून आम्हांला सोबत म्हणून हा शूर नाना सागरपर्यंत आमच्या बरोबर आला होता. जंगलांत आमच्यावर जाफरानें हल्ला केला. परंतु आम्ही त्याचा आणि त्याच्या चांडाळ साथीदारांचा पराभव करून आणि त्यांना माफी मागावयाला लावून पुढें गेलों. सागर पुढें एके ठिकाणीं वाट भारी खराब आहे. ती दगडाळ असून एक स्थळ तर असें आहे कीं तेथून एका वेळीं एकाच घोड्याला जातां येतें. हें स्थळ ओलांडीत असतां आमच्या मागून दौडत येणाऱ्या घोडेस्वारांच्या टापांचा आवाज आमच्या कानीं आला. आम्ही वेगानें चाललों होतों. ह्या वेळीं दुर्दैवानें असें झालें कीं मामींचा घोडा सर्वांच्या पुढें होता. त्यांच्या मागें माझा घोडा होता आणि अरुंधतीचा घोडा सर्वांच्या मागें होता. आम्ही दोघेजण पुढें निसटून गेलों. अरुंधतीही आमच्या मागून येत आहे, अशा समजुतीनें आम्ही दोघेजण परम वेगानें आपले घोडे पुढें धावडवीत होतों. अशा रीतीनें कांहीं मजल गेल्यावर मागून घोड्यांच्या टापांचा आवाज मला ऐकूं येत नव्हता. मी मागें वळून पाहिलें तों अरुंधती कोठें दिसली नाहीं, आणि आमचा पाठलाग करणारे स्वारही दिसले नाहींत. तेव्हां आम्ही अरुंधतीच्या शोधासाठीं मागें परतलों. आम्ही त्या अड-

चणीच्या स्थळीं येतों तों आम्हाला अरुंधतीचा घोडा मात्र निश्चल असा असलेला दिसला! अरुंधती कोठेंही दिसली नाहीं."

धोंडीबा म्हणाला, "माझा असा तर्क आहे कीं त्या अडचणीच्या स्थळांतून अरुंधती जात असतां तिचा घोडा ठेंचळला असेल, तिचा तोल जाऊन ती पडली असेल, आणि ती पुन्हां घोड्यावर बसते तोंच पाठलाग करणारे लोक तेथें येऊन पोंचले असतील. त्यांनीं तिला एका घोड्यावर बांधली असेल आणि तिचा घोडा तेथेंच टाकून ते तिला घेऊन मागच्या पावलीं परतले असतील. कारण, जाफरच्या घोड्यावर अरुंधतीला कालच मी पाहिलें. त्याच्या मागून दोन घोडेस्वारही होते. अरुंधतीनें मला ओळखिलें, मीही तिला ओळखिलें. तिनें मला हांका मारल्या. मला सोडवा मला सोडवा, म्हणून ती ओरडली. परंतु मी हतभाग्य कीं मी ती पळवून नेली जात असतां तिचा बचाव करूं शकलों नाहीं! मी त्या वेळीं अगदीं दुर्बल होतों. मी पायीं होतों, मी एकटा होतों. मजजवळ कांहीं हत्यार नव्हतें. मी अनवाणी होतों. त्या दौडत जाणाऱ्या घोड्यांच्या मागें मी पायानें किती दवडत जाणार? अरुंधतीला घेऊन जाफर जो पळाला, तो हां हां म्हणतां माझ्या नजरेच्या टप्प्याच्या बाहेर गेला. पण गजानन, अरुंधती तेथें नाहीं असें पाहातांच तुम्ही दोघांनीं काय केलें?"

गजाननानें उत्तर दिलें, "अरुंधती नाहींशी झाली असें पाहातांच मामी मट्टकिन खालीं बसल्या आणि रडूं लागल्या. माझी पोर गेली, नबाब आतां तिला जनानखान्यांत घालील, तिला बाटवील, तिच्यावर बलात्कार करील, तिला भ्रष्ट करील, असें म्हणूं लागल्या. मी त्यांची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यांचा शोक थांबेना. त्यांच्याबरोबर मलाही रडूं कोसळलें. पण मी लवकरच मनावर नियंत्रणा घालून त्यांची समजूत घालूं लागलों. मी त्यांना म्हटलें, 'मामी, येथें आपण रानावनांत पडलेलों आहों, आपल्याजवळ मानवी वस्ती नाहीं, येथें आपण कितीही वेळ बसलों तरी काय उपयोग? आपण विजापुरास जाऊं. तेथें तुमचे वयोवृद्ध वडील यांना झालेली हकीगत सांगूं. मग ते जें काय सांगतील तें करूं.' हें माझें म्हणणें त्यांना पटलें. मग आम्ही दोघें तेथून उठून विजापुरास आलों. परंतु त्या अडचणीच्या जागेपर्यंत आम्ही जशा वेगानें प्रवास केला तशा वेगानें पुढचा प्रवास आम्हाला करतां येईना. दुःखामुळें आम्हां दोघांचीं गात्रें निर्वीर्य होऊन गेलीं होतीं. सारांश काय, तर आम्ही दोघें कशीं तरी एकदां विजापुरास जाऊन पोंचलों. त्यानंतरची हकीकत मी तुम्हांला मागाहून

सांगेन. पण अगोदर तुम्हीं केंजळगडाहून येथें कां आणि कसे आलां तें मला सांगा."

तेव्हां धोंडीबानें आपली हकीगत तपशीलवारपणें सांगण्याला सुरवात केली. शुक्रवारीं रात्रीं अरुंधतीला पकडून न्यावयाला जाफर आला पण ती त्याला न मिळाल्याकारणानें तो हात हालवीत परत गेला. मग नबाबाच्या हुकमावरून धोंडीबाला कैद करण्यांत आलें. तेथून तो पळाला, आणि विजापुरची वाट धरून चालूं लागला. पुढें त्याला दादा किंवा गोसावी भेटला. मग ते दोघेजण नांदेडला आले आणि कर्मधर्मसंयोगानें ते महेश्वराच्या घरीं मुक्कामाला उतरले, ही हकीगत धोंडीबानें सांगितली ती वाचकांना ठाऊकच आहे. मग महेश्वरांच्या घरीं आल्यावर पुढें काय काय झालें हेंही धोंडीबानें तपशीलवारपणें गजाननाला सांगितलें. मधून मधून महेश्वर आणि दादा हेही त्याच्या निवेदनांत भाग घेत होते. हें सर्व सांगणें झाल्यावर धोंडीबा म्हणाला, " आजच दुपारीं मी येथून विजापुरास तुमच्या शोधासाठीं येणार होतों, इतक्यांत तूंच येथें आलास आणि मला भेटून सर्व हकीगत मला सांगितलीस. बरें, हा काशीराव इकडे कशाला आला आहे आणि हा सुंदर, नाजूक, आणि तरतरीत मुलगा कोण ? त्याची आणि तुझी गांठ कोठें आणि कशी पडली आणि तो तुझ्याबरोबर कशाला आलेला आहे तें आम्हांला सांग."

यावर गजानन कांहीं उत्तर देणार, तोंच दयाळसिंगाचे यात्रयाचे होते ते घोडे आलेले आहेत अशी वर्दी द्यावयाला एक मनुष्य तेथें आला.

जी वर्दी यावयाची सकाळपासून धोंडीबा मोठ्या उत्कंठेनें वाट पहात बसला होता, ती वर्दी आली. परंतु गजाननच विजापुराहून आला असल्याकारणानें त्याला तिकडची सर्व हकीगत कळून आतां विजापुरास जाण्याचें कारणच राहिलें नव्हतें. तथापि त्याला घोडा पाहिजेच होता, आणि दादालाही एक घोडा पाहिजे होता. तेव्हां महेश्वरानें त्या वर्दी आणणाऱ्या इसमाला " आम्ही दुपारचीं जेवणें झाल्याबरोबर घोडे पाहावयाला येतों," असें उत्तर देऊन त्याला रुख्सत दिली.

महेश्वर आणि पुंडरीक हे दोघेजण शेतावर जाणार होते परंतु पाहुणे आल्याकारणानें त्यांचा तो बेत रहित झाला.

तसेंच दुपारच्या जेवणाला अद्याप बराचसा अवकाश असल्याकारणानें ओटीवरच्या मंडळींनीं आपलें संभाषण चालू ठेवलें. तें संभाषण आम्ही वाचकांना पुढच्या प्रकरणांत देऊं.

---

## प्रकरण १९ वें.

# पुंडरीकाचे मित्र.

दयाळसिंगाकडून आलेला इसम तेथून निघून गेल्यावर ओटीवरचे पुरुष पुन्हां सुखासीन आणि सावधान झाल्यावर गजानन म्हणाला, " ज्या गांवचे हे काशीराव त्याच गांवचा म्हणजे सरवलीचा राहाणारा हा मुरारी आहे. तो दिसण्यांत जरी नाजूक असला आणि वयानें जरी तो लहान असला, तरी तो शूर, प्रसंगावधानी आणि पराक्रमी आहे. "

हें मुरारीच्यासंबंधानें प्रास्ताविक भाषण ऐकून सर्व माणसांना त्याच्याविषयीं भारी कौतुक वाटलें. गजानन पुढें काय बोलणार तें ऐकण्याविषयीं सर्व लोक उत्कंठित झाले. आपल्याच वयाच्या एका मुलाची ही स्तुति ऐकून पुंडरीकाला विशेष आनंद वाटला.

गजानन म्हणाला, " सुमारें दोन अडीच महिन्यांमागें,—किंवा काळासंबंधानें शिकस्तीनें बोलावयाचें तर कार्तिक वद्य अमावास्येच्या दिवशीं ह्या मुलाच्या घरावर दहा पंधरा मुसलमानांचा दरवडा आला. त्यांनीं मुरारीच्या आईबापांना हाणमार केली आणि घरांत जें कांहीं होतें तें लुटून नेलें. त्या वेळीं मुरारी वाढोणास आपल्या मावशीकडे गेलेला होता. त्याच्या पाठीमागें हा प्रकार झाला. मुरारी जों घरीं येतो, तों त्याला आईबाप मरणोन्मुख स्थितींत असलेले दिसले. त्याच्या आईबापांनीं त्याला आशीर्वाद देऊन प्राण सोडला.

मुरारी अशा रीतीनें निराधार झाला तेव्हां त्याला पोटाचा कांहीं तरी उद्योग करणें जरूर झालें. तेव्हां ह्या काशीरावांचे वडील आणि ह्या मुरारीच्या बापाचे स्नेही कुशाबा ह्यांनीं त्याला विजापुरास जाऊन तेथें मुसलमान रियासतींतील नोकरी कितपत सुखावह होईल हें पाहून यावयाला सांगितलें. त्या उपदेशाप्रमाणें मुरारी विजापुराकडे जावयाला निघाला. वाटेमध्यें त्याला दोन हिंदू मुली भोपाळगडाच्या खानानें पळवून नेल्याची खबर लागली. तेव्हां त्या मुलींना सोडविण्याची खटपट करावी म्हणून मुरारीनें विजापुरच्या पादशहाची मुलाखत घेऊन मुलींना सोडून द्यावें अशा अर्थाचें त्याचें खानाला आज्ञापत्र मिळविलें. हें पत्र भोपाळगडच्या खानाला द्यावयाच्या अगोदर मुरारीनें शिवाजीची भेट घेतली."

" कोण शिवाजी ? " असें एकदम सर्वांनीं गजाननाला विचारलें.

तेव्हां गजानन म्हणाला, "कोण शिवाजी म्हणजे ? हिंदुस्तानांत हिंदूंचें राज्य असल्याशिवाय हिंदूंचा धर्म, हिंदूंचें चातुर्वर्ण्य, आणि हिंदूंची संस्कृति शाबूद राहाणार नाहीं असें मनांत आणून तीं तिन्ही शाबूद ठेवण्यासाठीं हिंदूंचें राज्य स्थापावयाची जो शिवाजी खटपट करीत आहे, तोच शिवाजी."

महेश्वर म्हणाला, "तर मग शिवाजी हा खरा पुरुष आहे !"

दादा म्हणाला, "महाराष्ट्रांत मी पाय ठेवल्यापासून असें ऐकतों आहें कीं स्वराज्य स्थापावयाला कोणी एका शिवाजी ह्या नांवाच्या मुलानें चंग बांधला आहे. ही बातमी एकूण खरी आहे तर ?"

धोंडीबा म्हणाला, "आमच्या केंजळगडावर शिवाजीचें नांव आम्ही ऐकलें होतें. पण कोणी असेंही म्हणत कीं ही केवळ गप्प आहे."

ह्यावर मुरारी म्हणाला, "हा शिवाजी खरा पुरुष आहे. तो माझ्याच वयाचा आहे. तो तुमच्या माझ्यासारखाच हाडामांसाचा मनुष्य आहे. त्या शिवाजीला मी पाहिलें आहे. त्या शिवाजीशीं मी बोललों आहें. त्या शिवाजीशीं मी सहकार्य केलें आहे. त्या शिवाजीचीं कामें मी अंगावर घेऊन पार पाडलेलीं आहेत. त्या शिवाजीचा मी अनुयायी झालों आहें, आणि ही गोष्ट मला वडिलां-प्रमाणें पूज्य असलेल्या कुशाबांना कळवून त्यांची संमति आणि आशीर्वाद मिळवि-ण्यासाठीं मी सरवलीस गेलों होतों, आणि कुशाबांचा निरोप त्यांचे हे चिरंजीव काशीराव दादा ह्यांना सांगण्यासाठीं मी विजापुरास गेलों होतों.

धोंडीबा म्हणाला, "तर मग मीही त्या शिवाजीचा अनुयायी होणार !"

पुंडरीक म्हणाला, "बाबांनीं मला परवानगी दिली तर मीही शिवाजीचा अनु-यायी होईन."

महेश्वर म्हणाला, "नाना, तूं हो शिवाजीचा अनुयायी, माझा तुला आशीर्वाद आहे."

दादा म्हणाला, "मीही शिवाजीच्या कार्याला हातभार लावणार ! पण मुरारी, त्या पाटलाच्या मुलींचें काय झालें ? तूं शिवाजीकडे जाऊन त्याची मदत मागि-तलीस काय ?"

मुरारी म्हणाला, "होय. शिवाजीनें हें काम अंगावर घेतलें. तानाजी मालुसरे, एसाजी कंक, बाजी फसलकर, वगैरे त्याच्याच वयाचे त्याचे मित्र त्याला पाठ-बळ देणारे होतेच. शिवाजीला इतर पुष्कळ देशभक्त मदत करावयाला सिद्ध झाले. मीही त्या मंडळींत होतों. मग शिवाजीनें एक हिकमत योजली. ती हिक-

मत पार पाडण्याच्या कामाचा कांहीं भाग माझ्याकडे होता. तो मी यथाशक्ति पार पाडला. थोडक्यांत सांगावयाचें तर असें कीं शिवाजीनें भोपाळगड घेतला, तेथील मुसलमानी अमलाचा अंत केला, आणि तेथें मऱ्हाठ्यांची रियासत सुरू केली. आज भोपाळगडावर मऱ्हाठ्यांचें श्रीगजाननाचें निशाण फडकत आहे आणि आज त्या भोपाळगडाचा गडकरी सोनाजी बिन निळोबा समर्थ ह्या नांवाचा हिंदू वीर पुरुष आहे. खुद्द भोपाळगड आणि भोपाळगडाच्या मुलखांत मोडणारा सर्व प्रदेश मऱ्हाठ्यांच्या रियासतीचीं सर्व सुखें अनुभवीत आहे."

धोंडीबा म्हणाला, "काशीराव, तुमची आणि ह्या मुरारीची गांठ विजापुरास पडली काय?"

काशीराव म्हणाला, "माझ्या वडिलांचा निरोप मला सांगावयासाठीं मुरारी माझ्याकडे आला. मी शिवाजीचा अनुयायी झालों आहें, कुशाबांनीं मला आशीर्वाद दिला आहे, तुम्ही शिवाजीचे अनुयायी व्हावयाची इच्छा करीत असल्यास तुमच्या वडिलांची तुम्हांला अनुमति आहे असें मुरारी मला म्हणाला. मलाही मुरारीप्रमाणें शिवाजीचा अनुयायी व्हावें असें वाटलें. माझ्या वडिलांची मला परवानगी होतीच. माझे मेहुणे आणि ह्या धोंडीबांचे सासरे धुंडिराज हे वयोवृद्ध असून माझें कल्याण चिंतिणारे म्हणून त्यांची परवानगी घ्यावयाला मी त्यांच्या घरीं गेलों. मुरारीही माझ्याबरोबर होता. तेथें हे गजाननराव आम्हांला भेटले. त्यांची हकीगत आम्हांला कळली आणि आमची हकीगत त्यांना कळली, आणि आम्हां सर्वांच्या विचारानें असें ठरलें कीं अरुंधतीला सोडविण्यासंबंधाची सर्व जबाबदारी आबांवर–म्हणजे शिवाजीवर–टाकावी आणि ते सांगतील तसें करावें. म्हणून धुंडिराजांच्या प्रोत्साहनावरून आम्ही तिघेजण शिवाजीकडे निघालों आहों."

पुढें गजानन म्हणाला, "ह्या महेश्वररावांनीं नांदेडवरून तुम्ही गेलां आलां तर मला अवश्य भेटा असें सांगितलेलें होतें म्हणून आम्ही येथें उतरलों. येथें तुम्हीही मला भेटलां आणि केंजळगडाकडचीही हकीगत आम्हांला कळली. मला वाटतें कीं आबा कांहीं तरी हिकमत करून अरुंधतीला नबाबाच्या तावडींतून सोडवितील."

धोंडीबा म्हणाला, "गजानन, तुला जें वाटत आहे तसेंच होवो!"

दादा म्हणाला, "मी आणि धोंडीबा शिवाजीचा माग काढावयाला जाणार होतोंच. आतां आपण सगळेच बरोबर निघूं."

तेव्हां पुंडरीक महेश्वराला म्हणाला, "बाबा, मी जाऊं का ह्या मंडळीबरोबर?"

महेश्वरानें उत्तर दिलें, "हा मुरारी तुझ्याच वयाचा आहे. त्यानें जें व्रत स्वीकारलें आहे तेंच तूंही स्वीकार. तुला देवाच्या कृपेनें यश येईल."

येणेंप्रमाणें संभाषणें चाललीं असतां मध्यान्हाचा समय प्राप्त झाला. तेव्हां सर्व जण जेवावयाला गेले. जेवणें झाल्यानंतर तांबूलभक्षणादि कामें आटोपल्यावर दादा, धोंडीबा, गजानन, महेश्वर आणि काशीराम, असे पांच जण दयाळसिंगाचे घोडे पहावयाला निघाले. पुंडरीकानें मुरारीला आपल्या मित्रमंडळींना भेटवावयाला घेऊन जाण्याची परवानगी महेश्वराला विचारली व ती त्यानें दिली.

दयाळसिंगाच्या तबेल्यांत जीं माणसें गेलीं होतीं त्यांपैकीं प्रत्येकानें त्या दिवशीं आलेल्या घोड्यांची तपासणी केली. ते दोन्ही घोडे शुभचिह्नांकित होते. त्या दोहोंच्या रोमांची दिशा डोक्याकडे असून एक पंचकल्याणी होता आणि दुसरा मेखलामुखी होता. ह्या दोन्ही घोड्यांवरून प्रत्येकानें फेरफटका करून पाहिला. सर्वांना ते घोडे पसंत पडले. मग त्या घोड्यांची किंमत चुकती करून हे पुरुष परत फिरणार, तों दयाळसिंगानें आणखी एक विकाऊ घोडा त्यांना दाखविला आणि म्हटलें, "हाही घोडा शुभलक्षणी आहे. त्याच्या मालकानें गरीबीमुळें हा घोडा विकावयाला काढलेला आहे. तो फारच स्वस्त्यांत तुम्हाला मिळू शकेल. तो कुशावर्ती आणि अष्टमंगळ्या आहे. त्याचें वय आठ वर्षांचें असावें असें मला वाटतें. तो पाहून ठेवा."

याप्रमाणें दयाळसिंगानें वर्णिलेला घोडा विकत घ्यावा असें महेश्वराला वाटून तो म्हणाला, "आज मला आणि नानाला अशा दोघांना एकच घोडा आहे. मला गरज लागली म्हणजे मी त्याचेवर बसतों; त्याला कोठें जावयाचें असलें म्हणजे तो बसतो. मी हा घोडा विकत घेतों, म्हणजे मला एक घोडा होईल आणि त्याला एक घोडा होईल. आतां उद्यां तो तुमच्या मंडळीबरोबर गेला म्हणजे मला स्वतांला घोडाच नाहीं असें होईल, आणि मला कोठें परगांवाला जावयाचें झालें तर अडचण होईल. लोकांचा घोडा मागून तरी आणावा लागेल किंवा भाड्यानें तरी घ्यावा लागेल. म्हणून मी हा घोडा घेतों, दयाळसिंग."

असें बोलून त्यानें त्या घोड्याच्या वयाचें आणि चिन्हांचें निरीक्षण केलें. त्याच्या चार मित्रांनीं देखील त्या घोड्याचें निरीक्षण केलें. प्रत्येक जण त्याच्या पाठीवर पाळीपाळीनें आरूढ झाला. सर्वांच्या मतानें तो चालीला उत्तम ठरला. मग त्याचीही किंमत चुकती करून ते पांच जण तबेल्यांतून बाहेर पडून घरीं आले.

त्यांच्या पाठोपाठ दयाळसिंगाच्या नोकरांनीं त्यांच्या घरीं खरेदी केलेले घोडे आणून सोडले.

पुंडरीकानें मुरारीला आपला मित्र सदाशिव याच्या घरीं नेलें. तेथें त्यानें आपले मित्र गोपीनाथ आणि मल्हारी ह्यांना बोलावून आणविलें. मग हे दोन मुलगे तेथें येऊन हजर होतांच पुंडरीकानें त्यांच्याशीं मुरारीची ओळख करून दिली. मग तो मुरारीला म्हणाला, " मुरारी, तुझी सर्व हकीगत आम्हाला सांग. तूं कुठला राहाणारा, तुझ्या नात्याचीं कोण कोण माणसें आहेत, तुझी आणि शिवाजीची गांठ कोठें, कशी आणि केव्हां पडली, शिवाजी दिसतो कसा, त्याचे मित्र कोण कोण आहेत, तूं शिवाजीचीं कोण कोणतीं कामें केलींस, मी त्याचा अनुयायी होण्याची इच्छा केली तर तो मला स्वीकारील काय, ह्या सदाशिवाला आणि गोपीनाथाला आणि मल्हारीला तो आपल्या अनुयायांत सामील करून घेईल काय ?"

हा कंठाळी प्रश्न ऐकून मुरारीनें प्रत्येक प्रश्नाला तपशीलवारपणें उत्तर दिलें. अर्थात् हें उत्तर व्याख्यानाच्या रूपाचें नव्हतें, तर उलट पक्षीं संभाषणाच्या रूपाचें होतें. म्हणजे असें कीं मुरारी कांहीं माहिती सांगत असतां मध्येंच त्याला पुंडरीक किंवा सदाशिव किंवा गोपीनाथ किंवा मल्हारी कांहींतरी खुलासा विचारीत असे व मध्यें दुसराच कांहीं विषय निघे. सारांश, मुरारीनें सर्व माहिती क्रमबद्ध नव्हे तरी सर्वांगीण अशी आपल्या नवीन चार मित्रांना दिली. ही माहिती ऐकून ह्या चार मित्रांना वाटलें कीं मुरारीप्रमाणें आपणही शिवाजीच्या अनुयायी वर्गांत शिरावें.

येणेंप्रमाणें ह्या मुलांचीं संभाषणें चाललेलीं असतां पेरू, मक्याचीं कणसें, शेंगा, काकड्या, वगैरे खाद्यांचा फन्ना उडत होता.

ह्या मुलांची दोस्ती जरी आजच सुरू झाली होती, तरी त्यांच्यामध्यें जुन्या दोस्तांप्रमाणें प्रेमभाव उत्पन्न झाला.

हीं मुलें संध्याकाळीं आपापल्या घरीं जावयाला निघालीं, तेव्हां तीं मुरारीला म्हणालीं, "मुरारी, आम्ही आपल्या वडील माणसांची परवानगी विचारून तुझ्याबरोबर उद्यां शिवाजीच्या दर्शनार्थ येऊं."

प्रकरण २० वें.

# नांदेडपासून भोपाळगडापर्यंत.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे मंगळवारीं सकाळीं अरुणोदय होतो न होतो आहे तोंच नांदेड गांवच्या वेशींतून अठरा घोडेस्वार बाहेर पडले, आणि ते साधारणतः उत्तरेच्या रोखानें निघाले.

ह्या घोडेस्वारांपैकीं धोंडीबा आणि दादा हेच काय ते बरेचसे वयस्क होते. काशीराव आणि गजानन हे दोघे तिशीच्या आंत बाहेर होते. बाकीचे चवदा इसम अठरापासून वीस वर्षांच्या वयाचे होते. मुरारी, पुंडरीक आणि त्याचे मित्र सदाशिव, गोपीनाथ आणि मल्हारी, असे एकंदर पांच मुलगे ह्या स्वारांच्या टोळींत होते. ह्या मुख्य नऊ स्वारांच्या आणि त्यांच्या घोड्यांच्या चाकरीसाठीं नऊ मोतद्दार मुलगे ह्या टोळीमध्यें होते.

ह्या अठरा असामींपैकीं दादा, गजानन आणि धोंडीबा हे स्वतंत्र होते आणि ते स्वतांच्याच इच्छेनें शिवाजीकडे निघाले होते. काशीरामाला त्याच्या वडिलांची आणि मेहुण्याची संमति मिळालेली होती. मुरारी हा अगोदरच शिवाजीचा अनुयायी झालेला होता, आणि बाकीच्या मुलांना त्यांच्या त्यांच्या वडील माणसांनीं शिवाजीच्या दर्शनाला जाण्याला परवानगी दिलेली होती. मोतद्दार मुलगे गरीब असल्याकारणानें त्यांच्या त्यांच्या यजमानांनीं त्यांना कपडे आणि हत्यारें दिलीं होतीं, आणि घोडे दिले होते ते केवळ ह्या स्वारीमध्यें बसावयासाठीं दिले होते.

या अठरा गड्यांनीं अंगावर जे कपडे घातले होते ते जसे प्रवासाच्या तसेच लढाईच्याही कामाला सोईस्कर होते. प्रत्येकाच्या पायांत एक तंग आणि लांडा मांडचोळणा होता. अंगांत कुडत्यावर लांडा आणि तंग अंगरखा होता, आणि डोक्याला फेटा होता. तसेंच प्रत्येकाजवळ एक एक तोस्तदान जरूर त्या पदार्थांनीं भरलेलें होतें.

प्रत्येकाच्या कमरेला एक तरवार होती, पाठीला धनुष्य आणि भाता असून एक एक पल्लेदार भाला खोगीराला तिरकस बांधलेला होता.

ह्या अठरा असामींपैकीं प्रत्येक असामी त्या काळच्या रिवाजाप्रमाणें तालमीच्या कामांत आणि हत्यारें वापरण्याच्या कामांत तरबेज होता.

ह्या अठरा गड्यांचें याप्रमाणें सामान्य वर्णन करून आतां आम्ही आपली हकीगत पुढें चालवितों.

नांदेड गांवांतून हे गडी बाहेर पडल्यावर कांहीं अंतर ते साध्या चालीनें गेले. परंतु लवकरच त्यांनीं आपापल्या घोड्यांना टाचळून त्यांना भरधांव फेंकलें. तो प्रातःकाळचा थंड वेळ असल्या कारणानें माणसें आणि त्यांचीं जनावरें ताज्या दमाचीं होतीं, आणि प्रहर दिवस येई तोंपर्यंत त्यांनीं पंधरा सोळा कोशांची मजल मारली. यानंतर त्यांनीं आपला वेग कमी केला, आणि मधून मधून जवळच्या सोबत्याजवळ किरकोळ संभाषणें सुरू केलीं. कोणी शिवाजीबद्दल, कोणी दुपारच्या मुक्कामाबद्दल, कोणी रस्त्याच्या चांगलेपणाबद्दल किंवा वाईटपणाबद्दल, कोणी सभोंवतालच्या वनश्रीबद्दल, आपले विचार प्रकट करीत होते.

अशा रीतीनें कांहीं काळ मार्गक्रमण झालें तेव्हां पुन्हां सर्वांच्या विचारें जलदीनें मार्गक्रमण करावें असें ठरून सर्वांनीं आपापल्या घोड्यांना टाचळून परम वेगानें घोडे काढले. सर्व स्वार त्या काळच्या रिवाजाप्रमाणें घोड्यावर बसण्यांत पटाईत होते. त्यामुळें कोणाला कांहीं अपघात न होतां मध्यान्हाच्या समयाला ते आणखी दहा बारा कोश जमीन तुडवून गेले.

मध्यान्हाच्या सुमारास ते रस्त्यापासून थोड्याशा अंतरावर असलेल्या एका विस्तीर्ण वटवृक्षाच्या छायेखालीं उतरले. तेथें जवळच एक स्वच्छ पाण्याचा ओढा झुळझुळ वाहात होता.

ह्या वटवृक्षाखालीं तळ देऊन आमच्या अठरा प्रवासी माणसांनीं घोड्यांच्या खाण्यापिण्याची तजवीज अगोदर केली. नंतर त्यांनीं बरोबर आणलेल्या भाकऱ्या, कांदे, चटण्या, वगैरेंवर आपल्या क्षुधेचें शमन करून ओढयाच्या पाण्यानें तृषेचें शमन केलें. मग दिवस कलता होई तोंपर्यंत ते तेथें आरामासाठीं पडले.

अशा रीतीनें माणसें आणि जनावरें यांना विश्रांति मिळाल्यावर त्यांनीं पुन्हां आपला प्रवास पुढें चालविला, परंतु फार वेगानें मार्ग क्रमण्याचें कारण नाहीं असें सर्वांनुमतें ठरल्यावरून घोडे साध्या चालीनेंच चालविण्यांत येत होते. तेणेंकरून ह्या प्रवासी माणसांना जवळच्या आपल्या दोस्ताबरोबर संभाषण करण्याला अवसर सांपडूं लागला.

संभाषण करण्याचे प्रसंगीं समान वयाच्या आणि समान दर्जाच्या माणसांचें जमतें असा नियम समाजांत दृष्टीस पडतो. ह्या नियमाला अनुसरून दादा, धोंडीबा, गजानन आणि काशीराम ह्यांची एक जूट झाली. पांच समवयस्क मुलगे ह्यांची

एक जूट झाली आणि नऊ मोतद्दार मुलगे ह्यांची तिसरी जूट झाली. संभाषणाच्या ओघानें ह्या तीन जुटी एकमेकींपासून फुटल्या. पहिली टोळी आणि दुसरी ह्यांच्यांत दोन तीन हांकांचें अंतर पडलें. पांच बालवीरांच्या तुकडीच्या मागें नऊ मोतद्दार मुलांची तुकडी चार पांच हांकांच्या अंतरावरून चालत होती.

अशा रीतीनें कांहीं वेळ मार्गक्रमण झालें तों पुढच्या तुकडीला समोरून येत असलेले पांच घोडेस्वार दिसले. ते सगळे मुसलमान होते. हे मुसलमान दृष्टीस पडतांच आमच्या चार मराठे गड्यांचें संभाषण बंद पडलें. प्रत्येक मराठा प्रत्येक मुसलमानाच्या चेहेऱ्याचें निरीक्षण करूं लागला, तसा प्रत्येक मुसलमान प्रत्येक मराठे गड्याच्या चेहेऱ्याचें निरीक्षण करूं लागला.

ह्या दोन तुकड्यांच्या मधील अंतर जों जों कमी होऊं लागलें, तों तों प्रत्येक इसमानें प्रतिपक्षाच्या प्रत्येक इसमाचें निरीक्षण करून टाकलें. तेव्हां एक मुसलमान आपल्या जोडीदाराला म्हणाला, " हमीदसाहेब, तो समोरच्या टोळींत पिवळया फेट्याचा इसम जो दिसत आहे तो आपल्या केंजळगडावरचा धोंडीबा आहे असें मला वाटतें. तुम्हाला काय वाटतें ? "

परंतु हमीद ह्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाच्या अगोदर हे पांच मुसलमान कोण होते हें वाचकांना कळविणें जरूर आहे. ज्यानें प्रश्न विचारला होता तो जाफर आमच्या वाचकांच्या परिचयाचाच आहे. तो केंजळगडावरील शिबंदीचा मुख्य अधिकारी होता. जाफरनें ज्याला प्रश्न विचारला होता तो हमीदखान, त्याचा मेहुणा असून तो केंजळगडावर गोलंदाजांच्या फौजेचा मुख्य अधिकारी होता. तिसरा मुसलमान स्वार अहमद हा तिरंदाजांच्या तुकडीवरचा मुख्य अधिकारी होता. चवथा मुसलमान स्वार करीमभाई हा केंजळगडावरील कारखानीस होता. पांचवा मुसलमान इस्माएलभाई हा केंजळगडावरील घोडदळाचा मुख्य अधिकारी होता.

हमीद आणि जाफर हे जसे एकमेकांचे मेहुणे होते तसे अहमद करीमभाई आणि इस्माएलभाई हे एकमेकांचे साडू होते. येथें हेंही सांगावयाला हरकत नाहीं कीं जाफर आणि अहमद ह्या दोघांत मावसभावांचें नातें होतें. तेणेंकरून हे पांचही मुसलमान परस्परांच्या घरोब्याचे होते. त्यांचे विचार जुळते असत; आणि सुखविलासादिकांच्या प्रसंगींही त्यांची बैठक एक असे.

हे पांच मुसलमान अधिकारी एका मित्राच्या घरीं कांहीं मंगलकार्य होतें त्यासाठीं नबाबसाहेबांची परवानगी विचारून गडावरून निघालेले होते. ते प्रहर-

रात्रींच्या आंत गडावर परत जावयाचे होते म्हणून त्यांच्या बरोबर मोतद्दार नव्हते.

येणेंप्रमाणें ह्या पांच मुसलमानांची माहिती करून देऊन आपलें कथासूत्र पुन्हा हातीं घेतों.

जाफरनें हमीदला म्हटलें, " हमीदसाहेब, तो समोरच्या टोळींत पिवळ्या फेट्याचा इसम जो दिसत आहे, तो आपल्या केंजळगडावरचा धोंडीबा आहे असें मला वाटतें. तुम्हाला काय वाटतें ? "

त्यावर हमीद म्हणाला, " होय, जाफरसाहेब, तो धोंडीबाच ! "

अहमदभाई म्हणाला, " त्या हरामखोराला पकडलें पाहिजे. "

करीमभाई म्हणाला, " त्याच्या मुसक्या बांधून आपण त्याला नबाबसाहेबांपुढें उभे करूं. "

इस्माएलभाई म्हणाला, " आपण त्याला पकडलें पाहिजे. त्यानें अनेक गुन्हे केंजळगडावर केलेले आहेत. त्याला शिक्षा झाली पाहिजे."

येणेंप्रमाणें ह्या पांच मुसलमानांचीं भाषणें होत आहेत तों दोन्ही बाजूचे लोक अगदीं जवळ येऊन ठेपले. धोंडीबा आणि गजानन ह्या दोघांनींही हे पांच मुसलमान ओळखलेच होते, आणि आतां कांहीं तरी चकमक होणार अशी अटकळ बांधली होती.

असो. धोंडीबाच्या मुखावर रागाची नजर लावून जाफर म्हणाला, " धोंडीबा, हरामखोरा, तुझ्या मुसक्या बांधून तुला गडावर नेऊन तुझा कडेलोट केला पाहिजे."

असें म्हणून जाफरनें धोंडीबाचा हात धरून त्याला खोगिरावरून खालीं ओढण्याचा प्रयत्न केला. परंतु धोंडीबानें त्याच्या हाताला हासडा देऊन त्याला दूर सारलें. मग शांतपणानें तो जाफरला म्हणाला, " जाफर साहेब, मी कोणाचा कांहीं गुन्हा केला नाहीं. मी कोणत्याही शिक्षेला पात्र नाहीं. शिवाय, हा तुमचा नबाबसाहेबांचा मुलूख नाहीं. येथें तुमचा कांहीं अधिकार चालणार नाहीं; विनाकारण कुरापत काढूं नका. मुकाट्यानें आपल्या वाटेनें पुढें चालूं लागा."

धोंडीबा याप्रमाणें जाफरशीं बोलत असतां दादा, काशीराम आणि गजानन, हे तिघे मराठे गडी, अवसानांत घोड्यांवर बसून हीं प्रश्नोत्तरें ऐकत होते. तसेंच हमीद, अहमद, करीमभाई आणि इस्माएल, हेही मुकाट्यानें तो संवाद ऐकत होते; आणि गरज पडल्यास मराठे गड्यांशीं दोन हात करावयाच्या निश्चयानें तेही अवसानांत बसले होते.

असो. धोंडीबाचें शांतपणाचें उत्तर ऐकून जाफर खवळला आणि म्हणाला, "धोंडीबा, तूं कोणाशीं उद्धटपणानें बोलत आहेस ह्याचें तुला भान आहे काय ? मी केंजळगडावरील शिबंदीचा मुख्य अधिकारी आहें, तूं यःकश्चित् मशाली करणारा माणूस आहेस. माझ्याजवळ तूं अदबीनें बोललें पाहिजे होतें. पण तूं नबाबसाहेबांच्या विलासांत हरकत करण्यासाठीं आपल्या सुंदर मुलीला गुप्तपणें विजापुरास पाठविलीस, हा तुझा एक गुन्हा; पण तुझी मुलगी मी सागरजवळ पकडली ही अलाहिदा गोष्ट आहे. तुझा दुसरा अपराध हा कीं तूं आपल्या रखवालदाराची गठडी बांधून त्याला ठार मारण्याचा प्रयत्न केलास. आतां तो रखवालदार मेला नाहीं ही गोष्ट अलाहिदा आहे. पण तूं त्याचा खून करण्याचा प्रयत्न केलास, हा तुझा दुसरा गुन्हा आहे. तूं कैदेंत असतां पळून गेलास, हा तुझा तिसरा गुन्हा आहे. तूं नबाबांच्या हद्दीच्या बाहेर नबाबांच्या परवानगीशिवाय गेलास, हा तुझा चौवथा गुन्हा. मी रिसाल्याचा मुख्य अधिकारी असतां तूं माझ्या समोर मोठ्या ऐटीनें घोड्यावर बसून राहिला आहेस हा तुझा पांचवा गुन्हा. मला पहातांच तूं घोड्यावरून खालीं उतरून मला सलाम केला नाहींस, हा तुझा सहावा गुन्हा. माझ्याशीं उद्धटपणानें बोललास, हा तुझा सातवा गुन्हा. हे हमीदसाहेब, अहमदसाहेब, करीमभाई आणि इस्माएलभाई, हे माझ्याप्रमाणेंच केंजळगडावरचे बडे अधिकारी असतां त्यांना तूं सलाम केले नाहींस, हा तुझा आठवा गुन्हा. हा मुलूख केंजळगडाच्या नबाबाच्या टापूच्या बाहेर आहे असा तूं मला टोमणा मारून माझा अपमान केलास, हा तुझा नवा गुन्हा. ह्याशिवाय आणखी किती तरी तुझे गुन्हे मी सांगूं शकेन. परंतु माझें तोंड दुखे तोंपर्यंत जरी मी बोललों तरी तुझ्या गुन्ह्यांची गणती संपणार नाहीं."

असें म्हणून जाफर आपल्या घोड्याची काढणी धोंडीबाच्या हातावर सरकफासानें टाकण्याचा उपक्रम करूं लागला. तों धोंडीबा शांतपणानें मागें हटला आणि म्हणाला, "जाफरसाहेब, माझ्या मुलीनें बाटावें किंवा न बाटावें, तिनें नबाबसाहेबांच्या जनानखान्यांत जावें किंवा न जावें, हें ठरविण्याचा हक्क नबाबसाहेबांकडे नाहीं. मला अन्यायानें कैदेंत घातलें असल्यामुळें मी गडावरून पळून गेलों तें योग्यच केलें. तुम्ही माझ्या शंभर गुन्ह्यांची यादी जरी माझ्यापुढें वाचली, तरी ह्या हद्दींत मला पकडण्याचा तुम्हाला अधिकार नाहीं, तुम्ही मुकाट्यानें आपल्या वाटेनें चालूं लागा."

हें धोंडीबाचें शांत आणि तोकडें उत्तर ऐकून जाफरला अतोनात संताप चढला.

त्याला आपल्या शक्तीचा भारी गर्व होता व तो अधिकारमदानें उन्मत्त झालेला होता. त्यानें एकदम आपली तरवार उपसली आणि धोंडीबाच्या अंगावर घाव करावयाला अवसान घेतलें. इतका वेळ बाकीचे चार मुसलमान गडी जे अलिप्त राहिले होते, त्यांनींही आपल्या तरवारी उपसल्या आणि धोंडीबावर आणि त्याच्या तीन दोस्तांवर वार करण्यासाठीं अवसान घेतलें. मराठे गडी ह्या प्रसंगाला सिद्ध होतेच. त्यांनींही आपल्या तरवारी उपसून अवसानांत धरल्या होत्या, आणि ते प्रतिपक्ष्यावर हल्ला करावयाला आणि प्रतिपक्ष्याच्या हल्ल्याचा प्रतिकार करावयाला सिद्ध होऊन अवसानांत होतेच.

तरवारींवर तरवारी आपटल्या. खणखणाट सुरू झाला. मराठे गडी शांत होते. ते मुख्यत्वेंकरून प्रतिपक्षाचे वार विफल करावयाला झटत होते. मुसलमान गडी मराठ्यांवर वार करावयाचा मुख्यत्वेंकरून प्रयत्न करीत होते. मराठ्यांचें रक्त आपल्या तरवारींना प्यावयाला अझून मिळालें नाहीं, म्हणून ते जास्त जास्तच चरफडत होते.

ही लढाई कांहीं क्षण चालली, तों चारी मराठे गड्यांनीं पांची मुसलमान गड्यांच्या तरवारींवर खुबीचे आघात करून त्या त्यांच्या हातांतून उडवून दिल्या. मुसलमान गडी बिनहत्यार झाले. ह्या वेळीं मराठे गड्यांना प्रतिपक्ष्यांना कंठस्नान सहज घालतां आलें असतें. परंतु पराभवाची लज्जा हीच त्यांना पुरेशी शिक्षा आहे असें त्यांनीं मनांत ठरविलें. रक्ताचा एकही थेंब न सांडतां ही छोटी लढाई अशा रीतीनें संपते न संपते तोंच मागून बालवीर तेथें येऊन पोंचले. त्यांना एकाच दृष्टिनिक्षेपांत सर्व प्रसंगाचें आकलन करतां आलें. त्यांच्या पाठोपाठ नऊ मोतद्दार मुलगेही येऊन पोंचले.

हे एकंदर अठरा मराठे गडी पाहातांच पांच मुसलमान घाबरून गेले. जाफर धोंडीबाला हात जोडून विनवणीच्या स्वरानें म्हणाला, "आम्हाला माफ करून जीवदान द्या. आम्ही तुम्हाला शरण येत आहों."

जाफरनें ही प्रार्थना केली, तिचा विचार करण्यासाठीं धोंडीबा, दादा, गजानन आणि काशीराम हे जरा दूर सरले. बाकीचे चवदा गडी त्या पांच मुसलमानांवर पहारा करण्यासाठीं तेथेंच उभे राहिले.

धोंडीबा आणि त्याचे तीन दोस्त-ह्यांच्यापुढें आतां हे चार प्रश्न उभे राहिले.

१. ह्या पांच मुसलमानांना जागच्या जागींच देहांत प्रायश्चित्त द्यावें काय?

२. त्यांचा गुन्हा बादशहाच्या हद्दींत घडलेला आहे त्या अर्थी त्यांना बादशहाच्या अधिकाऱ्यांच्या हवालीं करावें काय ?

३. त्यांना शिवाजीकडे नेऊन गुदरावें काय ?

४. अरुंधतीला तुम्ही सोडून द्यावयाला कबूल असल्यास आम्ही ह्या पांच अधिकाऱ्यांना सोडून देऊं, नाहीं तर नाहीं, असा निरोप नबाबाला पाठवावा काय ?

ह्या चार प्रश्नांची आपल्या चार मऱ्हाठे गड्यांनीं थोडक्यांत वाटाघाट करून असें ठरविलें कीं पहिला म्हणजे देहान्त शिक्षेचा प्रकार त्याज्य होय. दुसरा प्रकार म्हणजे बादशहाच्या अधिकाऱ्यांच्या हवालीं त्या पांच मुसलमानांना करणें हें मूर्खपणाचें कृत्य होय. कारण, मुसलमानांच्या हातून हिंदूविरुद्ध गुन्हा कधीं होणें शक्य नाहीं असा त्या काळच्या मुसलमानांचा सिद्धान्त असे. तिसरा मार्ग म्हणजे शिवाजीपुढें त्या पांचांना नेऊन उभें करणें. परंतु असें करणें त्रासाचें, दिरंगाईचें आणि धोक्याचें होईल असें सर्वानुमतें ठरलें. चवथा प्रकार हाच सर्वांना पसंत पडला आणि अशा प्रकारचें थोडेंसें काम मुरारीनें केलेलें होतें हें सर्वांना माहीत होतें, म्हणून त्याला तेथें बोलावण्यांत आलें. त्यानें सर्वांचें बोलणें ऐकून घेऊन अशी सल्ला दिली—"येथून जवळच भोपाळगड आहे. तो शिवाजीनें जिंकून घेतला आहे. तेथें आज एक हिंदू गडकरी आहे. तो माझ्या चांगल्या ओळखीचा आहे. ह्या पांचांना भोपाळगडावर तुरुंगांत ठेवावें आणि आपण शिवाजीला भेटून झालेली हकीगत त्याला सांगावी आणि नंतर तो सांगेल तसें करावें."

हा मुरारीचा विचार सर्वांना पसंत पडला, आणि तसें करावयाचें असें ठरवून हीं पांच माणसें इतर लोक उभे होते तेथें आलीं. मग धोंडीबा त्या पांच मुसलमानांना म्हणाला, "तुम्ही माफी मागत आहां ती माफी आम्ही तुम्हाला देतों. तुम्ही जीवदान मागत आहां तेंही आम्ही तुम्हाला देतों. तुमच्या केशालाही आम्ही इजा करणार नाहीं असें तुम्हाला आम्ही वचन देतों. परंतु कांहीं दिवस आम्ही तुम्हाला अटकेंत ठेवूं. तुमच्या दर्जाप्रमाणें तुमचें खाणें, पिणें, राहाणें, वगैरे संबंधाची आम्ही हमी घेतों. चला आमच्याबरोबर."

ही धोंडीबाची सूचना पांची मुसलमानांनीं कबूल केली. कारण, ती कबूल केल्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें. मग त्यांना पोबारा करतां येऊं नये म्हणून प्रत्येक घोड्याची काढणी मराठे गड्यांनीं आपल्या हातांत धरून ठेविली, आणि त्यांच्या चारी बाजूंनीं मराठे गडी चालूं लागले.

संध्याकाळच्या सुमारास हे तेवीस असामी भोपाळगडावर येऊन दाखल झाले. मुरारीनें गडकऱ्याला भेटून सर्व हकीगत त्याला कळविली. त्यानें त्या पांच मुसलमानांना बंदोबस्ताच्या कोठडींत घातलें आणि त्यांचेवर नागव्या तरवारींचा पाहारा ठेविला.

हे मराठे गडी शिवाजीचे अनुयायी होणार आहेत हें ऐकून गडकऱ्यानें त्यांचें अभिनंदन केलें. त्यानें ह्या नव्या देशभक्तांना रात्रीं मेजवानी केली. अघळपघळ गप्पा गोष्टी झाल्या. नंतर रात्रीं त्यांच्या विश्रांतीच्या सर्व सोयी करून देण्यांत आल्या.

प्रातःकाळीं हे अठरा मराठे गडी भोपाळगडाच्या गडकऱ्याचा निरोप घेऊन शिवाजीच्या भेटीसाठीं त्या गडावरून निघाले.

---

## प्रकरण २१ वें.

# शिवाजीची भेट.

ज्या काळची गोष्ट आम्ही लिहीत आहों, त्या काळीं पुणें शहर आणि विठ्ठलवाडी यांच्या दरम्यान एक विस्तीर्ण पटांगण होतें. तें ठोकळ मानानें वाटोळें होतें आणि त्यांत मधून मधून लहान मोठे फत्तर होते आणि बारीकसारीक खांच खळगे होते, तरी एकंदरीनें तें सपाट होतें असें म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं. ह्या पटांगणाचा घेर सुमारें पांच मैल होता.

ह्या पटांगणाच्या बहुतेक मध्यभागीं एक प्रचण्ड वटवृक्ष होता. तो सुमारें दहा पुरुष उंचीचा असून त्याच्या शाखा त्या पटांगणाच्या सुमारें अष्टमांशावर आपली छाया पाडीत होत्या. त्याच्या शेकडों पारंब्या जमिनीपर्यंत पोंचलेल्या असून त्यांना बुंध्याचें रूप प्राप्त झालेलें होतें.

ज्या विशिष्ट दिवशीं आम्ही आपल्या प्रिय वाचकांना ह्या पटांगणांत नेणार आहों, त्या दिवशीं तेथें सुमारें हजार बाराशें बालवीरांचीं मर्दानीं कामें चाललेलीं होतीं. हे बालवीर बहुतेक अठरा ते वीस बावीस वर्षांच्या वयाचे असून त्यांचीं गात्रें घट्ट आणि मजबूत होतीं. ते बहुतेक काळ्या वर्णाचे होते, परंतु त्यांचे डोळे विशाळ आणि तेजस्वी होते. त्यांच्या चेहऱ्यावर टवटवी आणि बालदशेंतील साधेपणा पाहून कोणाही प्रेक्षकाच्या मनात त्यांच्याविषयीं आत्मीयतेची भावना उत्पन्न झाली असती.

ह्या बालवीरांचे सुमारें पन्नास साठ गट ह्या सर्व पटांगणभर पसरलेले होते आणि एका एका गटांत पंधरापासून वीसांपर्यंत मुलगे होते. एका गटांतील मुलगे लेजीम करीत होते, दुसऱ्या गटांतील मुलगे आट्यापाट्या खेळत होते, तिसऱ्या गटांतील मुलगे दांडपट्टा खेळत होते. अशा रीतीनें तेथें त्या काळच्या पद्धतीप्रमाणें नाना प्रकारचे खेळ खेळले जात होते. कुस्त्या, मल्लखांब, बोथाटी, लगोऱ्या, लांब व उंच उड्या, दोर खेचणें, कोल्हाड्या आणि इतर प्रकारच्या उड्या, वगैरे विविध मर्दानी खेळ वेगळ्या वेगळ्या गटांत खेळले जात होते. प्रसंगविशेषीं हंसण्याचा, बोलण्याचा, ओरडण्याचा, आवाज उत्पन्न होत असे.

ह्या सर्व मर्दानी खेळांत एक खेळ असा होता कीं तो हल्लींच्या काळीं लोकांना अगदीं अज्ञात असा आहे. तथापि तो भिन्न रूपानें हल्लींही पाहाण्यांत येतो. हा खेळ कोणचा म्हणाल तर तो वरातीचा खेळ.

वरात ही एक मणगटाइतकी जाडी आणि पंचवीस तीस वांव लांबीची दोरी असे. ती बहुधा अंबाडीची किंवा कापसाची वळलेली असे. ह्या वरातीवर एका एका हाताच्या अंतरानें गांठी असत. वरातीच्या एका टोकाला एक लोखंडाचा गळ किंवा आंकडा असे, आणि दुसऱ्या टोकाला एक लोखंडाचें मोठें कडें असे. ह्या वरातीचा आंकडा हातांत धरून झाडाच्या फांदीवर फेंकला जात असे. तो त्या फांदीला नीट अडकला किंवा नाहीं हें पाहाण्याकरितां वरातीच्या दुसऱ्या टोंकाकडचें कडें सात आठ इसम खेचून पाहात. तो आंकडा नीट अडकला नसला, तर तो ह्या खेचण्यानें गळून पडे. मग तो पुन्हा फांदीवर फेकला जात असे. तो पक्का अडकला अशी वरातीचें कडें खेचणाऱ्यांची खात्री झाली म्हणजे तिच्यावरचीं कामें सुरू केलीं जात असत.

एका हाताच्या मुठीनें गांठीच्या वर वरात घट्ट धरून दुसऱ्या हाताच्या मुठीनें वरच्या गांठीवर वरात धरून शरीर वर चढवावयाचें. नंतर खालचा हात सोडून वरच्या गांठीवर वरात धरून शरीर चढवून खालची मूठ सोडावयाची. जिन्याच्या पायऱ्यांवरून पायानें चढून जसे आपण माडीवर जातों, तसें गांठींचा आधार घेऊन हातांनीं वर चढावयाचें, असा हा खेळ असे. ह्या खेळानें छाती, मान, दंड आणि कंबर ह्यांना उत्कृष्ट व्यायाम होत असे. वरातीच्या खालीं जमिनीवर पुरुष-भर उंचीचा गवताचा ढिगारा लांबच लांब पसरलेला असे. अशासाठीं कीं कोणी वीर मुठीची पकड निसटून खालीं पडला, तर त्याला कांहीं इजा न व्हावी.

ज्या विशिष्ट समयीं आम्ही वाचकांना ह्या पटांगणांत घेऊन जात आहों, त्या समयीं त्यांतील वटवृक्षाच्या एका उंच शाखेला एक वरात अडकविलेली होती, आणि जमिनीवर गवताचा लांब ढिगारा पसरलेला होता. एक एक बालवीर ह्या वरातीवरून माकडाप्रमाणें सरासर चढून वर जात होता. मग फांदीवरून झाडाच्या बुंध्यावरून जमीनीवर उतरत असे. पहिला मुलगा फांदीवर जाऊन पोंचतांच दुसरा मुलगा वरातीवरून चढून जात होता. त्याच्यामागून तिसरा, त्याच्या मागून चवथा, अशा रीतीनें सर्व मुलें एक एकदां चढून गेलीं म्हणजे पुन्हा पहिला मुलगा वर चढत होता, त्याच्यामागून दुसरा, दुसऱ्याच्या मागून तिसरा, अशा रीतीनें वरातीचीं दोन तीन चक्रें झालीं, आणि खेळ खेळणाऱ्या मुलांनीं तो बंद करण्याचा विचार केला. तेव्हां शेवटच्या मुलानें फांदीवरून खालीं उतरतांना त्या फांदीवरून वरातीचा आंकडा सोडवून तो खालीं टाकून दिला, आणि नंतर तो मुलगा खालीं उतरला.

ह्या वेळीं दिवस सुमारें प्रहर दीड प्रहर चढला होता. तेहां त्या पटांगणांतील विविध खेळांवर देखरेख करणाऱ्या मुलानें इशारतीची शीळ वाजवितांच सर्व मुलांनीं आपले खेळ बंद केले आणि तीं सर्व मुलें दहा पंधरा जागीं गोळा झालीं. येथें त्यांना व्यवस्थित रीतीनें दूध देण्यांत आलें. नंतर त्यांना घरोघर जाण्याला परवानगी देण्यांत आली.

हा पटांगणांतील खेळांचा विषय संपवून आम्ही पुढचा वृत्तान्त सांगावयाला सुरवात करावयाच्या अगोदर वाचकांना एक गोष्ट कळविणें जरूर आहे. एका दिवशीं जे मुलगे एकादा विशिष्ट खेळ खेळलेले असतील, ते मुलगे पुन्हा तोच खेळ दुसऱ्या दिवशीं खेळत नसत, तर दुसरा कांहीं तरी खेळ खेळत असत. म्हणजे असें कीं ज्या मुलांनीं एका दिवशीं वरातीवर चढण्याचें काम केलेलें असेल, ते मुलगे दुसऱ्या दिवशीं लेजीम खेळत, तिसऱ्या दिवशीं दांडपट्टा खेळत, चवथ्या दिवशीं धांवण्याची शर्यत खेळत, अशा रीतीनें सर्व खेळांचें चक्र समाप्त झालें म्हणजे ते पुन्हा पहिल्या दिवसाचा खेळ खेळत. हें खेळांच्या क्रमाचें चक्र पूर्वींच ठरवून ठेवलेलें असे; त्यामुळें तें रोजच्या रोज ठरविण्यांत वेळ जात नसे. अशा रीतीनें प्रत्येक मुलाला प्रत्येक खेळ खेळतां येत असे. ज्या मुलांना कांहीं शारीरिक व्यंगांमुळें एकादा विशिष्ट खेळ खेळतां येत नसेल, त्या मुलाला त्या खेळांत सूट मिळत असे.

याप्रमाणें ह्या पटांगणांतील खेळांसंबंधाची माहिती वाचकांना देऊन आम्ही आपलें कथासूत्र पुन्हा हातीं घेतों.

ज्या विशिष्ट दिवसाची हकीगत आम्ही सांगत आहों त्या दिवशीं हा परवानगी देण्याचा विधि संपत आला होता, अशा समयीं भोपाळगडाहून आलेले अठरा देशभक्त ह्या पटांगणापाशीं येऊन दाखल झाले.

पटांगणांतील खेळ संपलेले होते, आणि खेळांचीं नाना प्रकारचीं साधनें तेथून उचलून नेण्यांत आलेलीं होतीं. बहुतेक मुलगे गेलेले होते, अशा समयीं मुरारी आणि त्याच्या बरोबरचे सतरा इसम त्या पटांगणांत शिरले. त्या प्रदेशाचा पूर्ण माहितगार असा मुरारीच काय तो त्यांच्यांत होता. त्या कारणामुळें तो सर्वांच्या पुढें होऊन चालूं लागला. त्याच्यामागून त्याचे सोबती येत होते.

मुरारीनें दूरूनच शिवाजीला आणि त्याच्या शेजारीं बसलेल्या सर्व माणसांस ओळखलें; त्यांनींही मुरारीला दुरून ओळखलें; पण त्याच्या बरोबरची मंडळी त्यांना ठाऊक नव्हती.

हांकेच्या अंतरावर मुरारी आणि त्याचे सोबती घोड्यांवरून उतरले. मग मुरारीनें पुढें होऊन शिवाजी, तानाजी, वगैरेंना मंदस्मितपूर्वक वंदन केलें. त्याचें अनुकरण बाकीच्या सतरा असामींनीं केलें. नंतर नऊ मोतद्दार मुलगे सर्वांच्या घोड्यांच्या तनदुरुस्तीच्या कामासाठीं गेल्यावर बाकीचे नऊ असामी शिवाजीनें निर्दिष्ट केलेल्या ठिकाणीं बसले. नंतर मुरारीनें आपल्या आठ दोस्तांचा शिवाजी आणि त्याचे मित्र यांच्याशीं परिचय करून दिला.

परंतु हा परिचय होऊन संभाषणाला सुरवात व्हावयाच्या अगोदर कांहीं प्रास्ताविक माहिती वाचकांना देणें जरूर आहे.

पटांगणांतील मर्दानी खेळ झाले होते ते शिवाजीच्या देखरेखीखालीं झाले होते. अशा प्रकारचे खेळ रोज त्या पटांगणांत होत असत. आजचे हे खेळ संपले आणि वीरगडी घरोघर निघून गेले, त्यांच्या पाठोपाठ शिवाजी आणि त्याचे दोस्त हेही जाणार होते. परंतु आपणाकडे कोणी माणसें येत आहेत असें पाहून ते तेथेंच बसून राहिले.

शिवाजीच्या जवळ ह्या वेळीं तानाजी मालुसरे, एसाजी कंक, आणि बाजी फसलकर हे त्याचे दोस्त बसलेले होते. हे चवघे मुलगे सतरा अठरा वर्षांच्या वयाचे होते. त्यांचा परस्परांशीं कांहीं नात्यागोत्याचा संबंध नव्हता; परंतु त्यांच्या-

तील मैत्रीचें प्रेम शुद्ध स्वरूपाचें होतें. ह्या मैत्रीच्या प्रेमाला मत्सराचें वारेंही कधीं शिवलें नाहीं. एकाचा जो विचार तोच बाकीच्या तिघांचा विचार. एकाचा जो आनंद तोच बाकीच्या तिघांचा आनंद, एकाचें जें दुःख तेंच बाकीच्या तिघांचें दुःख. एकाची जी निराशा तीच बाकीच्या तिघांची निराशा. सारांश, त्या चार मुलांची मैत्री पाहून लोकांना असें वाटत असे कीं त्या चौघांना चार देह असून त्यांना अंतःकरण मात्र एकच आहे. ही त्यांची मैत्री इतिहासांतील एक अपूर्व बाब म्हणून प्रसिद्ध आहे.

शिवाजीच्या भेटीला आलेल्या नऊ देशभक्तांपैकीं मुरारी ह्या एकट्यानेंच काय तें शिवाजीला पूर्वीं पाहिलेलें होतें. बाकीच्या आठांनीं त्याला कधीं पाहिलेलें नव्हतें.

चातुर्वर्ण्य, विश्वबंधुत्व, सत्य आणि शुचित्व, ह्या चार आधारस्तंभांवर प्रतिष्ठित अशी जी आर्यसंस्कृति, ती अखंडित चालू ठेवण्यासाठीं स्वराज्याची स्थापना करावयाचा निश्चय ज्यानें केला आहे असा शिवाजी म्हणून एक लहान मुलगा महाराष्ट्रांत आहे, अशी बातमी उडत उडत पुष्कळांनीं ऐकलेली होती. परंतु ही बातमी कितपत खरी आहे हें निश्चयात्मक रीतीनें कोणालाच ठाऊक नव्हतें, किंवा फारच थोड्यांना ठाऊक होतें. त्याच्या संबंधानें परस्परविरुद्ध अशा अनेक बातम्या महाराष्ट्रभर पसरलेल्या होत्या. त्याला कोणी अवतारी पुरुष म्हणत तर कोणी थोतांड्या म्हणत, आणि कोणी तर ती केवळ गप्प असें म्हणत असत.

असा जो शिवाजी तो खरोखरी अस्तित्वांत आहे, तो आपल्याच सारखा हाडामांसाच्या देहानें उपलक्षित आहे, त्याच पुरुषाला आपण आपल्या स्वताच्या डोळ्यांनीं पाहात आहों, हा विचार मनांत येऊन दादा, धोंडीबा, पुंडरीक, गजानन इत्यादिकांना जो आनंद झाला, जें कौतुक वाटलें, जी धन्यता वाटली, तिचें वर्णन करावयाला आमची लेखणी असमर्थ आहे !

ह्या वेळीं शिवाजीचें वय सतरा अठरा वर्षांचें होतें. त्याचा वरचा ओठ आणि हनुवटी हीं अगदीं गुळगुळीत होतीं. त्याचा चेहेरा भव्य आणि प्रेक्षकाच्या मनावर छाप पाडणारा असा होता.

शिवाजी वर्णानें साधारण गोरा होता, काठीनें मध्यम उंचीपेक्षां थोडासा अधिक उंच होता आणि अंगानें सडपातळ होता. त्याचें कपाळ उंच आणि विशाल होतें. त्याचे डोळे विस्तीर्ण आणि काळेभोर होते, आणि त्याच्या नजरेंत असा कांहीं विशेष होता कीं ज्याच्याकडे तो पाही, त्याला तो आपलासा करून टाकी.

आतां त्याच्या चेहेऱ्याचा एक विशेष सांगावयाचा राहिला आहे तो हा, कीं त्याची नासिका पक्ष्यांचा राजा जो वैनतेय त्याच्या चोंचीसारखी होती.

भोपाळगडावरून नऊ इसम त्याला भेटण्यासाठीं आले, त्याच्या अगोदर त्यानें पटांगणांतील खेळांत भाग घेतला होता, आणि इतर मुलें घरोघर गेलीं तेव्हां तोही आपल्या तिघां मित्रांसह घरीं जावयाला कपडे घालून तयार होऊन राहिला होता. त्याचा पोशाख ह्या वेळीं अगदीं साधा होता. त्याच्या अंगांत बंडीवर एक रूमऱ्या अंगरखा, कमरेला मांडचोळणा आणि डोक्याला साधा पटका होता. कमरेला तोस्तदान आणि एक लहानशी तरवार होती.

कपड्यांनीं न आच्छादलेले जे त्याच्या शरीराचे भाग दिसत होते, ते घट्ट आणि मजबूत असे दिसत होते.

येणेंप्रमाणें शिवाजीसंबंधानें वाचकांना आम्हीं थोडीशी माहिती दिली. आतां पुन्हा आम्ही कथासूत्र हातीं घेतों.

मुरारीनें आपल्याबरोबर आलेल्या माणसांचीं शिवाजीला नांवें गांवें वगैरे सांगितल्यानंतर त्या सर्वांचें मोकळ्या मनानें बोलणें सुरू झालें. तें पुढच्या प्रकरणीं आम्ही वाचकांना तपशीलवारपणें कळवूं.

---

## प्रकरण २२ वें.

# नव्या मंडळींची तपशीलवार हकीगत.

शिवाजी, तानाजी, एसाजी आणि बाजी वगैरे पूर्वी त्या पटांगणांत हजर असलेले देशभक्त आणि दादा, काशीराम, गजानन, धोंडीबा वगैरे मागून तेथें आलेले देशभक्त, हे सर्व सुखासीन झाल्यावर शिवाजीनें ह्या नवीन माणसांचा तपशीलवार इतिहास जाणून घेण्यासाठीं प्रत्येकाची माहिती विचारली. प्रत्येकानें आपापली हकीगत सांगितली.

दादानें आपली हकीकत जशी पूर्वी धोंडीबाला सांगितली होती, तशीच आतां शिवाजीला सांगितली, आणि शेवटीं म्हटलें, "मीं पूर्वी फार मोठें वैभव भोगलेलें आहे, तें आतां नष्ट झालेलें आहे. परंतु त्या गत वैभवाबद्दल मला कांहीं हळहळ वाटत नाहीं. मला दुःख होतें तें ह्या गोष्टीनें होत आहे कीं, मी ज्या माणसांवर प्रेम करीत होतों, आणि जीं माणसें मजवर प्रेम करीत होतीं, तीं

सर्व यमानें ओढून नेल्याकारणानें मला आतां सुखदुःखाचीं वाटेकरी माणसें कोणी राहिलीं नाहींत. माझे दोन्ही मुलगे मेल्याकारणानें मला पिंड देणारा कोणी नाहीं. मी जगांत एकटा प्राणी माझ्या कुटुंबापैकीं शिल्लक राहिलों आहें, आणि जो मनुष्य माझ्या कुळांतील शिल्लक राहिला आहे, तो मला पिंड देणार नाहीं, अशी माझी खातरी आहे, आणि जरी त्यानें दिला तरी तो मला मिळणार नाहीं. सारांश, मला आतां ह्या जगांत किंवा परलोकांत सुख देणारा कोणी नाहीं. अशा स्थितींत समाजरूपी कुटुंबाचें जितकें योगक्षेम माझ्या हातून चालवेल, तितकें चालविण्याच्या इराद्यानें मी तुमच्याकडे आलों आहें. मला जें काम योग्य असें तुम्हांला वाटेल तें मला नेमून द्या, तें मी यथाशक्ति करीन. महाराष्ट्रीयांच्या सुखस्थितीला मी अल्प स्वल्प प्रमाणांत जरी कारण झालों, तरी माझ्या जन्माचें सार्थक झालें असें मी समजेन."

नंतर धोंडीबानें आपली हकीगत शिवाजीला सांगितली, ती वाचकांना ठाऊकच आहे. शेवटीं तो म्हणाला, "माझ्या कुटुंबांतील तीन माणसें आज तीन ठिकाणीं आहेत, तीं परत एकत्र व्हावीं, माझी मुलगी नबाबाच्या तावडींतून पवित्र स्थितींत सुटावी, अशी माझी इच्छा आहे. भोपाळगडाच्या खानाच्या तावडींतून तुम्ही जशा नुकत्याच दोन मुली सोडविल्या, तशी माझी मुलगी तुम्ही केंजळगडाच्या नबाबाच्या तावडींतून सोडवून द्या, अशी मी तुम्हाला विनंति करतों. मुसलमान लोकांच्या जाचांतून हिंदूंना सोडविण्याचा तुम्हीं उद्योग आरंभिला आहे. तर माझ्या मुलीला सोडविण्याचें पुण्य तुम्ही पदरीं घ्याच."

काशीराम आणि गजानन यांनीं आपण कोण, कोठले, आणि आजपर्यंत काय केलें हें सांगितल्यावर ते दोघेही शेवटीं म्हणाले, "स्वराज्यस्थापनेच्या कामीं तुम्ही झटणार आहां. ह्या पुण्याच्या कामाला आमच्या हातून होईल तितकी मदत करावी, ह्या इच्छेनें आम्ही तुमचे अनुयायी होण्यासाठीं आलों आहों. आमचा तुम्हीं स्वीकार करावा आणि तुमच्या मतानें जी आमची लायकी असेल, त्या लायकीप्रमाणें आम्हांला तुम्ही कामें सांगा. आम्ही तीं पार पाडूं."

पुंडरीक, सदाशिव, गोपीनाथ आणि मल्हारि म्हणाले, "आम्हाला आमच्या वडील माणसांनीं तुमच्या पुण्यकृत्यांत यथाशक्ति मदत करावयासाठीं तुमचे अनुयायी होण्याची परवानगी दिली आहे. तुम्ही मुरारीला जशी कामगिरी दिली, तशी आम्हाला कांहीं तरी कामगिरी द्या. ती आम्ही पार पाडूं."

येणेंप्रमाणें सर्वांनीं आपआपलें वृत्त शिवाजीला सांगितल्यानंतर मुरारी म्हणाला, " आबा, केंजळगडाच्या नबाबाच्या कचाटींतून धोंडीबाच्या मुलीला सोडविण्यासाठीं कोणत्याही मार्गाचें अवलंबन केलें, तरी एक गोष्ट आपल्याला अनुकूल आहे. "

शिवाजीनें विचारलें, " ती कोणती ? "

मुरारीनें उत्तर दिलें, " आम्ही तुमच्या भेटीसाठीं इकडे येत असतां आह्मांला वाटेमध्यें केंजळगडावरील पांच मुख्य अधिकारी भेटले. त्यांनीं उपद्रव करण्याला सुरवात केली. "

शिवाजीनें विचारलें, " बरें मग ? "

मुरारी म्हणाला, " ते पांच मुसलमान आमच्यावर तुटून पडले. आम्ही अठरा हिंदू गडी होतों. त्यांना पुरून उरण्याइतके आम्ही होतों. "

शिवाजीनें विचारलें, " तुम्ही त्यांचा पराभव केलाच असेल ? "

मुरारी म्हणाला, " केलाच केला. "

शिवाजी म्हणाला, " बरें पुढें ? "

मुरारी म्हणाला, " आम्हीं त्यांचा पराभव केला, त्यांना आम्ही गिरफदार केलें आणि आमच्या वाटेवरच भोपाळगड होता, त्यावर त्यांना नेऊन सोनाजीराव निळोबा समर्थ ह्यांच्या हवालीं केलें. सोनाजीनीं त्यांना बंदोबस्तानें कैदेंत ठेविलें आहे. अर्थात् त्यांच्या दर्जाप्रमाणें ते त्यांना वागवितीलच."

शिवाजी म्हणाला, " अलबत वागवितील. सोनाजीला मी आज पुष्कळ दिवस पाहात आहें. तो अत्यंत योग्य मनुष्य मी भोपाळगडाचा गडकरी केला. तो त्या पांच मुसलमान अधिकाऱ्यांना त्यांच्या दर्जाप्रमाणें वागवील ह्यांत शंका नाहीं. पण मुरारी ते पांच मुसलमान केंजळगडावर कोणच्या कोणच्या कामावर होते ?"

मुरारीनें उत्तर दिलें, " केंजळगडावरील शिबंदीचा मुख्य अधिकारी जाफरखान हा एक, गोलंदाजांचा मुख्य अधिकारी हमीदखान हा दुसरा, तिरंदाजांचा मुख्य अधिकारी अहमद हा तिसरा, कारखानीस करीम भाई हा चवथा, आणि घोडदळाचा मुख्य अधिकारी इस्मायल भाई हा पांचवा. असे पांच अधिकारी आज आपल्या हातांत आहेत."

" शाबास ! शाबास !" असा उद्गार एकदम शिवाजीनें आणि त्याच्या तीन दोस्तांनीं काढला.

शिवाजी म्हणाला, "आतां काय ? केंजळगड म्हणजे परसांतील भाजी !"

तानाजी म्हणाला, " आतां केंजळगडाच्या नबाबाला वठणीस आणावयाला एका घटकेचाही उशीर लागणार नाहीं ! "

एसाजी म्हणाला, "पांच अधिकारी आपल्या तावडींत सांपडले आहेत. आतां आबा, केंजळगड आपण हां हां म्हणतां घेऊं ! "

बाजी म्हणाला, " मुरारि, तुझी चतुराई वर्णावी तितकी थोडी आहे. त्या पांच अधिकाऱ्यांना तूं माफी करून जाऊं दिलें नाहींस, आणि भोपाळगडावर त्यांना अटकेंत ठेवलेंस, हें फार उत्तम केलेंस !" मग धोंडीबाकडे वळून म्हणाला, "धोंडीबा, आतां तुमची मुलगी दहा दिवसांच्या आंत तुम्हाला भेटेल. चिंता करूं नका."

धोंडीबा म्हणाला, " देव तुमच्या आशा सफळ करो ! "

---

## प्रकरण २३ वें.

# देशभक्तांचें खलबत.

वर दिल्याप्रमाणें ह्या मंडळींचीं बोलणीं चाललेलीं असतां मध्यान्हाचा समय आला. तेव्हां शिवाजीनें ह्या नऊ माणसांना विचारलें, " तुम्हापैकीं कोणी पूर्वी पुण्याला आलेलें होतें काय ? पुण्यांतील कोणा माणसाला तुम्हाला भेटावयाचें आहे काय ? "

तेव्हां सर्वांनीं उत्तर दिलें, " आम्ही कोणी याच्या अगोदर पुण्याला आलेले नव्हतों. पुण्यांत आमचें कोणी नातलग माणूस नाहीं, आणि आम्हाला कोणालाही भेटावयाचें नाहीं. "

तेव्हां शिवाजी त्यांना म्हणाला, " चला तर माझ्याबरोबर. मी तुम्हा सर्वांच्या उतरण्याची, जेवणाची, आणि निजण्याबसण्याची तजवीज करतों. "

" ठीक आहे, " असें सर्वांनीं उत्तर दिल्यावर शिवाजी आणि त्याचे मित्र, आणि त्यांच्या भेटीला आलेलीं हीं नऊ माणसें आणि त्या सर्वांचे घोडे संभाळणारे मोतद्दार, वगैरे सर्व माणसें घोड्यांवरून पुणें शहरांत आलीं.

पाहुणे माणसांच्या सर्व सोयी शिवाजीनें उत्तम प्रकारें लावून दिल्या. मग जेवणें झाल्यानंतर सर्व माणसें पुन्हा विचार करण्यासाठीं एकत्र जमलीं.

सर्व हकीगत तपशीलवार मला सांग असें प्रथम शिवाजीनें धोंडीबाला म्हटलें; तेव्हां धोंडीबानें ती सांगितली. नबाबानें धोंडीबाजवळ अरुंधतीची मागणी

केली. धोंडीबानें नबाबाला नकारात्मक उत्तर दिलें, मग धोंडीबानें आपली बायको आणि मुलगी ह्यांना विजापुराकडे रवाना करून दिलें, मग निराश झालेल्या नबाबानें धोंडीबाला कैदेंत टाकलें, तेथून तो पळाला, वाटेंत गोसावी त्याला भेटला; मग ते दोघे नांदेडला गेले, इत्यादि सर्व वृत्तांत धोंडीबानें शिवाजीला आणि त्याच्या तीन मित्रांना कळविला.

सर्व हकीगत सांगणें संपल्यावर धोंडीबा म्हणाला, "आबा, माझी तुम्हाला अशी विनंती आहे, कीं माझी मुलगी अरुंधती हिला नबाबाच्या तावडींतून सोडविण्याचा कांहीं इलाज करा. हा इलाज करण्याच्या कामीं माझ्या हातून जी मदत तुम्हाला करणें शक्य आहे, ती मी करावयाला तयार आहें. भोपाळगडाच्या खानाच्या तावडींतून तुम्ही जानोजीराव पाटील यांच्या दोन मुली सोडविल्या, ती हकीगत मुरारीनें आम्हा सर्वांना सांगितली आहे. तशाच प्रकारचा कांहीं इलाज करून माझी अरुंधती तुम्ही सोडवा अशी माझी तुम्हाला प्रार्थना आहे."

याप्रमाणें धोंडीबानें आपली सर्व हकीगत तपशीलवारपणें सांगितली ती सर्वांनीं ऐकली. शेवटीं यानें केलेली विनंतीही सर्वांनीं ऐकिली. नंतर क्षणभर विचार करून शिवाजी म्हणाला, "धोंडीबा, जी तुमच्या अरुंधतीची हकीगत तीच महाराष्ट्रांतील हजारों मुलींची हकीगत आहे. हे मुसलमान लोक हिंदूंवर भारी जुलूम करतात, हिंदूंची गांजणूक करतात, हिंदूंना बाटवितात, हिंदूंना पूज्य असलेल्या गोमातेचें मांस खातात, हिंदूंचीं देवळें भ्रष्ट करतात, देवळांतील देवांच्या मूर्ति फोडून त्यांचे तुकडे करून त्या तुकड्यांवर जोड्यांच्या पायांनीं नाचतात, ब्राह्मणांचीं जानवीं गमतीखातर कापतात, गोसाव्यांचे कमंडलू फोडतात, हिंदूंच्या बायका, सुना लेकी, ह्यांना विलासासाठीं किंवा गमतीसाठीं भ्रष्ट करतात, हिंदूंचीं धर्मपुस्तकें जाळतात, असे असंख्य अनन्वित प्रकार हे मुसलमान लोक हिंदूंच्या विरुद्ध करीत आहेत; हिंदूंच्या जीविताला, अब्रूला, पैशाला, कशालाही सुरक्षितपणा नाहीं. हव्या त्या मुसलमानानें हव्या त्या हिंदूचा हवा तो अपकार करावा, दाद लागत नाहीं. हे परदेशी परधर्मी मुसलमान लोक आपल्या देशांत लांडगे शेतांत येतात तसे आले आहत, आणि यथेच्छ धुडगूस घालीत आहेत! शिव शिव! हिंदूंच्या देशांत हिंदूना सुखानें भाकरी खातां येत नाहीं असा भयंकर काळ आपणावर ओढवला आहे. परंतु मित्रांनो, 'काळ ओढवला आहे,' 'काळ ओढवला आहे,' असें म्हणून रडत आणि ओरडत बसणें, हें भागूबायांचें काम आहे. काळ ओढवला आहे ही गोष्ट खरी आहे, पण तो ओढवलेला काळ परत-

विण्याची आपण खटपट केली पाहिजे, नाहींतर बायका आणि आपण पुरुष सारखेच ठरूं ।।”

तेव्हां तानाजी मालुसरे म्हणाला, “आणि ही खटपट करावयाचें आपल्या आबांनीं मनांत आणलें आहे. आबांना आपण सर्वांनीं मदत केली तर त्यांची खटपट फळाला येईल.”

तेव्हां दादा म्हणाले, “आबांना त्यांच्या कामांत मदत करावयासाठींच तर आम्ही आलों आहों.”

काशीराम आणि गजानन हे दोघे म्हणाले, “आम्ही आबांचे अनुयायी व्हावयाच्या उद्देशानें इकडे आलों आहों.”

एसाजी कंक म्हणाला, “गवताची एक एक काडी बोटांनीं मोडतां येते, तोडतां येते, फोडतां येते, पिंजतां येते. परंतु त्यांचा एक सोल वळला असतां त्या सोलानें मदोन्मत्त हत्ती देखील जखडून बांधतां येतो, आणि त्या गवताच्या दोरापुढें हत्तीची मात्रा चालत नाहीं. त्याप्रमाणें आपण सर्व हिंदू लोक मत्सर सोडून देऊन एक झालों, तर ह्या आपल्या जुटीपुढें मुसलमानांना मान वांकवावी लागेल. गवताच्या काड्या जुळवून त्या वळून त्यांचा दोर करावयाला मनुष्य असला पाहिजे. हिंदूंनीं आपली जूट करून घ्यावयाला तयार असलें पाहिजे. एकाचें तोंड पूर्वेकडे, एकाचें तोंड पश्चिमेकडे, अशानें कार्यभाग व्हावयाचा नाहीं.”

धोंडीबा म्हणाला, “हें खरें आहे. आपण मत्सर सोडून दिला पाहिजे, आणि ह्या आबांच्या नेतृत्वाखालीं कामें करावयाला सिद्ध असलें पाहिजे.”

बाजी फसलकर म्हणाला, “अशी जूट जर झाली तर स्वराज्य ही परसांतली भाजी !”

याप्रमाणें जुटीच्या महत्त्वाबद्दल भाषणें झाल्यावर शिवाजी म्हणाला, “धोंडीबाची मुलगी नबाबाच्या तावडींतून कशी सोडवावयाची याचा आपण विचार करूं, आणि आपणा सर्वांना जें योग्य वाटेल तें करूं. धोंडीबा, प्रथम मला तुमच्या केंजळगडासंबंधानें कांहीं माहिती सांगा, मी जी जी माहिती विचारीन ती ती मला द्या. कारण, ती माहिती तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही असणें शक्य नाहीं.”

असें बोलून शिवाजीनें धोंडीबाला अनेक प्रश्न विचारले. एसाजी, तानाजी, बाजी वगैरे लोकांनींही धोंडीबाला प्रश्न विचारले. केंजळगडाच्या नबाबाच्या मुलखाचा

विस्तार किती आहे ? हिंदू लोकांची वस्ती आणि मुसलमान लोकांची वस्ती किती आहे ? खुद्द गडावर हिंदूंची शिरगणती किती आहे आणि मुसलमानांची शिरगणति किती आहे ? गडावरील शिबंदींत किती शिपायी आहेत ? तिरंदाज, गोलंदाज वगैरे किती आहे ? गडाला दरवाजे किती आहेत आणि त्यांच्यावर डुकरमुंब्याचा मारा करतां येईल किंवा नाहीं ? गडावर नोकर आणि अधिकारी यांच्या मनांत नबाबाविषयीं कितपत बेदिली आहे ? कवाईत रोजच्यारोज करविली जाते काय ? तसेंच गडाच्या पृष्ठभागाचा किती मोठा विस्तार आहे ? त्यांत नबाबाचा राहता वाडा कोणच्या भागीं आहे ? अंमलदारांचे वाडे कोठें कोठें आहेत ? तटाची भिंत किती उंच, जाडी आणि कोणत्या द्रव्याची आहे ? त्यांत भगदाडें कोठें कोठें आहेत ? तटबंदीच्या आंत मोठे वृक्ष कोणकोणचे आणि कोठें कोठें आहेत ? गडांत विहिरी, तळीं, वगैरे कोठें कोठें आहेत ? केंजळगडावर माणसांना आणि जनावरांना किती दिवस पुरण्याइतकी अन्नसामग्री आहे, आणि आपण किती दिवस वेढा दिला तर नबाब टिकाव धरूं शकेल ?

हे आणि अशा सारखे प्रश्न शिवाजीनें आणि त्याच्या तीन मित्रांनीं धोंडीबाला विचारले. धोंडीबानें त्यांचीं उत्तरें स्पष्ट अशा शब्दांनीं दिलीं. कांहीं प्रश्न असे होते कीं ते शिवाजी कां किंवा कोणच्या धोरणानें विचारीत आहे हें धोंडीबाला समजत नव्हतें, तथापि तो त्या प्रश्नांचीं उत्तरें तपशीलवार देत होता.

येणेंप्रमाणें शिवाजीनें केंजळगडासंबंधानें सर्व माहिती विचारून घेतल्यावर त्यानें घटकाभर आपल्या मनाशीं शांतपणें विचार केला. त्याच्या मनाचा कांहीं निश्चय ठरल्यावर तो सर्वांना म्हणाला, “ मित्रहो, माझा बेत काय तो तुम्हाला सांगतों. त्या बेतांत धोका वाटत असल्यास सांगा. कोणच्या क्रमानें आपण काय काय गोष्टी करावयाच्या तें मी सांगतों, ऐका.”

सर्व लोक सावधान चित्तानें शिवाजीचा कार्यक्रम ऐकावयाला सिद्ध झाले. हा कार्यक्रम एकंदरीनें सर्वांस समंजसपणाचा वाटला. कित्येक बारीक सारिक बाबतींसंबंधानें थोडीशी वाटाघाट झाल्यानंतर एक नक्की कार्यक्रम सर्वांनुमतें पसंत ठरला. तो येणेंप्रमाणें—

१ अरुंधतीला मुक्त करा, आणि हें पत्र घेऊन येणाऱ्या इसमाबरोबर तिची रवानगी करून द्या, अशा अर्थाच्या विनंतीचा अर्ज धोंडीबानें नबाबाला पाठवावा. हा अर्ज आजच्या आजच सिताराम ह्या नांवाच्या इसमाच्या हातीं नबाबाकडे रवाना करावा.

२ आज गुरुवार आहे. आज आपण आपल्या मित्रमंडळींकडे जासूद रवाना करावे आणि त्यांना आपआपल्या वीरगड्यांना घेऊन पुढच्या गुरुवारीं केंजळगडाच्या सरदद्दीवर हजर व्हावें अशी विनंती करावी.

३. बाजी फसलकर यानें दहा वीर आपल्याबरोबर घेऊन केंजळगडाकडे रवाना व्हावें. त्यानें नबाबाच्या मुलखांत जितकें खोल जाणें शक्य आहे तितकें खोल जावें. केंजळगडाची बाहेरून जितकी तपासणी करतां येईल तितकी करावी, आणि कोणच्या ठिकाणीं वराती तटबंदीच्या आंत फेकणें सोईचें आणि बिन धोक्याचें आहे हें ठरवावें.

४. येथें असलेल्या वीरांनीं तीन दिवस वरातींवरून चढण्याच्या कामाचा अभ्यास करावा. शनिवारीं सर्वांनीं केंजळगडाकडे रवाना व्हावें आणि गुरुवारीं संध्याकाळीं नबाबाच्या हद्दीवर हजर व्हावें. तिकडे जाणें तें लहान लहान तुकड्या करून जावें. सर्वांनीं एका घोळक्यानें जाऊं नये.

५. आपल्याबरोबर आपण वीस वराती घ्याव्या.

६. आपण वरातींच्या साधनानें केंजळगडांत प्रवेश करणार आहों, आणि अमुक दिवशीं प्रवेश करणार आहों, ही गोष्ट येथें हजर असलेल्या माणसांशिवाय दुसऱ्या कोणालाही कळविण्यांत येऊं नये.

७. नबाबाचे पांच अधिकारी आपल्या तावडींत सांपडले आहेत ही गोष्ट सध्या बाहेर फुटूं देऊं नये.

८. भोपाळगडावर ठेवलेली दोनशें शिपायांची फालतू शिबंदी आपल्या कामासाठीं आपण बोलवावी आणि त्या शिबंदीनेंही केंजळगडाच्या पायथ्याशीं गुरुवारीं संध्याकाळीं हजर राहावें, अशी सोनाजी बिन निळोबा समर्थ गडकरी त्यांना सूचना द्यावी.

९. येणेंप्रमाणें तेथील सगळ्या देशभक्तांचा विचार ठरल्यावर सिताराम ह्या नांवाच्या एका हुशार मावळ्याला नबाबाकडे पत्र देऊन रवाना करण्यांत आलें. केंजळगडावर कोंडीबाला शक्य असल्यास भेट असें त्याला धोंडीबानें सुचवून ठेविलें.

सारणगांवच्या जानोजीराव पाटलाकडे, कोंडणी गांवच्या पांडोबा शिकलगाराकडे, सिंहोलीच्या रामराव देशमुखाकडे, नांदेडच्या महेश्वररावाकडे, भोपाळगडाच्या गडकऱ्याकडे, हुशार हुशार असे मावळे रवाना करण्यांत आले.

वर सांगितल्याप्रमाणें ह्या देशभक्तांनीं जें कांहीं त्या दिवशीं करावयाचें होतें तें केलें. मग ते सर्वजण पुणें शहरांत हिंडावयाला गेले.

केंजळगडावर हल्ला करून नबाबाच्या तावडींतून अरुंधतीला सोडविण्याचें काम एका आठवड्यानंतर व्हावयाचें ठरलें म्हणून पुंडरीकाला दुःख वाटलें. अरुंधतीविषयीं त्याच्या मनांत आपलेपणा उत्पन्न झालेला होता; इतकेंच नव्हे तर ती त्याला प्रिय झालेली होती आणि म्हणून तिला सोडविण्याचें काम जितक्या लवकर केलें जाईल तितकें चांगलें, त्या कामीं एक एक दिवसाचा उशीर म्हणजे नबाब तिची करीत असलेल्या गांजणुकींत एक एक दिवसाची भर, असें भय त्याला वाटत होतें. परंतु केंजळगडावर हल्ला करावयाचा दिवस ठरविणें हें त्याच्या हातचें नव्हतें; म्हणून पुढच्या गुरुवारपर्यंत धीर धरून राहणें त्याला भाग होतें. परंतु तो पुढचा गुरुवार केव्हां येतो असें त्याला होऊन गेलें. ह्या मनांतील चिंतेचा, अधीरपणाचा आणि अस्वस्थतेचा परिणाम त्याच्या मुद्रेवर, संभाषणावर आणि वर्तनावर होत होता; पण तो कोणाच्याही विशेषसा लक्ष्यांत आला नाहीं.

हें प्रकरण समाप्त करावयाच्या अगोदर वाचकांना येथेंच हें सांगून ठेवणें सोयीचें आहे कीं सिताराम,—जो धोंडीबाचा अर्ज नबाबाकडे पोंचवावयासाठीं निघाला होता तो,—नबाबाकडून नकारात्मक उत्तर घेऊन तीन दिवसांनीं परत पुण्याला आला. तेव्हां अरुंधतीला सोडविण्यासाठीं केंजळगडावर हल्ला करण्याशिवाय दुसरा कांहीं मार्ग शिवाजी वगैरे देशभक्तांना राहिला नाहीं. ह्या देशभक्तांनीं आपली सर्व तयारी ताबडतोब केली, आणि त्यांनीं केंजळगडाची वाट धरली, आणि ते ठरलेल्या दिवशीं केंजळगडाच्या सरहद्दीवर येऊन दाखल झाले.

---

## प्रकरण २४ वें.

# अरुंधती आणि फातिमा.

आज मार्गशीर्ष वद्य अमावास्या असून आठवड्याचा वार गुरुवार हा होता. हाच दिवस शिवाजी वगैरे देशभक्तांनीं केंजळगडावर हल्ला करावयासाठीं म्हणून मुकर्रर करून ठेवला होता.

ह्या दिवसाच्या सकाळपासून ठिकठिकाणचे देशभक्त केंजळगडाच्या आसमंतांत येऊन आपण आल्याची खबर शिवाजीकडे पोंचती करूं लागले. सारणगांवचा

जानोजीराव पाटील पन्नास वीर घेऊन दीड प्रहर दिवसास आला आणि ती वर्दी शिवाजीला देण्यांत आली. तसेंच कोंडणीगांवचा पांडोबा शिकलगार पाऊणशें वीर घेऊन आला. त्यानें आपल्याबरोबर स्वतांच्या कारागिरीचीं अनेक शस्त्रास्त्रें आणिलीं होतीं. सिंहोलीचा रामराव देशमुख दोनशें वीरांसह आला. नांदेडचा महेश्वर आपल्या गांवच्या पन्नास वीरांना घेऊन हजर झाला. भोपाळगडावर प्रसंगीं उपयोगाला यावी म्हणून जी दोनशें वीरांची शिबंदी ठेवण्यांत आली होती, तीही शिवाजीच्या आज्ञेवरून येऊन दाखल झाली. तसेंच पुणें प्रांतांतील ठिकठिकाणचे एक हजार वीर येऊन दाखल झाले.

हे सर्व वीर तारक आणि मारक अशा शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन आलेले होते. सर्वांचीं अंतःकरणें मुसलमानी जुलमानें होरपळून गेलेलीं होतीं. सर्व वीरांचीं अंतःकरणें देशप्रीतीनें उचंबळत होतीं. सर्व वीर स्वराज्यस्थापनेच्या कामीं आपल्या वांट्याला कांहीं तरी पुण्याचा अंश यावा अशी इच्छा करणारे होते. सर्व वीर देशासाठीं आत्मयज्ञ करावयाला सिद्ध झालेले होते. एकाही वीराच्या हृदयांत मत्सराचा किडा वळवळत नव्हता. अमुक मनुष्य माझ्या इतक्याच पराक्रमाचा असून त्याला माझ्यावर नायक कां नेमिलें असा प्रश्न एकाही वीराला असंतुष्ट करीत नव्हता. हे सर्व वीर शुद्ध देशप्रीतीनें प्रेरित झालेले होते. सर्व वीरांना त्यांच्या वडील माणसांनीं आणि वयोवृद्ध मित्रांनीं आणि गांवकऱ्यांनीं ह्या कामगिरीवर जाण्याची आज्ञा, किंवा अनुज्ञा किंवा सल्ला किंवा भर दिलेली होती. हूडपणानें एकही इसम आलेला नव्हता, तर उलटपक्षीं देशहिताचें पवित्र कार्य करावयाला आलेला होता. ह्या वीरांत रडतराऊत असा एकही इसम नव्हता. हे सर्व वीर त्या काळचीं तालमीचीं कामें आणि मर्दुमकीचीं कामें करण्यांत पटाईत होते.

शिवाजीच्या काळीं मुसलमानी रियासत जितकी नीच होती, तितकी नीच रियासत जगाच्या इतिहासांत अनेक ठिकाणीं आढळेल, परंतु शिवाजीच्या काळीं मराठ्यांची देशासाठीं जितकी पवित्र आणि अभेद्य जूट झाली, तितकी पवित्र आणि अभेद्य जूट जगाच्या इतिहासांत कोठेंही आढळणार नाहीं ! असो.

सर्व वीर मध्यान्हाच्या सुमारास येऊन पोंचले. त्यांची वर्दी शिवाजीकडे आली. हे वीर केंजळगडाच्या आसपास पसरलेले होते. एके ठिकाणींच त्यांनीं तळ दिला नव्हता. कोणी झाडा खालीं, कोणी देवळांत, कोणी गुहांत, कोणी दऱ्यांत उतरलेले होते. केंजळगडापासून पांच सहा कोसांच्या प्रदेशावर हे दोन हजार वीर

पांगलेले असल्याकारणानें त्यांच्या उद्देशासंबंधानें कोणाही तिऱ्हाइताला यत्किंचित्सुद्धां संशय येण्याला जागा नव्हती.

आपल्या संकल्पाप्रमाणें सर्व कांहीं सिद्धता झालेली पाहून शिवाजीला समाधान वाटलें. मग त्यानें आणि त्याच्या मित्रांनीं केंजळगडाच्या सभोंवतालच्या प्रदेशाची टेहळणी केली. कोणच्या कामाला कोणची जागा सोयीची हें ठरविण्यांत आलें; तसेंच कोणच्या कामाला कोणी कोणी, कशी कशी, आणि केव्हां केव्हां, आणि कोणकोणच्या क्रमानें सुरवात करावयाची, हेंही ठरविण्यांत आलें, आणि त्या त्या माणसांना तशा तशा अर्थांच्या सूचना देण्यांत आल्या. इशारतीच्या शिळीही ठरविण्यांत आल्या. केव्हांही, कोणाचाही, कोणत्याही कामीं घोटाळा न व्हावा, म्हणून जें जें कांहीं करणें जरूर होतें, तें तें सर्व करण्यांत आलें.

येणेंप्रमाणें ह्या देशभक्तांचीं कामें गडाच्या बाहेर चाललेलीं असतां त्याच वेळीं खुद्द केंजळगडांत काय वृत्तांत घडत होता हें आपण पाहूं.

अरुंधतीला केंजळगडावरील चित्रांच्या महालांत नबाबानें कोंडून ठेविलें, ह्या गोष्टीला आजचा बारावा दिवस. आमचे वाचक आम्हाला विचारतील कीं ह्या बारा दिवसांत अरुंधतीचा दिनक्रम कसा होता ? ह्यावर आम्हीं त्यांना असें सांगतों कीं, अरुंधतीचा दिनक्रम सर्व दिवसांचा सारखाच होता. सकाळीं निजून उठल्यावर पंचधावनाच्या खोलींत जाऊन पंचधावन करावें, फडताळांतील वाटेल तें सणंग नेसावें, दुपारचें जेवण एक मराठे जातीचा सतरा अठरा वर्षांचा मुलगा फातिमाबरोबर येई तो आणी तें जेवण जेवावें, मग तो मुलगा त्या महालांतून गेल्यावर फातिमेचा पापमार्गाकडे वळविण्यासाठीं केलेला उपदेश तिरस्कारपूर्वक ऐकावा, फातिमा निघून गेल्यावर आपल्या स्वतांच्या आणि आईबापांच्या स्थितीसंबंधानें विचार करावा; मग संध्याकाळचें जेवण झाल्यावर विचार करीत करीत झोपीं जावें, असा अरुंधतीचा दिनक्रम होता. त्यांत कधींच कांहीं बदल झाला नाहीं. बदल झाला तर तो इतक्याच पुरता असे कीं कधीं तिला आपल्या आणि आईबापांच्या स्थितीसंबंधानें अधिक दुःख व्हावें आणि कधीं कमी व्हावें, फातिमेचा कधीं कमी तिरस्कार करावा कधीं ज्यास्ती करावा, जेवण कधीं रुचीनें जेवावें कधीं अरुचीनें जेवावें. याशिवाय दुसरा कांहीं बदल तिच्या दिनक्रमांत होत नसे.

नबाबसाहेबांची अशी आशा होती कीं आपलें वैभव पाहून अरुंधती आपणावर लुब्ध होऊन पडेल आणि आपल्या जनानखान्यांत राहावयास कबूल होईल. ही त्यांची आशा सफल होण्याचा त्यांना कांहीं रंग दिसेना. अरुंधती आज आप-

णाला भेटीला बोलवील, उद्यां बोलवील, परवां बोलवील, अशी नबाबसाहेबांना आशा वाटत होती, परंतु निराशेंत त्यांचे दिवसांमागून दिवस जात चालले होते.

असें होतां होतां नबाबसाहेब अधीर होत चालले. त्यांच्यानें विलंब सहन करवेना. म्हणून त्यांनीं आज म्हणजे गुरुवारीं फातिमेची झाडंपट्टी काढण्यासाठीं तिला आपल्यासमोर बोलावून आणविलें आणि तिच्यावर यथेच्छ तोंडसुख घेतलें. तेव्हां ती हात जोडून नम्रपणानें म्हणाली, "खाविंद, अरुंधतीचें मन वळविण्याचा प्रयत्न मी रोज करतें, पण काय करूं ? ती पोरगी कांहीं केल्या भाळत नाहीं. ती म्हणते पापमार्गानें चालून स्वर्गांतील सुखें मिळत असलीं तरी तीं तुच्छ होत, आणि पुण्यमार्गानें चालून नरकांतल्या सारखीं दुःखें जरी भोगावीं लागत असलीं तरी तीं सह्य होत. ती म्हणते आमचा हिंदू धर्मच चांगला आहे. आमच्याच चालीरीती चांगल्या आहेत. आम्ही हिंदुत्व कायम राखून दारिद्र्यांतही सुखानें राहूं, पण हिंदुत्वाचा त्याग करून श्रीमंतीचे विलास भोगावयाला कधींही तयार होणार नाहीं. खाविंद, ती पोरगी माझा तिरस्कार करते; इतकेंच नव्हे, तर आपलाही तिरस्कार करते. ती पोरगी गुणागोविंदानें आपणाला वश होईल असें लक्षण दिसत नाहीं. तिच्यापुढें मी तर हात टेकले ! आजपर्यंत मी शेकडों पोरींचीं मनें वळविलीं आहेत. त्या पोरी आपल्या बाहुपाशांत येऊन पडतील अशा रीतीनें त्यांचीं मनें वळविलीं आहेत; पण ह्या अरुंधतीपुढें माझा कांहीं इलाज चालत नाहीं ! "

तेव्हां नबाबसाहेब फातिमेला म्हणाले, "अरुंधतीचें मन वळविण्याचा आज पुन्हां प्रयत्न कर. ती आपखुषीनें आज माझ्या बाहुपाशांत येईल असें कर. आणि तिला असें बजाव कीं ती आजच आपखुषीनें आली नाहीं तर मी आज रात्रीं तिच्यावर जबरदस्ती करीन. जा आणि तुझ्या प्रयत्नांची शिकस्त कर."

याप्रमाणें नबाबसाहेबांनीं फातिमेची ह्या पापमय कामगिरीवर रवानगी करून दिली; तेव्हां ती पुन्हां अरुंधतीकडे जावयाला निघाली. आज आपण अरुंधतीपुढें आपलें वक्तृत्व दाखवूं, ती नबाबाच्या इच्छेला अनुकूल होईलच अशा रीतीनें आपण तिला उपदेश करूं आणि तिचें मन वळवूं, अशा धमकीनें फातिमा नबाबसाहेबांच्या दिवाणखान्यांतून बाहेर पडली व चित्रांच्या महालाकडे निघाली.

[ २ ]

नित्याच्या क्रमाप्रमाणें आज अरुंधतीचें दुपारचें जेवण झालें होतें. फातिमा नित्याच्या क्रमाप्रमाणें पापमार्गाचें भपकेदार वर्णन करून अरुंधतीचें मन त्या

मार्गाकडे वळविण्याचा निष्फळ प्रयत्न करून आणि तिचा तिरस्कार ही बक्षीशी संपादन करून त्या महालांतून निघून गेली होती. अरुंधती पलंगावर बसून नित्याप्रमाणें मनांत चिंतामय आणि दुःखमय विचार घोळीत बसली होती. ह्या विचारांचा ठसा तिच्या मुद्रेवर उमटलेला होता. तिच्या मनांत असंख्य प्रश्न उद्भवत होते व त्यांपैकीं एकाचेंही उत्तर तिला सुचत नव्हतें. तिच्या मनांत अनेक विचार आणि प्रश्न एकदम उद्भवत होते, ते एकमेकांत मिसळत होते. त्यांची एकमेकांत जणों गुंतागुंत झालेली होती. ह्या तिच्या मनाच्या विचित्र आणि संमिश्र व्यापाराचें दिग्दर्शन करावयाचें झाल्यास तें साधारणपणें पुढें दिल्याप्रमाणें करावें लागेल.

"नबाबसाहेब मला येथें किती दिवस कोंडून ठेवतील ? मला जबरदस्तीनें बाटवितील काय ? माझ्यावर ते बळजबरी करावयाला येतील काय ? तो नबाब माणूस नव्हे, तो जनावर आहे, तो राक्षस आहे, तो दैत्य आहे, तो सैतान आहे, देव त्याला खचित दण्ड करील ! माझे बाबा ह्या गडांतून कोणच्या कारणानें बाहेर पडले असतील आणि ते रस्त्यावर उघडे बोडके कां उभे राहिले होते ? सागर गांवापाशीं मला जाफरनें गिरफदार केलें, तसें आईला आणि गजानन भाऊंना त्याच्या साथीदारांनीं गिरफदार केलें असेल काय ? गिरफदार केलें असलें तर त्यांना ह्याच गडावर दुसरीकडे कोठें तरी ठेवलें असेल ? किंवा ते जाफरचे साथीदार आईला आणि गजाननभाऊंना न पकडतां परत गेले असतील ? माझी आई आणि गजाननभाऊ त्या अडचणीच्या वाटेंतून पुढें गेलीं. त्यांच्या पाठोपाठ मी येत नाहीं असें पाहून माझ्या शोधासाठीं तीं परतलीं असतील काय ? किंवा माझी आशा सोडून पुढें विजापुरला गेलीं असतील काय ? बाबा, आई, वगैरे लोक माझ्या सुटकेसाठीं कांहीं प्रयत्न करीत असतील काय ? मी गिरफदार केली गेलें आहे ही गोष्ट नांदेडच्या माणसांना एव्हांना कळली असेल काय ? तीं माणसें माझ्या सुटकेसाठीं खटपट करीत असतील काय ? छेः ! मी कोण त्यांची तर तीं माझ्यासाठीं तसदी घेतील ? पण घेतीलही ! कारण तिन्हीही माणसें फार फार उपकारशील आहेत. आम्ही त्यांच्या येथें मुक्कामाला उतरलों होतों, तेव्हां त्यांनीं आमची किती तरी बरदास्त राखली ! इतकेंच नव्हे तर ते नाना आमच्याबरोबर जंगलांतून आम्ही पार पडे तोंपर्यंत आमच्याबरोबर आले आणि जंगलांत तो चांडाळ मुसलमान माझा हात धरावयाला सरसावत होता, त्याच्या मणगटावर तरवारीचा वार त्यांनीं केला आणि त्या चांडाळाचा स्पर्श मला होऊं दिला नाहीं.

हे नानांचे मजवर थोडे का उपकार झाले आहेत ? नाना खरोखर शूर आहेत, प्रसंगावधानी आहेत, उपकारशील आहेत, मर्यादशील आहेत ! माझ्याशीं बोलतांना ते किती मोकळेपणानें बोलत होते ! किती अदबीनें बोलत होते ! आणि त्यांचा चेहेरा तरी किती मोहक, शरीराचीं गात्रें किती प्रमाणशुद्ध, त्यांचा आवाज तरी किती गोड ! नाना बाहेरून दिसावयाला जसे चांगले आहेत तसे त्यांचे अंतर्यामचे गुणदेखील फार चांगले आहेत. ती मूर्ति अंतर्बाह्य रमणीय आहे. धन्य ते आईबाप कीं ज्यांच्या पोटीं हें बालरत्न जन्म पावलें ! नाना, तुम्ही मला पुन्हां कधीं भेटाल काय ? पुन्हां तुमचा आणि माझा सहवास घडेल काय ? ”

अरुंधतीचे स्वगत विचार चालतां चालतां ते नानापर्यंत येऊन स्थिरावले. तिच्या विचारांचे अन्य विषय आपल्या आपण विलुप्त झाले आणि नाना हा तिच्या विचारांचें केंद्र बनून राहिला ! त्याच्या बाह्य रूपाची मनोहरता आणि त्याच्या शौर्यधैर्यादि सद्गुणांची आकर्षकता, ह्यांचें चिंतन करण्यांत ती तन्मय होऊन गेली, आणि तिला तिच्या दुःखमय स्थितीचा विसर पडला ! ती नानाचें एकाग्र चित्तानें ध्यान करीत राहिली ! नानाकडे तिची तंद्री लागली !

याप्रमाणें नानाच्या बाह्य रूपाचें आणि अंतःस्वरूपाचें चिंतन करण्यांत तिचा किती वेळ गेला ह्याचें तिला भान राहिलें नाहीं. तों तिच्या महालाचें दार उघडून फातिमा तिच्यापुढें येऊन उभी राहिली. तिच्या येण्याची चाहूल अरुंधतीला लागल्यामुळें तिनें डोळे उघडून पाहिलें तों आपल्यापुढें फातिमा उभी ! गोड विचारांत तिची तंद्री लागली असतां ही मूर्तिमंत हडळ फातिमा पाहातांच अरुंधतीला रागाचा झटका आला, आणि ती तिला म्हणाली, “ कांगे फातिमे, पुन्हा इकडे कशाला आलीस ? मघाशीं माझ्यापुढें चर्पटपंजरी केलीस तेवढी तुला पुरेशी वाटत नाहीं म्हणून तिच्यांत भर घालावयाला पुन्हा मजकडे आली आहेस कीं काय ?”

फातिमा खजील न होतां शांतपणानें म्हणाली, “ बाळ, माझा असा राग करूं नको ! मी तुला तुझ्या कल्याणाचीच गोष्ट सांगणार आहें !”

अरुंधती रागानें म्हणाली, “ आग लागो तुझ्या कल्याणाच्या गोष्टीला ! जा येथून !”

फातिमा म्हणाली, “ नबाबसाहेबांच्या इच्छेला मान देऊन तूं जर त्यांना सुख दिलेंस, तर तेही तुला सुख देतील. तुला मूल्यवान् सणंगें नेसावयाला

मिळतील, तुला हिऱ्यामोत्यांचे दागिने अंगावर घालावयाला मिळतील, तुला उंची उंची खाद्यें खावयाला आणि उंची उंची पेयें प्यावयाला मिळतील, तुला हवे तितके पैसे खर्चावयाला मिळतील. तुझ्या बापाचें जन्माचें दारिद्य फिटेल. बोल, आज नबाबसाहेबांना तूं स्वर्गीय सुख चाखविशील काय ? तूं कबूल आहेस असा त्यांना तुझा निरोप सांगूं काय ? बोल !"

तेव्हां अरुंधती क्रोधानें म्हणाली, "फातिमे, नबाबसाहेबांच्या सहवासानें जें सुख होईल असें तूं म्हणतेस तें सुख नाहीं. तें दुःख आहे, तें पाप आहे, तो नरक आहे. तें सुख मला नको आहे. मूल्यवान् सणंगांना आग लागो ! हिऱ्यामोत्यांचे दागिने चुलींत जावोत ! उंची उंची खाद्यें कुतऱ्यांच्या पोटांत जावोत ! उंची उंची पेयें डुकराच्या पोटांत जावोत ! मोहरा आणि पुतळ्या उकिरड्यांत पडोत ! मला नबाबसाहेबांचें कांहीं कांहीं म्हणतां कांहींदेखील नको ! माझा हा निरोप जाऊन नबाबसाहेबांना सांग. जा येथून ! काळें कर ! जा !"

हे अरुंधतीचे रागाचे, तिरस्काराचे, तुच्छतेचे शब्द ऐकतांच फातिमा रागानें लाल झाली आणि म्हणाली, "पोरी, कुत्र्याला हाडें चघळावयाला आवडतात, खीर आवडत नाहीं; डुकराला शेण खावयाला आवडतें, मालपुवा आवडत नाहीं; गाढवाला उकिरडे खावयाला आवडतात, पोळी आवडत नाहीं; कावळ्याला जखमांतील पू आवडतो, बासुंदी आवडत नाहीं; त्याप्रमाणें तुला भिकार झोपडींत राहावयाला, शिळ्या भाकऱ्यांच्या खापरखुंट्या खावयाला, मोऱ्यांतलें पाणी प्यावयाला, उवा पडलेल्या आणि ढेंकणांनीं बुजबुजणाऱ्या गोधड्या हांतरा पांघरावयाला आवडतात; आणि उंच महालांत राहाणें, पक्वान्नें खाणें, सरबतें पिणें, मखमालीच्या आणि रेशमाच्या गाद्यांवर निजणें आवडत नाहीं ! तूं खरी कपाळकरंटी पोरगी ! पायाशीं येऊन पडलेल्या लक्ष्मीला तूं लाथाडतेस ती तूं कपाळकरंटीच खरी ! पण पोरी, लकडीवांचून मकडी वळत नाहीं म्हणतात तें खरें आहे. तूं गुण्यागोविंदानें नबाबसाहेबांस वश होत नाहींस तर तुझ्यावर सक्तीच केली पाहिजे; मी आतांच जाऊन नबाबसाहेबांना तुझा हट्ट कळवितें. ते आज रात्रीं ह्या महालांत येतील, तुझ्यावर जबरदस्ती करतील आणि तुझा तमाशा पहावयाला मी जवळ उभी राहीन !"

हें फातिमेचें भाषण ऐकून अरुंधती खरखदां हंसली आणि म्हणाली, "हडळी, सन्मार्गाचा वाली जर माझा खंडोबा असला, आणि पातिव्रत्याच्या व्रताची कन-

वाळू जर माझी अंबाबाई असली, तर तूं माझा तमाशा पाहाण्याच्या ऐवजीं मीच तुझा तमाशा पाहीन ! याद राखून अस ! जा ! ”

हें अरुंधतीचें आवेशयुक्त भाषण ऐकून फातिमा रागानें पाय आपटीत त्या महालांतून निघून गेली. महालाच्या दाराचीं दोन्हीं पानें धडंगदिशीं तिनें लावून घेतलीं. झालेलें वर्तमान नबाबसाहेबांच्या कानावर घालण्याकरतां आणि आजच्या रात्रींच अरुंधतीला भ्रष्ट करावयाची त्याला भर द्यावयाकरतां ती तिकडे पाय हापटीत निघून गेली.

‘मी तुला नबाबसाहेबांकडून आजच्याच रात्रीं भ्रष्ट करवीन आणि तुझा तमाशा पहावयाला मी हजर राहीन,’ अशी फातिमेनें धमकी दिली होती ती ऐकून अरुंधती यत्किंचित् भ्याली नाहीं. कारण, केव्हां नाहीं केव्हां तरी त्या दिव्यांतून आपणास जावें लागेल हें ती जाणूनच होती. तिला त्या धमकीनें भीति वाटली नाहीं. पण त्या दिव्यांतून निभावून जाण्याचा जो तिनें निर्धार केला होता, तो मात्र ह्या धमकीनें दृढ झाला.

---

## प्रकरण २५ वें.

# गडामध्यें मराठे वीरांचा प्रवेश.

अमावास्येचा दिवस. दीड प्रहर रात्र चढली आहे. पशुपक्षी आपआपल्या निद्रास्थानीं विश्रांति घेत पडले आहेत. आकाशकटाहांत निबिडतम अंधकार कोंदून राहिला आहे. परंतु चांदण्यांची लिकलिक चालली आहे, आणि आकाशांत ढग नसल्या कारणानें ताऱ्यांच्या स्थितीवरून रात्र किती चढली आहे हें तज्ज्ञांना कळण्याजोगें आहे. केंजळगडाच्या आसमंतात भागीं गहनतम शांतता नांदत आहे.

अशा ह्या समयीं महादेवाच्या डोंगराच्या पायथ्याशीं आणि मांधारदेव सुळक्याखालीं लंबरेषेंत पुष्कळ मराठे वीर जमले आहेत. त्यांना त्या खडकाळ जमिनीवर जें कांहीं कर्तव्य करावयाचें आहे तें दुपारींच ठरलेलें असल्याकारणानें त्याचीं बोलणींही चाललेलीं नाहींत. तथापि मधून मधून थोडीशी कुजबूज मात्र चालत आहे. ह्या भूपृष्ठावर जें कांहीं कर्तव्य ह्या मराठे देशभक्तांना करावयाचें आहे, त्याची सर्व सामग्री त्यांनीं तेथें आणून ठेविली आहे. पांच पंचवीस वरातींचीं वेटोळीं तेथें आणून ठेविलेलीं आहेत. विशिष्ट भागीं गवताचे ढीग केलेले आहेत.

ह्या मराठे देशभक्तांनीं दिवसाच्या प्रकाशांत त्या प्रदेशाचें पूर्णपणें निरीक्षण करून ठेवलेलें असल्या कारणानें त्यांना ह्या अंधकारामुळें कांहीं अडचण भासत नाहीं.

हे मराठे देशभक्त योग्य समयाची वाट पहात तेथें उभे होते. हा योग्य समय प्राप्त झाला असें त्यांच्या मतानें ठरलें, तेव्हां तानाजीनें एका वरातीचा आंकडा हातांत घेऊन आणि मांधारदेव सुळक्यावरील औदुंबराच्या वृक्षाच्या फांदीचा नेम धरून तो वरातीचा आंकडा फेंकला. परंतु तो फांदीच्या खालीं दोन वावांइतकाच जाऊन खालीं पडला. तेव्हां तानाजीनें पुन्हा अवसानांत आंकडा फेंकला. तो पहिल्या खेपेइतकाच वर गेला आणि खालीं पडला. त्यानें पुन्हा तो आंकडा फेंकला, पण तो पहिल्या दोन खेपांप्रमाणें ह्याही खेपेला खालींच पडला. तानाजी हा वरातीवरून चढण्याच्या कामीं पटाईत होता, तसा आंकडा फेंकण्याच्या कामीं नव्हता. मग दुसऱ्या एका वीरानें पुढें होऊन आंकडा फेंकला, पण त्याला यश आलें नाहीं. तेव्हां सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. वेळ जात चालला आणि आंकडा तर फांदीला अडकेना. मग कोंडाणीच्या पांडोबा शिकलगाराला तेथें बोलावून आणण्यांत आलें. तो सर्व गड्यांत अत्यंत बळकट अशी सर्वांची समजून असे. ह्या पांडोबाच्या शक्तीची अशी दंतकथा चालत आली होती कीं त्यानें एकदा लिंबोणीच्या झाडाच्या हातभर व्यासाच्या खोडांत आपला भाला खचदिशीं मारला. तो त्या खोडांत शिरून पलीकडच्या बाजूनें दोन बोटें बाहेर निघाला.

ही पांडोबाच्या संबंधाची दंतकथा बऱ्याच गड्यांना ठाऊक होती म्हणून त्याला आंकडा फेंकावयासाठीं तेथें बोलावून आणण्यांत आलें.

असो. पांडोबा येतांच त्यानें फांदीचा नीट नेम धरून अवसानांत आंकडा फांदीवर फेंकला. पण दुर्दैव जणों काय हात धुऊन त्यांच्या पाठीस लागलें होतें असें सर्वांना वाटलें; कारण, आंकडा फांदीला घासून पण न अडकतां खालीं पडला.

हा प्रकार पाहून सर्वांची निराशा झाली. आपणावर सर्वांची मदार असतां आपल्या हातून काम होत नाहीं असें पाहून त्याला फार वाईट वाटलें. पण तो प्रयत्नापासून पराङ्मुख झाला नाहीं. त्यानें आपल्या कुलदैवतांचें मनांत स्मरण केलें. तो म्हणाला, "हे देवी अंबाबाई, हे खंडोबाराया, परदेशी परधर्मी मुसलमानांच्या जाचापासून, उपद्रवापासून, गांजणुकीपासून हिंदू लोकांना सोडविण्याचा आम्ही प्रयत्न आरंभिलेला आहे; ह्या आमच्या प्रयत्नांत जर कांहीं पाप नसेल, जर कांहीं स्वार्थ नसेल, तर आमच्या प्रयत्नाला यश द्या. आम्ही वरातीच्या साधनानें

केंजळगडांत प्रवेश करून नबाबाला रकमेस आणणार आहों. हा आमचा उद्देश जर स्तुत्य असेल, तर वरातीचा आंकडा फांदीला अडकेल असें करा. ''

याप्रमाणें पांडोबानें मनांत खंडोबा आणि अंबाबाई ह्या आपल्या कुलदैवतांची प्रार्थना केली. मग पुन्हां त्यानें हातांत आंकडा घेतला. वर फांदीकडे नजर केली. शरीराचें संस्थान अवसानांत मांडून त्यानें वरातीचा आंकडा खूप जोरानें फेंकला. तो त्यानें इतक्या जोरानें फेंकला कीं तो फांदीवरून काटकोनांत पलीकडे जाऊन एक हात अंतरावर लोंबत राहिला. मग पांडोबानें वरात हळू हळू आणि काळजी-पूर्वक खेंचली. त्यामुळें तो आंकडा वर वर जात चालला. तो फांदीपाशीं येतांच त्याच्या टोकानें फांदी पकडली. मग अर्थात् वरात खेंचली तरी ती खेंचली जाईना.

मग आंकडा पक्का बसला किंवा नाहीं हें अजमावण्यासाठीं पांच गड्यांनीं शक्ति एकवटून पण हिसका न देतां वरात खेंचली. तरी आंकडा फांदीवरून न निसटतां फांदी मात्र चार सहा बोटें खालीं वांकली. ह्यावरून आंकडा पक्का बसला आहे, फांदीही बळकट आहे, वरातीला एका गड्याचा भार खचित सोसेल, अशी सर्वांची खात्री झाली; तेणेंकरून सर्वांना आनंद झाला, आणि पुढील कार्यभाग करावयासाठीं त्यांनीं कांस कसली. प्रथम तानाजीनें वरातीवरून चढून जावें असें पूर्वीं ठरवून ठेवण्यांत आलेलें असल्याकारणानें तो पुढें आला.

तानाजीनें आपला पट्टा दांतांनीं आडवा धरला. पाठीला ढाल लटकावलेली होती तिचे बंध बरोबर आहेत किंवा नाहीं हें त्यानें पाहिलें. मग त्यानें तीरकामठा आणि भाता हे यथास्थानीं आहेत किंवा नाहींत हें पाहिलें. मग पांडोबानें तयार केलेला आंकडा कमरेच्या कमरबंधाला खोचलेला होता तो बरोबर आहे किंवा नाहीं हें त्यानें पाहिलें. त्या आंकड्याला वरात बांधलेली आहे किंवा नाहीं हें त्यानें पाहिलें. सर्व कांहीं पदार्थ यथास्थानीं आहेत अशी त्यानें आपली खात्री करून घेतली. मग सर्वांना "मी जातों, '' असें सांगून आणि मनामध्यें आपल्या सर्व कुलदैवतांचें स्मरण करून त्यानें वरातीला हात घातला. मग जपून आणि तोल न गमावूं देतां तो हातामागून हात चढवीत चढवीत फांदीपर्यंत जाऊन पोंचला. मग फांदीवरून बुंध्यावरून तो जमिनीवर उतरला. त्यांचीं पावलें गडाच्या पठाराच्या जमिनीवर स्थिर टेंकलीं.

ह्या वेळीं गडावर जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतें.

मग तानाजीनें आपल्या कमरबंधांत खोंचलेला आंकडा उपसून काढला. ह्या आंकड्याच्या दुसऱ्या टोंकाच्या कोयंड्याला जी वरात बांधलेली होती, ती वरात त्यानें त्याच झाडाच्या बुंध्याला दोन वेळ गुंडाळून त्याला घट्ट गांठ मारून पक्की बांधली. मग ही वरात विहिरींतून घागर वर ओढतात तशी वर ओढली. तिच्या दुसऱ्या टोंकाला आठ वरातीचीं टोंकें अडकवलेलीं होतीं. हीं आठ टोंकें त्यानें कठड्याच्या भिंतीच्या आंतल्या बाजूला सोयीच्या ठिकाणीं पक्कीं बांधलीं. कांहीं टोंकें झाडांच्या बुंध्यांना आणि कांहीं मोठ्या फत्तरांना बांधलीं. अशा रीतीनें वर चढून यावयाला एकंदर दहा वराती झाल्या. एकावरून तानाजी वर आला होता. दुसरी त्यानें आपल्या कमरेला खोंचून वर ओढून आणली होती, आणि बाकीच्या आठ त्यानें वर शेंदून घेतल्या होत्या. ह्या सर्व वराती पक्क्या बांधल्या गेल्या आहेत, अशी तानाजीनें आपली खात्री करून घेतली. मग त्यानें एका वरातीला सात आठ हांसडे दिले. यावरून खालच्या मंडळींनीं वर सर्व कांहीं यथास्थित आहे, आतां वर चढावयाला कांहीं हरकत नाहीं, असें जाणलें. मग पूर्वीं ठरविण्यांत आल्याप्रमाणें ह्या दहा वरातींवरून दहा गडी चढावयाला सिद्ध झाले. पहिल्या दहा गड्यांत पुंडरीक आणि गजानन होते, हें वाचकांना आम्ही मुद्दाम सांगून ठेवतों. पुणें शहराशेजारच्या पटांगणांत तीन दिवस वरातींवरून चढण्याचा अभ्यास सर्व मावळ्यांनीं केला होता, तसा पुंडरीक आणि गजानन यांनींही केला होता, आणि त्या कामांत ते पटाईत झाले होते.

केंजळगडाच्या नबाबाच्या तावडींत सांपडलेल्या अरुंधतीला सोडविण्याचा समय येतो केव्हां असें पुंडरीकाला होऊन गेलें होतें. तो समय एकदांचा आला. आपण आतां वरातीवरून चढून जाऊं, नबाबाच्या वाड्यांत प्रवेश करूं, प्रत्येक दालन, प्रत्येक खोली शोधूं, अरुंधती कोणत्याही स्थितींत असली तरी आपण तिला हुडकून काढूं, आपण तिचें सांत्वन करूं, आणि तिला तिच्या बापाकडे पोंचवूं, अशा प्रकारचे विचार पुंडरीकाच्या मनांत चाललेले होते. अरुंधतीचा बाप धोंडीबा हा वयस्कर असल्याकारणानें त्यानें वरातीवरून गडांत न शिरतां मोठ्या दरवाजानें गडांत शिरावें असें ठरलेलें होतें. धोंडीबा मोठ्या दरवाजानें गडांत येतो तोंपर्यंत आपण नबाबाच्या वाड्यांत शिरून अरुंधतीला सोडून आणूं आणि तिच्या बापाच्या हवालीं करूं, अशा विचारानें प्रेरित होऊन आणि सर्व शस्त्रास्त्रें यथास्थानीं आहेत अशी आपली खात्री करून घेऊन त्यानें एका वरातीला हात घातला. गजाननानें दुसऱ्या एका वरातीला हात घातला. दुसऱ्या आठ गड्यांनीं बाकीच्या वरातींना हात घातले.

ह्या दहा वरातींवरून हे दहा वीर गडी माकडांप्रमाणें सरसर वर चढूं लागले. एका वरातोवरून चढणारा गडी वर जाऊन पोंचून त्यानें त्या वरातीला इशारतीचा हांसडा देईपर्यंत दुसरा गडी त्या वरातीनें वर चढत नसे हें सांगणें नलगे.

सुमारें दोन तीन घटकांच्या अवधींत ह्या दहा वरातींवरून सुमारें दोनशें वीर वर चढून गेले. प्रत्येकानें, वरातीला हात घालतांना तानाजीप्रमाणें पट्टा दांतांत धरला होता. ढाल, धनुष्य, भाता, हीं पाठीशीं बांधलेलीं होतीं.

हीं सर्व माणसें अगदीं गुपचूपपणें वर आलीं. ह्या वर आलेल्या माणसांत पुंडरीक आणि गजानन ह्यांशिवाय बाजी फसलकर, मुरारी, पुंडरीकाचे मित्र सदाशिव, गोपीनाथ आणि मल्हारी हे होते.

गजाननानें वर आल्याबरोबर आपलीं सगळीं तारक आणि मारक शस्त्रें आणि अस्त्रें यथास्थानीं घेतलीं. मग येईल त्या प्रसंगाला तोंड द्यावयाला सिद्ध होऊन तो तेथून लपत छपत आणि पावलांचा आवाज यत्किंचितही होऊं न देतां कोंडीबाच्या घरापर्यंत गेला. गडावरचा तो पूर्णपणें माहीतगार असल्याकारणानें कोणच्या वाटेनें गेलें असतां धोका कमी हें त्याला चांगलें ठाऊक होतें. तो कोंडीबाच्या घराशीं जाऊन पोंचेपर्यंत त्याला कोणीही माणूस भेटलें नाहीं. या वेळीं गडावरील सर्व माणसें आणि पाहारेकरीसुद्धां डाराडूर निजलेले होते. असो. गजानन थेट कोंडीबाच्या घराशीं गेला. तेथें सावधगिरीनें त्यानें कोंडीबाला उठविलें. मग त्याच्या घरांत शिरून त्यानें कोंडीबाला सर्व वृत्तान्त सांगितला, आणि मराठे गड्यांचा पुढचा बेतही सांगितला. हें गजाननाचें भाषण ऐकून कोंडीबाला अतिशय आनंद झाला आणि तो ह्या देशभक्तांना मदत करावयाला सिद्ध झाला. मग त्यानें आपला भाचा भास्कर यालाही शस्त्रास्त्रांनीं सिद्ध व्हावयाला सांगितलें. भास्कर हा हौशी आणि उत्साही मुलगा असल्याकारणानें त्याला हा लढाईचा प्रसंग महोत्सवाप्रमाणें आनंददायक वाटला. तो तत्काळ शस्त्रास्त्रांनीं सिद्ध होऊन हुकमाची वाट पहात राहिला.

कोंडीबा आणि भास्कर हे मामेभाचे तारक आणि मारक अशा शस्त्रास्त्रांनीं सिद्ध होत्साते गजाननाच्या बरोबर तानाजी उभा होता तिकडे यावयाला निघाले.

हे तिघे गडी येथें येऊन पोंचतात तोंपर्यंत तेथें वरातींवरून चढून गडाच्या पठारावर आलेल्या मावळ्यांची संख्या सुमारें चारशेंच्या वर गेली होती, आणि आणखीही मावळे एकसारखे वर येतच होते.

प्रत्येक मावळा वर आल्याबरोबर आपलीं शस्त्रास्त्रें यथास्थानीं घेऊन लढाईला सिद्ध होऊन तानाजीच्या हुकमाची वाट पाहात होता.

गजानन, भास्कर आणि कोंडीबा, हे तिघे गडाचे माहीतगार तानाजीपाशीं येऊन दाखल होतांच त्यांनीं पुढचा कार्यक्रम ठरविला.

धोंडीबा, तानाजी, आणि शंभर मावळे, यांनीं शिद्दी दरवाजाकडे जाऊन तो उघडा करावा आणि बाहेरून येणाऱ्या मावळयांना गडांत प्रविष्ट करून घ्यावें असें ठरलें.

बाजी फसलकर, गजानन, पुंडरीक आणि शंभर मावळे, यांनीं नबाबाच्या वाड्यांत शिरून नबाबाला गिरफदार करावें असें ठरलें.

तिसऱ्या शंभर मावळयांच्या टोळीनें एसाजी कंक याच्या नेतृत्वाखालीं आणि भास्कराच्या मार्गदर्शकत्वाखालीं दिल्ली दरवाजावर चाल करून जाऊन तो कबज्यांत घेऊन तो उघडून बाहेरच्या मावळे वीरांना गडांत प्रविष्ट करून घ्यावें असें ठरलें.

याप्रमाणें मावळे वीरांच्या तीन टोळ्या सिद्ध झाल्या आणि आपापल्या कामगिरीवर जावयाला निघाल्या. हे सर्व कारभार अति शांत रीतीनें झाल्याकारणानें गडावरील कोणाही माणसाला त्यांची चाहूल लागली नाहीं. कारण, ही तीनशें मंडळी गडावरील ओसाड जागेंत खलबतें करीत होती व ती अगदीं हलक्या आवाजांत बोलत होती. अमावास्येचा निबिडतम अंधेर सर्व कांहीं वस्तूंवर आच्छादन घालीत होता, आणि ती घाणीची जागा असल्याकारणानें तेथें कोणी रखवालदारही ठेवण्यांत आलेला नसे.

असो. वर सांगितल्याप्रमाणें ह्या तीन तुकड्या आपापलीं कर्तव्यें बजावण्यासाठीं तेथून निघाल्या. ह्या तिन्ही तुकड्यांचीं कामें एक समयावच्छेदेंकरून होत होतीं. तीं सारीं एकदम सांगणें शक्य नसल्याकारणानें आम्ही एका एका तुकडीची हकीगत वाचकांना सादर करतों.

---

## प्रकरण २६ वें.

# पहिल्या दोन तुकड्यांची कामगिरी.

मराठे वीरांच्या तीन तुकड्या तीन कामगिऱ्यांवर निघाल्या असें आम्ही मागल्या प्रकरणीं वाचकांना सांगितलें आहे. आतां पहिल्या तुकडीची हकीगत सांगतों.

पहिली तुकडी जी कोंडीबा आणि तानाजी यांच्या नेतृत्वाखालीं शिद्दी दरवाजाकडे रवाना झाली होती, ती त्या दिशेनें गुपचुपपणें चालूं लागली. ही ऐन मध्यरात्रींची वेळ असल्याकारणानें गडावरील सर्व माणसें गाढ निद्रेंत होतीं. जे रखवालदार, पहारेकरी, जागले, गस्तवाले लोक ठिकठिकाणीं स्थापित केलेले असत, त्यांच्या ध्यानीं मनीं स्वप्नींही आजचा प्रकार नसल्याकारणानें ते बहुतेक आपापल्या जागांवर निद्रित झालेले होते. जे कोणी जागे होते, त्यांचें चंदन मावळे गडी तत्काळ उडवीत होते. ह्यामुळें त्यांना कोठेंही विशेष अडथळा न होतां शिद्दी दरवाजा तेव्हांच गांठतां आला.

ह्या दरवाजाच्या देवडीवर सुमारें पंचवीस पहारेकरी नेहमीं ठेवलेले असत. सर्वांनीं कुसुंब्याचें सेवन केलेलें असल्याकारणानें त्यांच्यापैकीं कांहीं धुंदींत येऊन मुडद्याप्रमाणें पडले होते. ज्या कोणाच्या अंगावर निशा चढलेली नव्हती, ते जागे असून पहारे करीत होते. तानाजीचे मावळे ह्या सर्व पहारेकऱ्यांवर तुटून पडले. त्यांनीं सर्व पहारेकऱ्यांस यमसदनाकडे पाठवून दिलें. प्रतिरोध करावयाला आतां कोणी नसल्याकारणानें मावळे वीरांनीं शिद्दी दरवाजाचीं दोन्ही पानें सताड उघडलीं, तों बाहेरच्या बाजूस एसाजी कंक ह्याचे नेतृत्वाखालीं पांचशें मावळे वीर तारक आणि मारक अशा शस्त्रास्त्रांनीं सिद्ध होत्साते उभे होतेच. त्यांनीं एकदम "हरहर महादेव !" अशा अनेकवार प्रचंड गर्जना करून आकाशकटाह जणों काय विदीर्ण करून सोडला !

आतां मात्र गडावरील लोक खडबडून जागे झाले. हा गलबला कसला आहे, ह्या गर्जना कोण करीत आहे, मराठे वीर किती आहेत, ते आंत कसे आले, ते कोणकोणच्या ठिकाणीं पसरलेले आहेत, त्यांनीं कोणकोणच्या जागा काबीज केल्या आहेत, हें गडावरील कोणाही माणसाला कळेना. हा मराठ्यांचा हल्ला गडावर अगदीं अकल्पित रीतीनें झालेला असल्याकारणानें सर्व माणसें घाबरलीं, आणि मनाच्या अशा स्थितींत ते आपलीं हत्यारें जुळवूं लागले. गडावरील पांच मुख्य अधिकारी जाफरखान, हमीदखान, अहमदखान, करीमभाई आणि इस्माएलभाई, हे मराठ्यांच्या ताब्यांत भोपाळगडावर कैदी होते. नबाबसाहेब अरुंधतीच्या समागमाच्या इच्छेनें चित्रांच्या महालांत गेले होते व त्यांना गडावरील सद्यःस्थितीची दादही नव्हती. त्यामुळें शिबंदींतील शिपायांना किंवा गोलंदाजांना किंवा तिरंजांना किंवा रखवालदारांना कोणी नेता नव्हता.

गडावरील सर्व लोक भांबावल्यासारखे होऊन कांहीं लोक जागच्या जागीं उभे होते, कांहीं सैरावैरा धांवत होते, कांहीं महादेवाच्या पठारावरील तटबंदीकडे उतरावयाला धांवले. पण तिकडे उतरावयाच्या सर्व वाटा अरुंद आणि उंच सखल असल्यामुळें आणि त्या मराठे वीरांनीं रोखून धरलेल्या असल्याकारणानें त्याही बंद पडल्या. गडावरील जे कोणी धाडसी लोक मराठे वीरांना प्रतिरोध करावयाला उभे ठाकले, ते एक एकटे असल्याकारणानें जुटीनें वागणाऱ्या मराठे वीरांनीं त्यांना कापून टाकले. सारांश, गडावर जिकडे तिकडे गोंधळ सुरू झाला. मराठे वीरांच्या हल्ल्याला तोंड द्यावयाला गडावर एकही मनुष्य शिल्लक राहिलें नाहीं.

जुटीनें मराठ्यांना प्रतिरोध करावयाला जे कोणी गडावरील लोक सिद्ध होणार होते, त्यांची तयारी व्हावयाला मावळे वीरांनीं त्यांना अवसरच मिळूं दिला नाहीं. शिद्दी दरवाजाच्या रक्षणासाठीं पन्नास मावळे देवडीवर बसून राहिले आणि बाकीचे सुमारें साडेचारशें वीर गडांतील वेगळीं वेगळीं ठिकाणें आपल्या ताब्यांत घेऊं लागले. ताब्यांत घेतलेल्या प्रत्येक ठिकाणाच्या रक्षणासाठीं त्या त्या ठिकाणाच्या महत्त्वाप्रमाणें आणि जोखमीप्रमाणें पन्नास पाऊणशें मावळे लोक तानाजी बसवून ठेवीत होता. अशा रीतीनें तानाजीनें घोड्यांची पागा, वैरणीचें छप्पर, धान्याचीं तीन कोठारें आपल्या ताब्यांत घेतलीं. ताब्यांत घेतलेल्या ह्या ठिकाणांच्या रक्षणार्थ मावळे वीर ठेवतां ठेवतां शेवटीं त्याच्या हाताखालीं सुमारें पंचवीस गडी शिल्लक राहिले. ह्या पंचवीस गड्यांनिशीं तानाजी, एसाजी आणि कोंडोबा पुढें जाणार तों नबाबसाहेबांना गिरफदार करावयाला गेलेली मावळ्यांची तुकडी आणि दिल्ली दरवाजा खुला करावयाला गेलेली तुकडी, ह्या दोन्हीही तुकड्या आपापल्या कामगिरीचे शेवट लावून तानाजीपाशीं येऊन उभ्या राहिल्या.

ह्या तिन्ही तुकड्यांची कामगिरी एकसमयावच्छेदेंकरून झालेली होती. आम्ही प्रथम तानाजीच्या तुकडीची हकीगत दिली. यानंतर दिल्ली दरवाजाच्या रोखानें जी तुकडी निघाली होती तिची हकीगत देऊं, आणि शेवटीं नबाबसाहेबांचा वाडा काबीज करून त्यांना गिरफदार करावयाला जी तुकडी सुटली होती, तिची कामगिरी सांगूं.

दिल्ली दरवाजा सर करावयाला जी मावळ्यांची तुकडी भास्कराच्या मार्गदर्शकत्वाखालीं आणि एसाजी कंक यांच्या नेतृत्वाखालीं निघाली, तिला तानाजीच्या तुकडीपेक्षां अधिक त्रास झाला. दिल्ली दरवाजा त्या गडावर विशेष मह-

त्याचा असल्याकारणानें त्याच्या रक्षणाविषयीं नेहेमीं विशेष बंदोबस्त ठेवलेला असे. ह्या दरवाजांच्या दोन्ही देवड्यांवर मिळून शंभर अरब लोकांचा पाहारा ठेवलेला असे. हे अरब अनुभवशीर आणि धाडशी म्हणून ह्या दरवाजाच्या रक्षणासाठीं नबाबानें ठेविलेले होते.

ह्या शंभर पाहारेकरी अरबांपैकीं कांहीं निजलेले होते. परंतु बहुतेक जागे असून पहारा करीत होते.

मराठे वीरांची चाहूल या अरब लोकांस लागतांच ते आपल्या तरवारी घेऊन सज्ज झाले, आणि चाल करून येणाऱ्या शत्रूकडे तोंडें करून उभे राहिले. हे चाल करून येणारे लोक कोण आहेत, किती आहेत, आणि ते गडाच्या आंत कोणीकडून आले आणि त्यांचा उद्देश काय आहे, हें कांहींच ह्या अरबांना ठाऊक नसल्याकारणानें ते तरवारी घेऊन जागच्या जागीं नुसते उभे राहिले होते..

ह्या अरबांची तयारी पाहून मराठे वीर पुढें न जातां जागच्या जागीं उभे राहिले, आणि तेथूनच त्यांनीं त्या अरबांवर बाणांची संतत वृष्टि सुरू केली. ह्या मराठे वीरांत असा एकही वीर नव्हता कीं ज्यानें विद्युल्लतेच्या वेगानें आपले बाण सोडले नाहींत. ह्या बाणांमध्यें असा एकही बाण नव्हता कीं ज्यानें शत्रूच्या माणसाला गांठलें नाहीं, आणि शत्रूच्या माणसांत असा एकही माणूस नव्हता कीं जो मराठ्यांचा बाण लागतांच धाडदिशीं जमिनीवर पडला नाहीं. मराठ्यांचा एकही बाण वांझोटा झाला नाहीं. कांहीं बाण अरबांच्या नरड्यांत, कांहीं छातींत, कांहीं पोटांत, कांहीं कमरेंत, कांहीं मांड्यांत घुसत होते. बाण लागला कीं 'या अल्ला!' अशी वेदनेची सूचक किंचाळी फोडून तो अरब जमिनीवर धाडदिशीं पडत असे.

याप्रमाणें मराठे वीर बाणांची वृष्टि करीत असतां पहाऱ्यावरील बहुतेक अरब लढण्याच्या कामाला निरुपयोगी होऊन जमिनीवर पडले. जे कोणी अरब घाईघाईनें तीरकमठे घेऊन सज्ज होऊन तीर सोडूं लागले, त्यांचे तीर भरमसाट रीतीनें सोडलेले असल्याकारणानें त्याचेपैकीं बहुतेक बाण मराठ्यांच्या डोक्यांवरून पलीकडे जात.

देवड्यांवरील बहुतेक अरब पडले असें मराठ्यांच्या निदर्शनास येतांच त्यांनीं 'हरहर महादेव!" अशा प्रचंड आरोळ्या करून दरवाजाकडे चाल केली. ह्या त्यांच्या आरोळ्या ऐकून त्या दरवाजाच्या बाहेरच्या बाजूस जे मावळे शिवाजीच्या नेतृत्वाखालीं वाट पाहात उभे राहिलेले होते, त्या मावळ्यांनीं तशाच प्रचंड

आणि आकाशकटाहाला विदीर्ण करणाऱ्या आरोळया ठोकल्या. अशा रीतीनें दिल्ली दरवाजाच्या आंतून आणि बाहेरून मावळयांच्या प्रचंड आरोळयांनीं गडावरील सर्व लोक खडबडून जागे झाले. साधे लोक, शिबंदींतील शिपायी, तटावर पहारे करणारे, सर्व लोक उठून 'काय आहे ? कोण आहे ? ही कसली गडबड आहे ?' असे प्रश्न एकमेकांना विचारूं लागले. हा मराठ्यांचा हल्ला आकस्मिक झालेला असल्याकारणानें कोणाच माणसाला त्याचें नक्की स्वरूप कळलेलें नव्हतें.

गडावरील सर्व माणसें घाबरलेलीं होतीं आणि काय करावें, कोणीकडे जावें, वगैरे त्यांना कांहीं सुचत नव्हतें.

अशा रीतीनें गडावरील लोकांची मनःस्थिति असतां मराठे वीर पुढें सरसावले आणि त्यांनीं दिल्ली दरवाजाचीं दोन्ही पानें सताड उघडलीं. तेव्हां बाहेरचे मराठे वीर जे शिवाजीच्या नेतृत्वाखालीं होते ते 'हर हर महादेव !' अशा प्रचंड गर्जना करीत करीत त्या दरवाजानें आंत घुसले. तेव्हां दरवाजा उघडावयाला गेलेले मराठे वीर तोंडें वळवून त्यांच्या पुढें चालूं लागले.

ह्या मंडळींनीं दारूचें कोठार, हत्यारखाना, वगैरे ठिकाणें आपल्या ताब्यांत घेतलीं. नंतर हे लोक कोठड्यांत कोंडून ठेवलेल्या कैद्यांना सोडवावयाला गेले.

याप्रमाणें ही दंगल इकडे चाललेली असतां कांहीं मराठे वीर निशाणाच्या बुरजावर गेले. तेथें नबाबाचें निशाण उभारलेलें होतें तें काढून टाकण्यासाठीं एक मराठा गडी, कमळया, त्याच्या वांशावर चढला. त्यानें तें इस्लामी निशाण तेथून काढून टाकलें आणि त्याच्या जागीं मराठ्यांचें निशाण बांधलें.

नंतर ही वीरसेना गडावरील पटांगणांत येऊन दाखल झाली. तानाजीची ही वीरसेना ह्याच पटांगणांत येत होती, तसेंच नबाबाचा वाडा सर करावयाला गेलेले वीरही आपली कामगिरी यशस्वी रीतीनें पार पाडून येत होते. तिचें तपशीलवार वर्णन पुढील प्रकरणीं करूं.

---

## प्रकरण २७ वें.

# अरुंधती आणि पुंडरीक.

प्रकरण चोवीसच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें अरुंधतीला धमकी भरून फातिमा त्या महालांतून रागानें पाय आपटीत आपटीत निघून गेली. आजच अरुंधतीचा नक्षा उतरलेला पाहून आपले डोळे कृतार्थ करून घ्यावे अशी तिची इच्छा होती.

अशा दुष्ट इच्छेनें ती नबाबसाहेबांच्या पुढें जाऊन उभी राहिली आणि त्यांना म्हणाली, " खाविंद ती अरुंधती भारी हट्टी पोरगी आहे. आपल्या पवित्रपणाची ती भारी ऐट मिरविते. तिनें मला हिडिसफिडिस केलें. मला तिनें हिडिसफिडिस केल्याचें असो, माझी काय किंमत आहे ? मला तिनें हिडिसफिडिस केलें त्याचें काय महत्त्व आहे. मी तर आपल्या पायांतलें खेटर आहें. पण तिनें आपणाला तुच्छ केलें, आपणाला तिनें नाहीं नाहीं तीं नांवें ठेविलीं. नबाबसाहेब पापी आहेत, ते परस्त्रियांना बाटवितात, ते विषयी आहेत, ते दैत्य आहेत, ते सैतान आहेत, असे एक कीं दोन कीं तीन कीं दहा अपशब्द ती आपणाला बोलली. ती जें कांहीं आपणाला बोलली तें सगळें मी आपणाला कोठवर सांगत बसूं ? माझ्या सांगण्याचा मतलब हा कीं आजच्या आज, आजच रात्रीं आपण तिच्या महालांत जावें, आणि तिचा नक्षा उतरावा, तिचा हट्ट जिरवावा, आणि तिनें आपणाला ज्या शिव्या दिल्या आहेत, त्यांचेबद्दल आपण आजच सूड उगवावा. आपण तिची रग जिरविलेली पाहून माझे डोळे धन्य होतील ! तिच्या लांब लांब बाता थंड पडलेल्या पाहून माझ्या जन्माचें सार्थक होईल ! आज रात्रीं आपण तिच्याकडे जावें. मीही आपल्या पाठोपाठ येईन आणि तिचा तमाशा पाहीन !"

नबाबसाहेब अरुंधतीच्या समागमाला अत्यंत उतावळे झालेले होते. त्यांच्यानें या पुढें धीर धरून रहाणें शक्य नव्हतें. इतके दिवस त्यांनीं धीर धरला तो अशासाठीं धरला होता कीं तिचें आईबापांच्या वियोगाचें दुःख कमी व्हावें, राजवाड्यांतील वैभवाची तिला गोडी वाटावी, उंची खाद्यें, उंची पेयें, उंची सणंगें, ह्यांची तिला लज्जत लागावी, गरीबाऊ राहाण्याचा तिला तिरस्कार वाटावा; सारांश, आपल्या समागमाला तिच्या मनाची जशी तयारी व्हावयाला पाहिजे, तशी तयारी व्हावयाला कांहीं तरी अवधि जाणें इष्ट आहे, असें त्यांना वाटलें म्हणून त्यांनीं हे बारा दिवस जाऊं दिले. परंतु आतां विलंब त्यांना सहन करवेनासा झाला होता. म्हणून वरीलप्रमाणें फातिमेनें अरुंधतीच्या उद्दामपणाचें वर्णन केलें तें ऐकून त्यांचा मनोविकार उद्दीप्त झाला आणि ते फातिमेला म्हणाले, "फातिमे, मी आज रात्रीं अरुंधतीच्या महालांत जातों. तिचा हट्ट जिरवितों, तिनें मला दिलेल्या शिव्यांबद्दल सूड उगवितों, आणि तूं आपले डोळे धन्य करून घ्यायला ये तुझी इच्छा असल्यास !"

नबाबसाहेब आजच अरुंधतीचा नक्षा उतरविण्याला तयार झाले आहेत हें ऐकून फातिमेला अत्यंत आनंद झाला, आणि आजच्याच रात्रीं अरुंधतीची ऐट

ोरलेली आपण पाहूं आणि आपण तिला लाजवूं आणि हिणवूं, असा मनांत बेत रून ती नबाबाची परवानगी घेऊन तेथून निघून गेली.

× × ×

प्रहर रात्र चढली आहे. गडावर जिकडे तिकडे निजानीज झाली असून ामसूम झालें आहे. राजवाड्यांतील सर्व नोकरचाकर निद्रावश झालेले ाहेत. पहारेकरीसुद्धां कुसुंब्याचें सेवन करून आपलीं कर्तव्यें न करतां डार-र निजले आहेत, अशा समयीं नबाबसाहेब अरुंधतीच्या समागमाची इच्छा रून मध्यरात्रीच्या समयाची उत्कंठेनें वाट पहात आहेत. एक एक क्षण त्यांना का एका युगाइतका लांब वाटत आहे. आपण अरुंधतीला अमुक अमुक गोष्टी ांगूं, अमुक अमुक रीतीनें तिचें मन वळवूं, अमुक अमुक सरबतें तिला प्यावयाला ऊं, इत्यादि प्रकारांचें मनन करीत ते होते. मध्यरात्रीच्या अगोदर तिच्या हालांत जाऊं नये असा त्यांचा बेत होता, म्हणून ते वरीलप्रमाणें मनांत बेत रीत आहेत, मधून मधून आरशांत आपलें प्रतिबिंब पहात आहेत, मधून धून एकाद्या सरबताचा एक घोट प्राशन करीत आहेत, मधून मधून त्या ाणखान्यांत इकडून तिकडे आणि तिकडून इकडे फेऱ्या करीत आहेत, मधून धून पलंगावर आडवे होत आहेत, अशा रीतीनें ते मध्यरात्रीच्या अगोदरचा ाळ घालवीत होते, तों मध्यरात्रीचे तासावर टोले पडले ते त्यांनीं ऐकले. मग झट्दिशीं उठून अरुंधतीच्या महालाकडे जावयाला निघाले. फातिमा जी ाळतीवर उभी होती तीही त्यांच्या मागोमाग चालूं लागली.

नबाबसाहेब चित्रांच्या महालांत शिरले व त्यांच्या मागोमाग फातिमाही त्या हालांत शिरली.

नबाबसाहेब महालांत शिरले, तेव्हां अरुंधती,—जी ते आज आपला छळ ावयासाठीं येणार आहेत हें जाणून होती,—ती पलंगावर दोन्ही पाय खालीं ंबते सोडून बसलेली होती. तिच्याकडे विषयी नजर टाकून नबाबसाहेब त्या ंगाकडे चालत गेले. त्यांच्या मनांत तिच्या शेजारीं पलंगावर बसून तिच्या ठीवर हात ठेवावा असें होतें. पण ते पलंगाजवळ येतांच अरुंधती पलंगावरून ठून दूर बाजूस जाऊन उभी राहिली. तिला हात धरून ओढून आणून पलं-वर बसविण्यासाठीं नबाबसाहेब उठून तिच्याकडे जाऊं लागला. अरुंधती मागें गें हटत चालली. नबाबसाहेब पुढें पुढें जाऊं लागला. त्यानें एक एक पाऊल ढें टाकलें कीं तिनें एक एक पाऊल मागें हटावें, दर पावलाला नबाब अरुंध-

तीला "सुंदरी," "छबुकडे," "लाडके," "प्रिये," "बुलबुल," "ये इकडे," "ये माझ्या बाहुपाशांत," इत्यादि शब्द उच्चारीत होता. हर पाऊल मागें हटतांना अरुंधती "तिथेंच थांबा," "पुढें येऊं नका," "परिणाम वाईट होईल," इत्यादि शब्द उच्चारीत होती.

अशा रीतीनें नबाबसाहेब एक एक पाऊल पुढें पुढें टाकीत होता, अरुंधती एक एक पाऊल मागें मागें हटत होती, तों फातिमा,—जी मागें उभी राहून ही गंमत पाहात होती,–तिनें अरुंधतीला पुढें म्हणजे नबाबाकडे ढकलून दिलें. पण अरुंधती सावध होती. ती आपला तोल न गमावतां मागें वळली आणि फातिमेच्या मुस्कटांत अशा जोरानें तिनें एक थप्पड लगावली, कीं ती मूर्च्छा येऊन मुडद्याप्रमाणें जमिनीवर धाडदिशीं पडली. हें अरुंधतीचें धाडसाचें कृत्य पाहून नबाबसाहेब आश्चर्यानें थक्क होऊन गेले. परंतु तिला बाहुपाशांत कवटाळण्याची इच्छा न आवरतां ते तिच्याकडे एक एक पाऊल पुढें चालत जाऊं लागले. पण आतां अरुंधती मागें न हटतां जागच्या जागीं उभी राहिली. एकाद्या पहिलवानाप्रमाणें ती अवसानांत उभी राहिली. गंभीरपणाची मुद्रा धारण करून आणि करारीपणाचा दृष्टिनिक्षेप नबाबाच्या मुखावर करून आणि एक एक शब्द शांतपणानें पण ठांसून उच्चारीत उच्चारीत नबाबसाहेबांना अरुंधती म्हणाली, "नबाबसाहेब, तुम्ही एक पाऊल जरी पुढें चालून आलां, तरी त्याचा परिणाम फार भयंकर होईल, हें लक्षांत धरून काय करावयाचें असेल तें करा. मी तुम्हाला बजावीत असतां जर तुम्ही भलतीच गोष्ट करावयाला सिद्ध झालांत, तर पुढच्या परिणामाबद्दल मी जबाबदार नाहीं. खबरदार पुढें एक पाऊल टाकाल तर!"

ह्या भाषणांतील प्रत्येक शब्द अरुंधती ठांसून उच्चारीत होती. तथापि अंतर्यामीं ती पूर्णपणें शांत होती. तिचें प्रसंगावधान दृढ होतें, आणि नबाबानें काय केलें, तर आपण काय करावयाचें, हेंही तिनें आपल्या मनाशीं ठरवून ठेवलें होतें.

हें अरुंधतीचें भाषण ऐकून नबाबसाहेब हंसले आणि म्हणाले, "ए सुंदरी, तुझ्या धमकावणीला मी भीत आहें असें समजूं नको. मी ह्या गडावर हवें तें करावयाला समर्थ आहें. आज मी तुला आपल्या बाहूंमध्यें कवटाळण्याच्या निश्चयानें आलों आहें, परंतु मी तुझें हें चुरुचुरु बोलणें आणखी कांहीं वेळ ऐकण्यासाठीं येथें दूर उभा राहात आहें; भीतीनें मी दूर उभा राहात आहें असें समजूं नको! बोल सुंदरी!"

त्यावर अरुंधती न घाबरतां म्हणाली, " नबाबसाहेब, तुम्ही ह्या गडावर हवें तें करूं शकाल असें म्हणत आहां. पण मीही तुम्हाला ठांसून सांगतें कीं माझ्या इच्छेविरुद्ध तुम्ही कांहींही करूं शकणार नाहीं. मी तुम्हाला जवळ येऊं देणार नाहीं. माझा शब्द मी खरा करतें कीं तुमचा शब्द तुम्ही खरा करतां हें पाहूं. मी तुम्हाला हुकूम करतें कीं तुम्ही आहां तेथेंच उभे राहा. तुमची छाती असली तर या पुढें ! "

हेंही भाषण ऐकून नबाब हंसला आणि म्हणाला, " सुंदरी, आजपर्यंत तुझ्या सारख्या अनेक पोरी मीं पाहिलेल्या आहेत. पहिल्यानें त्या पोरी सदाचरणाचें मोठें अवडंबर माजवितात, नरकाची भीति दाखवितात, परंतु एकदा त्यांना सुखाची, विलासाची, ऐषआरामाची लज्जत लागली, कीं त्यांची सर्व ऐट नाहींशी होते, आणि त्या माझ्या जनानखान्यांत खुषीनें राहूं लागतात. तूं जरी आतां मला ताठा दाखवीत आहेस, तरी माझ्या बाहुपाशांत मी तुला एकदा कवटाळलें, म्हणजे तूं बाहेर पडावयाची इच्छाच करणार नाहींस ! माझ्या बाहूंमध्यें अशीच कांहीं जादू भरलेली आहे."

हें भाषण करून नबाबसाहेब न भितां, न कचरतां, अरुंधतीच्या जवळ जाऊं लागले. ही पोरगी आपणाला काय करणार आहे, आपल्या शक्तीपुढें ह्या पोरीची काय मात्रा चालणार आहे, आपण तिला बाहुपाशांत कवटाळून ठेविली कीं तिनें कितीही धडपड केली तरी ती व्यर्थ ठरेल, अशा भरंवशानें नबाबसाहेब आपले बाहु पसरून पुढें चालत जाऊं लागले, तेव्हां अरुंधती त्यांना दरडावून म्हणाली, "चांडाळा, तेथल्या तेथेंच उभा रहा. पुढें एक पाऊल टाकशील तर खबरदार !"

हें आवेशयुक्त भाषण ऐकूनही नबाब दबकला नाहीं. तो पुढें चालत गेला. तो अरुंधतीच्या जवळ गेला. त्यानें डावा हात तिच्या अंगाभोवतीं वळविला, आपल्याजवळ तिला ओढून तिची हनुवटी तो उजव्या हातानें धरूं लागला, तोंच अरुंधतीनें आपल्या पदराखालीं लपविलेली कट्यार उजव्या हातानें नबाबाच्या डोक्यावर उगारून त्याच्या मानेमध्यें ती जोरानें खचदिशीं मारली. हें तिचें कृत्य डोळ्यांचें पातें लवतें न लवतें इतक्या अल्प काळांत झालें. नबाबानें ती कट्यार-ही पाहिली नाहीं, किंवा ती कट्यार उगारणारा हातही पाहिला नाहीं. असो. कट्यारीनें एक वार करून ती कट्यार त्या धैर्यशाली मुलीनें जखमेंतून उपसून काढली आणि त्याच हत्यारानें तिनें तितक्याच जोरानें दुसरा वार नबाबाच्या

पाठींत केला. ह्याप्रमाणें नबाबाला दोन खोल जखमा होतांच तो 'या अल्ला!,' असा दुःखाचा उद्गार काढून जमिनीवर धाडदिशीं पडला.

मग अरुंधतीनें तीच कट्यार आपल्या स्वतांच्या छातींत भोसकून घेण्यासाठीं वर केली आणि ती स्वतांला वार करून घेणार होती, इतक्यांत त्या दिवाणखान्याच्या दारावर धाडधाडदिशीं लाथांचे रट्टे मारले जात असल्याचा ध्वनि तिच्या कानांवर आला. तेव्हां उगारलेली कट्यार उजव्या हातांत तशीच धरून ती दाराच्या बाहेर काय चाललें आहे हें जाणण्यासाठीं निश्चल उभी राहिली.

ह्या वेळीं दाराच्या बाहेरच्या बाजूनें एकसारख्या धडाधड लाथा मारल्या जात होत्या. ह्या लाथांच्या आघातांनीं तें दार मोडून पडलें. तें मोडून पडतांच शस्त्रास्त्रांनीं सज्ज असा पुंडरीक आंत घुसला!

इतक्या अकल्पित रीतीनें पुंडरीक आलेला पाहतांच अरुंधती आश्चर्यचकित झाली. आपण स्वप्न तर पाहात नाहींना? आपले डोळे आपणास फसवीत तर नाहींत ना? असा विचार अरुंधतीच्या मनांत आला. पण पुंडरीक तेथें आला ही गोष्ट वास्तविक सृष्टींतीलच आहे अशी तिची खात्री होतांच तिनें आपल्या हातांतील कट्यार,—जो एका चंडाळाच्या देहाचें दोन वेळां रक्त पिऊन कृतार्थ झाली होती,–ती कट्यार तिनें जमिनीवर फेंकून दिली. तिनें आपली दृष्टि पुंडरीकाकडे वळविली. ज्या शूर, पराक्रमी आणि सुशील मुलानें तिच्या हृदयांत स्थान मिळविलें होतें, ज्याच्याविषयीं तिच्या मनांत सदैव विचार चालत असत, ज्याचा सहवास आपणाला मिळावा असें तिला वाटत असे, जो तिला आत्मीय असा वाटूं लागला होता, तोच पुंडरीक आतां आपल्यापुढें आहे, तोच पुंडरीक ऐन वेळेवर आल्याकारणानें आत्महत्येपासून आपण पराङ्मुख झालों, आपल्या आईबापांना दुःखांत लोटण्याचा क्रूरपणा आपल्या हातून घडला नाहीं, हे विचार तिच्या मनांत येऊन पुंडरीकाविषयीं तिला प्रेमयुक्त आदर वाटला. तसेंच आपण एका शूर पराक्रमी मुलीला ऐन वेळीं सोडविलें म्हणून पुंडरीकालाही धन्यता वाटत होती. त्या दोघांच्या मनांतील विचारामुळें तीं दोघें जणें एकमेकांकडे क्षणभर निश्चल दृष्टि करून पहात उभीं होतीं. परंतु ही त्यांची वृत्ति क्षणभरच टिकली. तीं दोघें जणें एकमेकांकडे धांवत गेलीं आणि अरुंधती पुंडरीकाचे पाय धरावयाला ओणवी होणार तोंच त्यानें तिचें मणगट धरून म्हटलें, "अरुंधती, ज्या देवाच्या दयेनें ऐन वेळीं मी येथें येऊं

शकलों, आणि तूं आत्महत्येपासून पराङ्मुख झालीस, त्या देवाचे तूं उपकार मान. माझे उपकार मानूं नको ! ''

असें म्हणून पुंडरीकानें अरुंधतीचा हात धरला, आणि तिला म्हटलें, ''तुझी आई विजापुरास खुशाल आहे. तुझे गजाननराव आतेभाऊ मजबरोबर या वाड्यांत शिरले ते तुला दिसतीलच. तुझे बाबाही गडावर दिल्लीदरवाजानें आले असतील. मी त्यांना तुला भेटवितों. चल.''

तेव्हां ती त्याला म्हणाली, ''नाना, माझें पावित्र्य नष्ट करूं पाहाणाऱ्या ह्या नबाबाला मीं ह्या कट्यारीनें ठार मारलें. मी कायेनें, वाचेनें आणि मनानें पवित्र अशी तुम्हांला पुन्हां भेटत आहें. तुम्ही एक क्षणभरही उशीरानें आलां असतां, तर मी तीच कट्यार आपल्या उरांत भोकसून घेऊन आत्महत्या करून घेतली असती. देवानें खैर केली असेंच म्हटलें पाहिजे.''

त्यावर पुंडरीक म्हणाला, '' शाबास, अरुंधती शाबास ! या नबाबाला तूं यथा-योग्य शासन केलेंस हें पाहून मला भारी आनंद होत आहे. असो. मराठ्यांनीं हा गड जिंकून घेतला आहे. इतःपर तो मराठ्यांच्या अमलाखालीं राहाणार. आपणा मराठ्यांचें नष्टचर्य संपलें. असो. तूं चल माझ्याबरोबर ! तुझ्या बाबांना मी तुला भेटवितों. तुझे गजाननभाऊही तुला भेटतील. चल. ''

असें म्हणून पुंडरीक अरुंधतीचा हात धरून चालूं लागला. तों त्या राजवाड्याचे इतर भाग कबज्यांत घेण्यासाठीं त्याच्या तुकडींतील जे लोक इतस्ततः पसरलेले होते ते एकामागून एक असे येऊन त्याला मिळाले. मग ही सर्व मंडळी गडाच्या उघड्या पटांगणांत पूर्वीं ठरल्याप्रमाणें येऊन दाखल झाली.

आपण ऐन वेळेवर येऊन हजर झालों म्हणून अरुंधतीचे प्राण बचावले, हें मनांत येऊन पुंडरीकाला किती धन्यता वाटली असेल याची कल्पना वाचकां-नींच करावी. तसेंच ज्या शूर, सद्गुणी आणि सुंदर मुलानें आपणाला नांदेडच्या जंगलामध्यें अपवित्र मुसलमानाचा स्पर्शही होऊं दिला नाहीं, त्याच मुलानें ऐन आणीबाणीच्या समयीं आपल्या पुढें अकस्मात् येऊन आत्महत्येचा प्रसंग आप-णावर येऊं दिला नाहीं, हा विलक्षण योगायोग मनांत येऊन अरुंधतीलाही अति-शय आनंद झाला आणि पुंडरीकाविषयीं तिच्या मनांतील आदर आणि प्रेमभाव किती पटीनें वृद्धिंगत झाले असतील याचीही कल्पना वाचकांनींच करावी.

---

## प्रकरण २८ वें.

# शिवाजीचें भाषण.

सिद्दी दरवाजा, दिल्ली दरवाजा आणि राजवाडा, सर करावयाला गेलेल्या तुकड्या आणि बाहेरून आलेल्या दोन तुकड्या मिळून एकंदर पांच तुकड्या आतां गडाच्या मुख्य पटांगणांत मिळाल्या. कोणीं काय काय केलें, सर केलेल्या ठिकाणांच्या बंदोबस्तासाठीं काय काय तजविजी केल्या, किती किती मुसलमान गिरफदार केले, वगैरेसंबंधाच्या त्रोटक हकीगती एकमेकांनीं एकमेकांस सांगितल्या. नबाबसाहेब एका अनाथ हिंदू मुलीवर बळजबरी करावयाला सिद्ध झालेले असतां त्याच मुलीकडून ते मारले गेले, हेंही सर्वांना कळलें.

इतकें झाल्यानंतर पुढचा कार्यक्रम शिवाजीनें ठरविला तो तानाजी, एसाजी, बाजी वगैरे वीरांना योग्य वाटला.

हें होत आहे तों रात्र संपून शुक्रवारचा दिवस उजाडला. गडावरील सर्व लोकांना वस्तुस्थिति पूर्णपणें कळून आली. मराठे वीर गडांत शिरले आहेत, त्यांनीं गडांतील सर्व महत्त्वाचीं ठिकाणें आणि ठाणीं काबीज केलीं आहेत, सर्व अधिकाऱ्यांचे आणि अंमलदारांचे वाडे आपल्या ताब्यांत घेतले आहेत, नबाबाचा खून झालेला असून त्याच्या वाड्याचा कबजा मराठ्यांनीं घेतलेला आहे, आतां ह्या मराठ्यांना प्रतिरोध करणें ही अशक्य कोटींतील गोष्ट आहे, आणि आतां आपणाला मराठ्यांना दांतीं तृण धरून शरण जाण्याशिवाय अन्य गति उरली नाहीं, ही वस्तुस्थिति गडावरील सर्व स्त्रियांना, सर्व पुरुषांना, सर्व नोकरचाकरांना कळून आली. मग ते पुढें काय काय प्रकार होतात हें पाहावयाला सिद्ध होऊन राहिले.

शिवाजीनें गडावरील साध्या लोकांना, आणि शिबंदींतील शिपायांना बोलावून आणून पुढें दिल्याप्रमाणें भाषण केलें:—

"सर्व लोकांनो, मी काय बोलतों तें लक्ष्य देऊन ऐका; जें तुम्ही ऐकाल त्याचा पोक्तपणानें विचार करा आणि तुमचा जो निश्चय ठरेल तो मला कळवा.

आमच्या महाराष्ट्रांतील केंजळगड हा किल्ला आम्हीं मराठ्यांनीं सर केला. आमच्या महाराष्ट्रांतील आमच्या किल्ल्यावर आम्हा मराठ्यांचें स्वामित्व असणें हेंच योग्य आहे. मुसलमान लोक हे परदेशी, परधर्मी आहेत. ह्या परदेशी, परधर्मी लोकांचा अमल ह्या देशांतील लोकांवर असणें हें देवाच्या घरीं रुजू नाहीं.

आमच्या देशावर आमचाच अमल असणें रास्त आहे. तुम्ही मुसलमान लोक आमच्या देशांत पाहुणे म्हणून राहा, आमची त्याला हरकत नाहीं. पण तुम्ही जों-पर्यंत आमच्या देशांत गुण्यागोविंदानें राहाल, तोंपर्यंतच आम्ही तुम्हाला पाहुणे म्हणून वागवूं. परंतु तुम्ही जर आमच्या धर्मावर घाला घालूं लागलां, आमचीं देवळें फोडूं लागला, आमच्या देवांच्या मूर्ति विध्वस्त करूं लागलां, आमच्या हिंदू लोकांना बाटवूं लागलां, आमच्या आया, बहिणी, सुनालेकी, बायका, वगैरेंना ओढून आपल्या जनानखान्यांन घालूं लागलां, तर तें मात्र आम्हा हिंदूंना खपणार नाहीं. मग आम्ही तुम्हाला शत्रु समजून तुम्हाला आमच्या देशांतून हांकलून देण्याच्या मार्गाला लागूं. तुमच्या नबाबसाहेबांनीं आम्हा हिंदूंवर आजपर्यंत असेच असंख्य अत्याचार केलेले आहेत, आणि अशाच प्रकारचा एक अत्याचार करीत असतां आज तुमचे नबाबसाहेब मरण पावले. एका पवित्र हिंदू मुलीवर बलात्कार करावयाला तुमचे नबाबसाहेब उद्युक्त झाले असतां त्या मुलीनें त्यांच्या मानेंत खंजीर खुपसून त्यांना यमसदनास पाठविलें. आमच्या मतानें तुमच्या नबाब-साहेबांना योग्य पारिपत्य झालें.

असो. आतां आम्हा मराठ्यांचें तुम्हाला इतकेंच सांगणें आहे. तुम्ही हत्यारें खालीं ठेवून आम्हाला शरण येत असलां तर तुम्हाला आम्ही जीवदान देऊन वाटेल तिकडे जावयाला मोकळीक देऊं, परंतु जर तुम्ही आम्हाला विरोध करा-वयाला उभे ठाकणार असलां, तर आम्ही तुमचें चंदन उडविल्याखेरीज राहाणार नाहीं. विचार करून काय तो जबाब मला द्या. "

याप्रमाणें शिवाजीचें जें भाषण झालें तें सर्वांनीं शांतपणें ऐकून घेतलें. नंतर गडावरील लोकांच्या वतीनें एक वृद्ध मुसलमान पुढें होऊन म्हणाला, " तुम्ही हा गड जिंकला हें आम्ही कबूल करतों. आम्ही तुम्हाला विरोध करीत नाहीं. आम्हांला जीवदान द्या आणि आम्हाला बाहेर हवें तिकडे जावयाला परवानगी द्या."

हें भाषण ऐकून शिवाजी म्हणाला, " ज्या कोणाला गड सोडून जावयाचें असेल, त्यानें आपलीं सर्व हत्यारें आमच्या स्वाधीन करून जावें, परंतु चीजवस्त, पैसा अडका, चिरगुटें पांघरुणें, भांडीं कुंडीं, वगैरे जें कांहीं अंगाबरोबर नेतां येईल तें नेण्याला आमची कांहीं हरकत नाहीं. जनावराच्या पाठीवर किंवा गाड्यांत घालून कोणी कांहींही सामान नेऊं नये. कोणतींही जनावरें गडाच्या बाहेर जातां कामा नये. "

हें शिवाजीचें भाषण सर्वांना मान्य झालें. मग शिवाजी म्हणाला, "ज्या कोणाला बाहेर जावयाचें असेल त्यानें आज म्हणजे शुक्रवारीं मध्यान्हीच्या आंत बाहेर पडलें पाहिजे. मध्यान्ह उलटून गेल्यावर जर कोणी जाऊं म्हणेल तर त्याला आम्ही गिरफदार करूं."

हेंही भाषण गडावरच्या लोकांनीं मान्य केलें. मग मध्यान्हापर्यंत गडावरील ज्या लोकांना तो गड सोडून जावयाचें होतें, त्यांच्या निष्क्रमणाचा प्रवाह सुरू झाला. बाहेर पडणारे लोक एक हजाराहून अधिक नव्हते.

महादेवाच्या तटबंदीला चार दरवाजे होते आणि मांधारदेवाच्या तटबंदीला दोन दरवाजे होते. ह्या एकंदर चार वाटांनीं स्त्रीपुरुष बाहेर पडत होते. ह्या चारी वाटांवर मराठ्यांचे पाहारेकरी बसले होते. कोणी कोणत्याही प्रकारचीं तारक किंवा मारक शस्त्रें किंवा अस्त्रें नेऊं नयेत हें पाहाण्यासाठीं हे पाहारेकरी ठेवण्यांत आलेले होते. गडावरील स्त्रिया बाहेर पडतांना त्यांना कोणीं उपद्रव करूं नये, त्यांचा कोणीं अपमान करूं नये, ह्यासंबंधानें हे मराठे पाहारेकरी काळजी घेत होते हें सांगणें नलगे. तसेंच गडावरील थोर दर्जाच्या किंवा पडदानशीन स्त्रियांना मेण्यांतून जाण्यालाही परवानगी देण्यांत आलेली होती.

केंजळगडावरचे जे पांच अधिकारी मराठ्यांनीं भोपाळगडावर कैदेंत ठेविलेले होते त्यांच्या स्त्रियांना आणि नोकरचाकरांना आपले मावळे बरोबर देऊन शिवाजीनें अहमदनगराकडे पाठविलें, आणि तुमचे पति लवकरच तुम्हांला येऊन भेटतील असें त्यांना सांगण्यांत आलें; आणि त्या पांच अधिकाऱ्यांना तुमचीं माणसें अहमदनगराकडे पाठवून देण्यांत आलेलीं आहेत, असें त्यांना सांगावें, आणि भोपाळगडावरून त्यांची मुक्तता करावी, अशा मजकुराचें एक पत्र भोपाळगडाच्या गडकऱ्याकडे पाठविण्यांत आलें.

वर सांगितलेल्या सर्व गोष्टी घडत आहेत तों मध्यान्ह उलटून गेला होता. मराठे वीर जे आधल्या दिवसाच्या म्हणजे गुरुवारच्या मध्यरात्रीच्या अगोदरपासून वरातींवरून चढणें, गडावरील ठिकाणें काबीज करणें, वगैरे नानाविध कामें करण्यांत गुंतलेले होते, त्यांना आतां उसंत खावयाला अवसर मिळाला. गडावर योग्य तो बंदोबस्त करून हे मराठे वीर जेवणें, विश्रांति घेणें, वगैरे देहधर्माचीं कामें करावयाच्या उद्योगाला लागले. संध्याकाळच्या सुमाराला जिकडे तिकडे शांतता झाली. मग थंड वेळेला मराठे वीर लहान लहान टोळया करून सर्व गडावर आणि डोंग-

रावर हिंडावयाला, झालेल्या गोष्टींबद्दल संभाषण करावयाला, निघाले. रात्रीच्या सुरवातीला ते सर्व वीर परत गडावर आले.

---

## प्रकरण २९ वें.

# गडावरील कैद्यांची मुक्तता.

मागील प्रकरणांत सांगितलेले वृत्तान्त केंजळगडावर शुक्रवारीं म्हणजे पौष शुक्ल प्रतिपदेच्या दिवशीं घडले. त्याच दिवशीं प्रहर दिवस आला होता तों शिवाजीच्या हुकमानें गडावरील सर्व कैद्यांची मुक्तता करण्यांत आली.

हे मुक्तता पावलेले लोक बहुतेक हिंदू होते, थोडेसे मुसलमान होते. हिंदूंमध्यें ब्राह्मण एकच होता.

नबाबानें ज्या लोकांना कैदेंत टाकलें होतें, त्यांचेवर नाना प्रकारचे गुन्हे लादण्यांत आलेले होते. आपली बायको किंवा मुलगी किंवा सून किंवा दुसरी कोणी नातलग स्त्री नबाबाच्या जनानखान्यांत पाठवून देण्याला जे लोक नाखूष होते, अशा पुष्कळ लोकांना नबाबानें कैदेंत टाकलें होतें. जे कोणी इस्लामी धर्म स्वीकारावयाला कबूल नव्हते, असेही पुष्कळ लोक कैदेंत होते. ज्या कोणी हिंदू लोकांनीं कोणाही मुसलमानाविरुद्ध कांहींही तक्रार केली होती, ते सर्व हिंदू कैदेंत पडलेले होते. नबाबानें केलेले खटल्यांचे निवाडे अन्यायाचे किंवा पक्षपाताचे आहेत, असें म्हणणारे लोक कैदेंत टाकण्यांत आलेले होते.

हे आणि अशाच प्रकारचे इतर गुन्हे केले याबद्दल अनेक इसम नबाबाच्या तुरुंगांत कित्येक दिवस खितपत पडलेले होते. अशा सर्व लोकांस शिवाजीच्या हुकमावरून मुक्त करण्यांत आलें. त्या सर्वांनीं शिवाजीच्या पायांवर डोकीं ठेवून आपली कृतज्ञता व्यक्त केली.

ह्या मंडळीमध्यें एक तेजःपुंज पुरुष होता. तो अंगानें स्थूल होता, काठीनें उंच होता, आणि वर्णानें गोरा होता. त्याचें कपाळ उंच होतें, आणि त्याचे डोळे अत्यंत पाणीदार होते, आणि प्रेक्षकाच्या मनांत आदर उत्पन्न करणारे होते. ह्या वेळीं ह्या पुरुषाच्या कंबरेला एक लांडा पंचा होता, अंगांत एक मळकी बंडी होती, आणि डोकीला एक स्वताच्या हातांनीं बांधलेलें कंदी मळकें पागोटें होतें. त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. हा पुरुष शिवाजीच्या पुढें उभा राहून आणि त्याच्या डोक्यावर हात ठेवून म्हणाला, “ बाळा, तूं विजयी हो ! ”

नंतर शिवाजी पुढें हात जोडून तो म्हणाला, “ मला त्या चांडाळ नबाबानें विनाकारण आज दोन महिने कैदेंत घातलें होतें. त्या कैदेंतून तूं मला मुक्त केलेंस हे तुझे उपकार जन्मोजन्मीं मी विसरणार नाहीं. माझ्या स्वतांच्या वतीनें, माझ्या म्हाताऱ्या बापाच्या वतीनें आणि माझ्या चार मुलांच्या वतीनें मी तुझे उपकार मानतों. ”

शिवाजीनें आणि त्याच्या दोस्तांनीं ह्या पुरुषाकडे कुतूहलमिश्र दृष्टीनें पाहिलें. मग शिवाजी त्याला म्हणाला, “ बसा इथें आणि तुमचें नांवगांव वगैरे आम्हाला सांगा. ”

शिवाजीच्या सांगण्याप्रमाणें हा पुरुष बसला आणि म्हणाला, “ वीरांनो, माझें नांव नारायणभट्ट बिन्न यज्ञेश्वरभट्ट माणके असें आहे. साताऱ्याजवळ वाल्हें म्हणून एक खेडें आहे, तेथला मी राहणारा. मी कोल्हापुरास व्याकरण शिकून शास्त्री झालों. परंतु शास्त्रीपणावर पोट भरेना म्हणून मिरजेस भिक्षुकी शिकलों. भिक्षुकाला पुराणिकपणाची जोड देऊन वाल्हें येथें येऊन संसार चालवूं लागलों. माझे म्हातारे वडील माझ्या जवळ असतात. ते पूर्वीं हरिदास होते, परंतु त्यांना आतां तो धंदा करतां येत नाहीं म्हणून ते आतां तात्या पंतोजी झाले आहेत. त्यांना त्यांच्या पोटापुरतें मिळतें. ते पत्रावळी आणि द्रोण लावून देखील पैसे मिळवितात. एकीकडे दोघा मुलांना शिकवितात आणि दुसरीकडे पत्रावळी आणि द्रोण लावितात. माझी बायको कामसू आहे आणि इतक्या सर्वांची बरदास्त ती उत्तम ठेवते; कोणाचें कांहीं कमी पडूं देत नाहीं. मी संसाराला पैसे मिळवितों. पण वाल्हे गांवांत भिक्षुकीवर आणि पुराणिकपणावर पुरेसे पैसे मिळत नाहींत म्हणून दरसाल मी एक दोन महिने देशावरीला निघतों, आणि पैसे मिळवून कसाबसा संसार हांकतों. माझे दोन मोठे मुलगे अठरा आणि वीस वर्षांचे आहेत. ते दोघेही सांगलीस माधुकरी मागून विद्या करीत आहेत. एक वैदिक होणार आहे, आणि दुसरा वैद्यकी शिकत आहे. माधुकरीवर त्यांचें पोट भरतें, पण कपड्यालत्त्यासाठीं मला पैसे पाठवावे लागतात. माझे धाकटे दोन मुलगे वाल्ह्यास मजजवळ असतात. ”

शिवाजीनें विचारलें, “ पण भटजीबोवा, तुम्ही केंजळगडाच्या नबाबाच्या तावडींत कसे सांपडलां ? तुमच्यावर कोणची तोहमत आली ?”

त्यावर नारायणभट्ट म्हणाला, “ मी, कुटुंबभरणाचें साधन म्हणून भिक्षुकी- शिकलों, पुराणिकाचा धंदा शिकलों; पुराणिकाचा धंदा शिकलों पण हस्तसामुद्रिक

आणि फलज्योतिष केवळ करमणूक किंवा नाद म्हणून शिकलों; ह्या विद्येवर मी कांहीं मिळविलें नाहीं."

शिवाजी म्हणाला, "बरें, मग ?"

नारायणभट्टानें उत्तर दिलें, "गेल्या चातुर्मासांत देशावरीसाठीं मी ह्या कैंजळगडावर आलों. मला तेथें शंभर सवाशें रुपयांची प्राप्ति झाली. पण अखेरीस घाण झाली."

तानाजीनें विचारलें, "ती कशी ?"

त्यावर नारायणभट्टानें उत्तर दिलें, "मी करमणुकीसाठीं म्हणून जी विद्या शिकलों, तीच मला भोंवली. मी लोकांचे हात पाहून, चेहेरे पाहून, आणि पत्रिका पाहून लोकांचे प्रश्न सांगूं लागलों. मी गतगोष्टी सांगें त्या अक्षरशः जमत. भविष्येंही मी सांगें पण त्यांचीं प्रत्यन्तरें येण्याला कित्येक वर्षांचा किंवा कित्येक महिन्यांचा अवधि असल्याकारणानें माझीं भविष्यें लोक नुसतीं ऐकून मात्र घेत, परंतु गतगोष्टी ज्या मी सांगें, त्या तंतोतंत पटत. माझी फार वाहवा झाली. हजार दीडहजार माणसांनीं माझ्या भेटीला येऊन मला प्रश्न विचारले आणि माझीं गणितें खरीं ठरतात अशी ते माझी तारीफ करूं लागले. माझी कीर्ती नबाबसाहेबांच्या कानांवर गेली. त्यांनीं मला बोलावणें पाठविलें; मी गेलों. त्यांनीं मला आपला हात दाखवून गत गोष्टी विचारल्या त्या मीं सांगितल्या व त्या त्यांना तंतोतंत पटल्या. नंतर त्यांनीं मला आपल्या आयुष्यांतील पुढच्या गोष्टी विचारल्या. तेव्हां मी त्यांचा हात पुन्हां बारकाईनें पाहिला. त्यांचा चेहेरा नीट पाहिला, काळजीपूर्वक गणित केलें. मी काय सांगणार तें ऐकावयाला उत्सुक होऊन नबाबसाहेब माझ्या तोंडाकडे डोळे लावून बसले. त्यांचे अधिकारी, मानकरी वगैरे दरबारांतील लोक मी काय भविष्य सांगतों तें ऐकावयाला कुतूहलानें बसले होते."

शिवाजीनें म्हटलें, "बरें पुढें ? तुम्हीं काय भविष्य सांगितलें ?"

नारायणभट्टानें उत्तर दिलें, "मी सर्व गोष्टी नीट हिशेबांत घेऊन नबाबांचें भविष्य मनांत ठरविलें. पण एकही अक्षर बोललों नाहीं. तेव्हां नबाबसाहेबांनीं भविष्य सांगा असा आग्रह केला. तेव्हां मी म्हटलें, 'ब्रह्मदेवाचें लिखित पूर्णपणें माणसाला कधींच कळणें शक्य नाहीं, म्हणून मी आपलें भविष्य आपणाला सांगणार नाहीं. तेव्हां नबाबसाहेबानें मला अति आग्रह केला. त्याच्या दरबारांतील लोकांनींही फारच गळ घातली. त्या नबाबाला अप्रिय गोष्ट सांगणें माझ्या जिवावर आलें, आणि मला भीतीही वाटली म्हणून मी मुखस्तंभासारखा बसून

राहिलों. तरीही नबाबानें आपला आग्रह सोडला नाहीं. तेव्हां मी उद्यां काय तें सांगेन असें त्यांना आश्वासन देऊन दरबारांतून बाहेर आलों. रात्रींच्या रात्रींच गडांतून पलायन करावें असा माझा बेत होता. मी पळून जाण्याचा प्रयत्न केला, पण दुर्दैवानें मी पकडलों गेलों."

शिवाजीनें विचारलें, "बरें पुढें ?"

नारायणभट्ट म्हणाला, "दुसऱ्या दिवशीं मला पुन्हां नबाबसाहेबांपुढें उभें करण्यांत आलें. तेव्हां ते मला म्हणाले, 'भटजीबोवा, तुम्ही मला फसवून पळून जाणार होतां. आतां माझें भविष्य तुम्ही सांगितल्याशिवाय तुमची सुटका होणार नाहीं. काय भविष्य असेल तें सांगा.'

शिवाजीनें विचारलें, "तुम्हीं काय भविष्य सांगितलें ?"

नारायणभट्ट म्हणाला, "भविष्य अनिष्ट आहे, तें ऐकून तुमच्या मनाला दुःख होईल. तें मला विचारूं नका असें मीं म्हटलें; पण नबाबानें फारच आग्रह केला, भीति दाखविली, तेव्हां माझा नाइलाज झाला, आणि मी जें भविष्य काढलें होतें तें सांगून टाकलें. मी मूर्खपणा केला. मला नबाबानें आग्रहच तसा केला होता. माझा नाइलाज होऊन गेला."

शिवाजीनें विचारलें, "तुम्ही नबाबाला काय सांगितलें ?"

नारायणभट्ट म्हणाला, "मी त्याला असें म्हटलें कीं तीन महिन्यांच्या आंत तुमच्यावर मोठा अनर्थ कोसळेल. तुमच्या वैभवाची हानि होईल; इतकेंच नव्हे, तर प्राणांचीही हानि होईल असें मला माझ्या गणितावरून कळून येतें. माझें गणित चुकलेलें असेल असें मला वाटत नाहीं, आणि शास्त्र तर चुकलेलें नाहींच नाहीं. मनुष्य हा चुकीला पात्र आहे. आपण मला फार फार आग्रह केला व भीड घातली, म्हणून मी हें भाकीत आपणाला सांगितलें. माझा नाइलाज झाला. खाविंदांनीं माफ करावें."

शिवाजी म्हणाला, "बरें पुढें ?"

नारायणभट्ट म्हणाला, "तेव्हां नबाबसाहेब फार दुःखी झाले. पण बाहेर दुःख न दाखवितां ते कृत्रिमपणानें हंसून आणि माझा धिक्कार करून म्हणाले, 'भटुरड्या, तुला काय समजतें ? व्यर्थ बढाई मारतोस ! तुला मी कैदेंत ठेवतों आणि आजपासून तीन महिने उलटून गेल्यावर तुला ह्या गडाच्या नैर्ऋत्य कडेवरून मी स्वतः तुला माझ्या स्वताच्या हातांनीं खालीं ढकलून देईन. ढकलून देतांना तुला विचारीन, 'मी अद्यापि पूर्ण वैभवांत आहें आणि जिवतही आहें.' तूं तरी

गणित करतांना चुकलास किंवा तुझें शास्त्र तरी खोटें असलें पाहिजे असें तुला मी बजावीन आणि मग तुला कड्याखालीं ढकलून देईन."

एसाजी म्हणाला, " बरें पुढें काय ? "

नारायणभट्ट म्हणाला, " नबाबाच्या हुकमावरून जल्लादानें मला धक्के मारीत मारीत एका कोठडींत नेऊन कोंडलें. त्या दिवसापासून मी तेथेंच होतों. मला तुम्ही वीरांनीं कैदेंतून मुक्त केलें. मी तुम्हां सर्वांचा ऋणी आहें. मला परत वाल्ह्याला जावयाची परवानगी द्या. मी दोनच महिन्यांनीं परत येईन असें घरच्या माणसांना सांगितलें होतें, पण माझा पांच महिने ठिकाण नाहीं हें पाहून तीं माणसें काळजींत पडलीं असतील. त्यांची काळजी दूर केली पाहिजे. माझी ही हकीगत समाप्त करावयाच्या अगोदर तुला हें सांगितलें पाहिजे, कीं गेल्या मार्गशीर्ष वद्य अमावास्येला माझ्या भाकिताचे तीन महिने भरले. नबाबही त्याच दिवशीं एका अनाथ मुलीचा छळ करीत असतां शुचित्वरक्षणार्थ तिनें त्याचा खून केला, आणि त्याच दिवशीं तुम्ही मराठे वीरांनीं हा गड जिंकून मला कैदेंतून सोडविलें आणि मला व माझ्या कुटुंबांतील माणसांना सुखी केलें. जातों. देव तुम्हा वीरगड्यांना विजयी करो ! "

शिवाजीनें विचारलें, " तुम्ही ह्या गडावर मिळविलेले सव्वाशें रुपये नबाबानें जप्त केले काय ?"

नारायणभट्ट म्हणाला, " होय, पण ते रुपये गेल्याचें मला कांहींच वाटत नाहीं. तितके रुपये मी पुन्हां मिळवीन. शीर सलामत तर पगड्या पंचायशी ! मी जिवानिशीं सुटलों हा लाभ काय थोडा आहे ? भविष्यकथनाच्या विद्येमुळें मजवर हा अनर्थ कोसळला म्हणून पुन्हां भविष्यकथन करावयाचें नाहीं अशी मीं शपथ वाहिली आहे. गेल्या तीन महिन्यांत माझ्या हातून फार भ्रष्टाकार झाला. मला दररोज स्नान करतां आलें नाहीं, संध्यावंदन करतां आलें नाहीं, सूर्याला अर्घ्य देतां आले नाहींत, मला सोंवळें नेसतां आलें नाहीं, ब्राह्मणेतरांच्या हातचें जेवण जेवावें लागलें. माझ्या हातून किती तरी पापें घडलीं आहेत ! मी घरीं गेल्याबरोबर सक्षौर प्रायश्चित्त घेणार !"

त्यावर शिवाजी म्हणाला, " भटजीबोवा, तुम्हाला घरीं जावयाची उत्कंठा लागली आहे हें साहजिक आहे. तुम्ही जा. तुमचे सव्वाशें रुपये जे नबाबानें अन्यायानें जप्त केले होते ते तुम्हांला आम्ही त्याच्या खजिन्यांतून परत देतों. कारण, तो खजिना आतां आमच्या मालकीचा झाला आहे. तसेंच तुम्हाला वाल्ह्यापर्यंत पोंचवावयासाठीं तुमच्याबरोबर माझे दोन वीर गडी देतों. तुम्ही

आजच रवाना व्हा. पण माझी एक कल्पना मी तुम्हाला सांगतों ती तुम्हाला आणि तुमच्या वडिलांना कितपत रुचते, याचा विचार घरीं जाऊन करा आणि माझे दोन वीर गडी परत येतील त्यांच्या मुखानें मला तुमचा विचार कळवा. ती कल्पना ही:--तुम्ही वाल्ह्याहून येथें रहावयाला यावें. येथें तुम्ही गडावर पुराण सांगावें, आणि येथील रहिवाशांचें भिक्षुककृत्य संभाळावें. तुमच्या वडिलांनीं गडावरच्या मुलांना साक्षर करावें. त्यांना बालबोध मोडी लिहिणें वाचणें आणि थोडेसे हिशेब शिकवावे. तुम्हा बापलेकांना आम्ही योग्य ती नेमणूक करून देऊं. ही कल्पना तुम्हाला आणि तुमच्या माणसांना कितपत रुचते तें आम्हाला आमच्या गड्यांबरोबर कळवा."

त्यावर नारायणभट्ट म्हणाला, "बालवीरा, आपली अशी एक म्हण आहे कीं, आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन डोळे. तशासारखी माझी गत तुम्हीं केली आहे. मला तुम्हीं बंधमुक्त केलें, नबाबानें अन्यायानें जप्त केलेले पैसे मला परत देत आहां, आणि मला आणि माझ्या वडिलांना ह्या केंजळगडावर असामी देत आहां. मीं घरीं जावयाच्या अगोदर तुम्हांला सांगतों कीं, आम्ही दोघेही ह्या गडावर कायमचें राहावयाला येतों. मी वाल्ह्याचें आपलें बिऱ्हाड आटोपून पंधरा दिवसांच्या आंत सर्व माणसांसह येथें राहावयाला येतों. बालवीरा, तुझे उपकार जन्मजन्मांतरींही फिटणार नाहींत."

नबाबाच्या जनानखान्यांत ज्या स्त्रिया होत्या, त्या सर्वांची मुक्तता करण्यांत आली. त्या सर्व स्त्रियांना नबाबानें जबरदस्तीनें भ्रष्ट केलेलें असल्याकारणानें त्यांना ही मुक्तता आनंददायी झाली.

---

## प्रकरण ३० वें.

# नांदेड येथील वृत्तान्त.

मागील प्रकरणांत सांगितलेला वृत्तान्त केंजळगडावर घडला, त्याच दिवशीं म्हणजे शुक्रवारीं तिसऱ्या प्रहराच्या नंतर उंबरवाडी येथें बंडोबाच्या घरांत जो वृत्तान्त घडत होता, तो वाचकांना कळविण्यासाठीं आम्ही त्यांना तिकडे घेऊन जातों.

बंडोबा आपल्या घरांत माडीवरील खोलींत चोरीच्या दागिन्यांचें मुशींत घालून सोनें करण्यांत गुंतला असतां सुभान्यानें येऊन त्या खोलीचें दार ठोठावलें. बंडोबा बसल्या जागेवरूनच ओरडून म्हणाला, "कोण आहे ?"

तेव्हां सुभान्या म्हणाला, " मी सुभान्या आहें. आफताबखान आणि किस्मतखान आपल्या भेटीला आले आहेत. त्यांना बसावयाला सांगू किंवा आणखी केव्हां तरी यावयाला सांगू ? "

बंडोबानें आंतूनच उत्तर दिलें, " त्यांना दिवाणखान्यांत बसावयाला सांग. मी लवकरच येतों. "

हा हुकूम गड्याला देऊन बंडोबानें आपलें काम बंद ठेवलें. मग हात, तोंड, वगैरे धुऊन तो खोलीच्या बाहेर पडला. मग त्या खोलीला कुलूप लावून तो दिवाणखान्यांत आला. तेथें आफताब आणि किसमत हे सुभान्याच्या सांगीनें येऊन बसले होते.

शिष्टाईच्या चालीप्रमाणें उलट सुलट सलाम झाल्यावर बंडोबानें मंदस्मितपूर्वक विचारलें, " आफताबखान आणि किस्मतखान, काय काम ? "

तेव्हां आफताब म्हणाला, " आम्हीं कांहीं बेत केला आहे. त्याला तुमची मदत पाहिजे आहे. "

बंडोबा म्हणाला, " तुम्हाला कसली मदत पाहिजे आहे आणि तुमचा बेत काय आहे तो मला सांगा. माझी मदत तुम्हाला आहेच आहे. "

किसमत म्हणाला, " तुमची मदत आम्हाला होईल अशी आमची खात्री होती म्हणून तर आम्ही तुमच्याकडे आलों आहों. आम्हीं जो बेत केला आहे तो सिद्धीस जाण्यासाठीं आम्हाला तुमचे दोन गडी आणि चार घोडे एक दिवस भाड्यानें द्या. तुमचे दोन गडी आणि आम्ही दोघेजण मिळून चार असामी तो बेत पार पाडूं. "

बंडोबा म्हणाला, "माझ्या शर्तीप्रमाणें तुम्ही माणसांची बिदागी आणि घोड्यांचें भाडें द्यावयाला कबूल असलां तर मी गडी देईन आणि जनावरेंही देईन. "

आफताब म्हणाला, " आम्ही कबूल आहों. "

किसमत म्हणाला, " आम्ही कबूल आहों. "

त्यावर बंडोबा म्हणाला, " आपण अगोदर स्पष्ट शर्ती ठरविल्या म्हणजे मागून तंटा होण्याचें कारण नाहीं. "

आफताब आणि किसमत दोघे एकदम म्हणाले, " तुमचें म्हणणें रास्त आहे. "

तेव्हां बंडोबा म्हणाला, " एका घोडेस्वाराबद्दल, एका कामगिरीबद्दल किंवा एका सबंध दिवसाच्या कामानिमित्त एक रुपया, आणि एका घोड्याबद्दल आठ आणे, अशा माझ्या शर्ती आहेत."

आफताब म्हणाला, " त्या आम्हाला कबूल आहेत."

बंडोबानें विचारलें, " तुमचा बेत घरफोडीचा आहे किंवा साधा लफंगेगिरीचा, किंवा माणूस पळवून नेण्याचा, किंवा खून करण्याचा आहे. तें मला स्पष्ट सांगा."

तेव्हां आफताब म्हणाला, " आम्ही घर फोडून चोरी करणार आहों. नांदेडगांवीं महेश्वर या नांवाचा एक मराठा राहात असतो. तो फार श्रीमंत आहे. त्याच्या मुलानें दसऱ्याच्या दिवशीं खूप भारी किंमतीचे दागिने घातले होते. त्याचे कपडेही जरतारी होते. तो सुंदर पोऱ्या त्या दागिन्यांनीं आणि त्या कपड्यांनीं फारच सुंदर दिसत होता. मीं त्याला आपल्या डोळ्यांनीं पाहिलें."

बंडोबानें विचारलें, " इतका सुंदर तो पोऱ्या आहे ?"

आफताब म्हणाला, " होय, तो अतिशय सुंदर आहे."

बंडोबा म्हणाला, " तो पोऱ्या तुम्ही पकडून मला नजर केला तर मी तुम्हाला वीस पुतळ्या बक्षीस देईन."

त्यावर आफताब म्हणाला, " संधी मिळतांच तो पोऱ्या आम्हीं पकडूं आणि तुमच्या हवालीं करून वीस पुतळ्या बक्षिशी घेऊं. परंतु आज त्या पोऱ्याला पकडावयाचा आमचा बेत नाहीं आणि आज तें शक्यही नाहीं. कारण महेश्वर आणि त्याचा तो सुंदर मुलगा असे दोघेजण परगांवाला गेले आहेत, आणि त्यांच्या घरांत महेश्वराची बायकोच काय ती आहे."

बंडोबानें विचारलें, " महेश्वर फार श्रीमंत आहे असें मोघमपणें मींही ऐकलें आहें. पण तुम्ही त्या सुंदर पोऱ्याच्या अंगावर काय काय दागिने पाहिलेत तें सांगा."

आफताब म्हणाला, " त्या सुंदर पोऱ्याच्या कानांत बोराएवढया मोत्यांची भिकबाळी होती. गळयांत कंठी आणि बोरांएवढया मोठ्या आणि पाणीदार मोत्यांचें पेंडकें होतें. डोक्यांवरील जरीकांठी मंदिलांत मोत्यांचा शिरपेच खोवलेला होता. मणगटावर पोची असून तींत पाचूंची मोठी चौकी बसविलेली होती. करंगळींत एक पैलूंदार आणि शुभ्र हिऱ्याची आंगठी असून हाताच्या अगदीं थोडक्या चलनवलनानें देखील त्या हिऱ्याच्या पैलूवरून चमका मारीत होत्या. हा मूळचा सुंदर पोऱ्या सुंदर पोषाखानें आणि सुंदर दागिन्यांनीं इतका कांहीं सुंदर दिसत होता, कीं त्याच्याकडे पाहून माझ्या डोळ्यांचें सार्थक झालें असें मला वाटलें, आणि त्याच्या हाताचा स्पर्श व्हावा म्हणून मी त्याला आपल्याचीं पानें दिलीं. तीं त्यानें मंदस्मितपूर्वक मला परत दिलीं. तेव्हां त्याच्या बोटांचा

स्पर्श माझ्या हाताला होऊन माझ्या हाताचें सार्थक झालें असें मला वाटलें. पण बंडोबा, त्या पोऱ्याचें वर्णन करतां करतां मी फार वाहवत गेलों. माझ्या बोलण्याचा इत्यर्थ हा, कीं महेश्वराच्या घरांत खूब किमतीचे दागिने असले पाहिजेत. त्यांचेवर डल्ला मारावा असा आम्ही दोघांनीं बेत केला आहे."

त्या सुंदर पोऱ्याची मूर्ति मनःश्चक्षूंपुढें आणून बंडोबा ध्यानस्थ बसल्यासारखा दिसत होता. त्याला आफताब म्हणाला, "महेश्वराच्या घराची भिंत फोडून आणि घरांत असलेल्या त्या एकट्या बाईच्या तोंडांत बोळा कोंबून आणि जरूर पडल्यास तिचा खून करून आम्ही महेश्वराचे दागिने चोरणार आहों."

बंडोबा त्या सुंदर पोऱ्याच्या मूर्तीचें ध्यान क्षणभर बंद करून म्हणाला, "तो सुंदर पोऱ्या पकडून मला तो आणून द्याल तर मी तुम्हांला वीसाच्या दुप्पट मोहोरा बक्षीस देईन. पण तें असो. तुम्हांला माझे दोन गडी आणि दोन घोडे केव्हांला पाहिजेत ?"

आफताब म्हणाला, " आमचें काम प्रहर रात्र उलटून गेल्यावर सुरू होणार, पण तुमचे गडी आणि घोडे नांदेड जवळच्या त्या सुळक्या जवळच्या झाडींत संध्याकाळच्या सुमाराला हजर पाहिजेत."

" ठीक आहे," असें आफताबला उत्तर देऊन बंडोबानें आपल्या नोकराला हांक मारली. तो येऊन हजर होतांच तो त्याला म्हणाला, " सुभान्या, आतांच्या आतां हमीदाकडे जा, आणि नांदेड जवळच्या सुळक्या जवळच्या झाडींत संध्याकाळच्या सुमाराला दोन फालतू घोडे बरोबर घेऊन दोन गडी हजर राहातील अशी तजवीज त्याला करावयाला सांग."

" होय महाराज," असें उत्तर देऊन सुभान्या तेथून निघून गेल्यावर बंडोबा आफताबला म्हणाला, " चोरलेल्या दागिन्यांचा दहावा हिस्सा मला तुम्हीं दिला पाहिजे हें तुम्हाला ठाऊक आहे ना ?"

आफताब म्हणाला, " होय, तें आम्हाला ठाऊक आहे आणि कबूल आहे."

बंडोबानें विचारलें, " तुम्ही तो माल मजकडे केव्हां आणून गुदराल ?"

आफताबनें उत्तर दिलें, " उद्यां सूर्य उगवावयाच्या अगोदर आम्ही सर्व माल तुमच्या घरीं आणूं. मग तुम्ही आणि आम्ही त्याची मोजदाद करूं."

बंडोबा म्हणाला, " ठीक, उत्तम. तसेंच करावें."

तेव्हां आफताब आणि किसमत म्हणाले, " बरें बंडोबा, आतां आम्ही तुमची रजा घेऊं ?"

बंडोबा म्हणाला, “ थांबा. आपण नारिंगाचें सरबत पिऊं.”

असें म्हणून बंडोबानें नारिंगाच्या सरबताची सुरई आणली. मग त्या दोन मुसलमानांना सरबत देऊन बंडोबा आपण स्वतां तें सरबत प्याला. मग ते मुसलमान जावयाला उठले तेव्हां त्यांना निरोप देतांना बंडोबा म्हणाला, “ मित्रहो, उद्यां सकाळीं तुम्ही चोरीचा माल येथें आणावा आणि आपण त्याची मोजदाद करावी असें ठरलें आहे. पण महेश्वराच्या त्या सुंदर पोऱ्याला पकडून मजकडे तुम्ही केव्हां आणाल ? ”

त्यावर आफताब म्हणाला, “ ही घरफोडी चोरी जुनी पुराणी झाल्याबरोबर आम्ही त्या सुंदर पोऱ्याला पकडून तुमच्यापुढें आणून उभें करूं, आणि चाळीस मोहोरा बक्षिशी दाखल घेऊन जाऊं. बरें बंडोबा, आम्ही आतां तुमची रजा घेतों.”

असें म्हणून आफताब आणि किसमत हे दोघे बंडोबाला सलाम करून तेथून निघून गेले. बंडोबा मात्र सोनें आटवावयाच्या खोलींत न जातां तेथेंच बसून राहिला. कारण, ह्या वेळीं त्याच्या मनांत कांहीं वेगळेच विचार चालले होते. तो स्वतःला म्हणाला, “ आफताब आणि किसमत हे दोघेही लबाड आहेत. यापूर्वी दोन वेळां त्यांनीं मला फसविलें आहे. त्यांनीं वरवलीला अच्युतरावाची घरफोडी केली तेव्हां चंद्रहार बाजूला काढून ठेवून बाकीचा माल मजकडे आणला. तसेंच वळशी गांवच्या लखोबाच्या घरीं चोरी केली तेव्हां एक मोत्याचें पेंडकें त्यांनीं बाजूला काढून ठेवून बाकीचा माल मला दाखविला. ह्या दोन्ही प्रसंगीं मला मिळावी तितकी बक्षिशी मिळाली नाहीं. पण आतां ह्या नांदेडच्या चोरींत मी त्यांना तसें करूं देणार नाहीं. मी त्यांच्या पाळथीवर राहीन; ते चोरी करून गांवाच्या बाहेर पडतात तोंच त्यांना गांठून त्यांना येथें माझ्या घरीं घेऊन येईन. मग चोरलेल्या मालाची मोजदाद करून माझा भाग ठेवून घेऊन मग त्यांना जाऊं देईन. मी कांहीं कमी वस्ताद आहें कीं काय ? बेट्यांनो, ह्या खेपला मी फसणार नाहीं ! याद राखून असा ! ”

याप्रमाणें मनांत निश्चय करून बंडोबा तेथून उठला आणि दागिने आटविण्याच्या खोलींत गेला. तेथें तें काम पुढें न चालवितां त्यानें तेथील सामानाची आवराआवर केली, आणि त्या खोलीचें दार बंद करून दाराला कुलूप लावून तो संध्याकाळीं आफताब आणि किसमत यांच्या हालचालींवर पाळथ राखण्याच्या कामाचा तपशील ठरविण्यासंबंधाचा विचार करावयासाठीं आपल्या बैठकींच्या खोलींत जाऊन बसला.

शुक्रवारचाच दिवस. प्रहरभर रात्र चढली आहे. पशुपक्षी आपापल्या गोठ्यांत, किंवा तबेल्यांत, किंवा घरट्यांत, विश्रांतीचीं सुखें अनुभवीत आहेत; माणसें आपापले व्यवहार समाप्त करून दुसऱ्या दिवसाच्या व्यवहारासाठीं ताकद येण्याकरितां निद्रा अनुभवीत आहेत. जिकडे तिकडे सामसूम झालें आहे. महेश्वर आणि नाना हे दोघेजण केंजळगडाकडे गेलेले असल्या कारणानें घरांत फक्त भवानी ही एकटीच आहे. तिनें आपलें रात्रीचें जेवण उरकून आवराआवर केली होती. ती आपल्या खोलींत जाऊन निजली आहे.

अशा समयीं दोन इसम मात्र निद्रासुख न अनुभवितां कांहीं बदमाष कृत्यांत गुंतलेले होते. ते कोण होते त्यासंबंधानें गुपित राखण्याचें कांहीं कारण नाहीं. ते आफताब आणि किसमत होते. ते महेश्वराच्या घरांत चोरी करावयाच्या दुष्ट कामांत गुंतलेले होते.

महेश्वराच्या घराची भिंत फोडावयाला योग्य तीं हत्यारें त्यांच्याजवळ होतीं. त्यांनीं दगडाची भिंत आवाज होऊं न देतां फोडली. ह्या कामांत ते वाकबगार होते. त्यांनीं ह्या भिंतींत माणसाचें अंग शिरण्याइतकें मोठें भगदाड पाडलें. ह्या भगदाडांतून ते दोघे आंत शिरले. सोयीचें हत्यार संदुकीच्या कोयंड्यांत घालून आफताबनें तो कोयंडा पिळवटून उपटला. नंतर संदुकीचें झांकण उघडून आणि तें भिंतीला टेंकून उभें करून तो बोंचकीं हातांनीं चांचपून पाहूं लागला. कागदांचीं दफतरें त्यांनीं उचललीं नाहींत. परंतु चिरगुटांचीं आणि दागिन्यांचीं बोचकीं आफताबनें संदुकींतून बाहेर काढलीं. किसमतनें जमिनीवर धोतर आंथरलें होतें. त्याचेवर त्यानें हीं गांठोडीं ठेविलीं. किसमतनें त्या सर्व गांठोड्यांचे चार भाग केले आणि प्रत्येक भागाचें एक एक वेगळें बोचकें बांधलें. मग हीं चार बोचकीं त्या दोघां बदमाषांनीं भिंतीच्या भगदाडांतून बाहेर काढलीं. मग यत्किंचित् आवाज न होऊं देतां आणि शक्य तितक्या त्वरेनें हे चोर तेथून निघाले.

नांदेड गांवाच्या गांवकुसूंचा जो भाग थोडासा ढांसळलेला होता, आणि जो भाग त्यांनीं दिवसासच हेरून ठेवला होता, त्या भागाच्या खिंडींतून ते चोर हीं चार बोचकीं घेऊन बाहेर पडले. तेथें पूर्वीच आणून बांधून ठेवलेले दोन घोडे होते; त्यांच्या पाठीवरील कंठाळींत त्यांनीं हीं चार बोचकीं कोंबून भरलीं. एका एका घोड्याच्या पाठीवर दोन दोन बोचकीं आलीं. मग आफताब आणि किसमत त्या दोन घोड्यांचे लगाम हातांत धरून कांहीं वाट पायानें चालत गेले.

रात्रीचा अंधेर गडद पडलेला होता तरी चांदण्याच्या अंधुक प्रकाशांत देखील त्यांना कांहीं अडचण भासली नाहीं. ते असल्या कामांत पूर्ण पटाईत होते.

अशा रीतीनें कांहीं वाट ते पायानें चालत गेले. येथवर कोणी कोणाशीं बोललें नव्हतें. ह्या सर्व गोष्टी पूर्वीच ठरवून ठेवण्यांत आलेल्या होत्या. असो; ह्या विशिष्ट ठिकाणीं आल्यावर त्या दोघांनीं सभोंवार नजर फेंकली. आपल्या हालचालींवर कोणी टेहळणी करीत नाहीं अशी आपली खात्री करून घेतल्यावर त्या दोन चोरांनीं आपापल्या घोड्यांवर टांग टाकली, आणि खोगिरांवर बैठक मारून ते दौडत निघाले. पण कोणीकडे ? तें वाचकांना लवकरच समजेल. तसेंच आपल्या हालचालींवर कोणाची टेहळणी नाहीं अशा समजानें ते चालले होते. परंतु हा त्यांचा समज यथार्थ होता काय ? हेंही वाचकांना लवकरच समजेल.

---

## प्रकरण ३१ वें.

# चोरांचा पाठलाग.

आफताबखान आणि किसमतखान ह्यांनीं आपणाला पूर्वी दोन प्रसंगीं फसविलें होतें तसें ते आतांही कदाचित् आपणाला फसवितील, असा बंडोबाला संशय येऊन चुकला होता हें वाचकांना ठाऊकच आहे. ह्या संशयावरून बंडोबानें आपल्या मनांत कांहीं योजना ठरवून ठेविली होती. ते दोन खान चोरीचा माल उंबरवाडीकडे घेऊन जातात किंवा दुसऱ्या कोठें तरी नेऊन त्यांतील कांहीं वस्तु काढून ठेवून बाकीचा माल आपल्याकडे मोजदादीसाठीं आणतात, हें पाहण्यासाठीं तोही संध्याकाळ उलटून गेल्यावर कांहीं वेळानें घोड्यावर बसून नांदेडकडे जावयाला निघाला.

महेश्वराच्या घरांत चोरी करून ते दोन खान गांवकुसूच्या भगदाडांतून बाहेर पडलेले बडोबानें पाहिले. त्यांनीं कंठाळींत चार बोचकीं कोंबलीं तें त्यानें पाहिलें. मग कांहीं वाट पायानें चालून नंतर ते घोड्यांवर आरूढ झाले, हेंही बंडोबानें पाहिलें. मग ते रवाना झाले तेंही बंडोबानें पाहिलें. ते उंबरवाडीकडे जात असते तर बंडोबा त्यांच्याच बरोबर आपल्या घराकडे येणार होता, आणि ते दुसरीकडे कोठें तरी जातांना दिसले असते, तर तो त्यांना गांठून फजीत करणार होता. म्हणून तो उंबरवाडीकडे जाण्याची वाट फुटे तोंपर्यंत त्यांच्या हालचालींवर टेहळणी करीत करीत गुपचुप त्यांच्या मागून चालला. परंतु पुढें उंब-

वाडीकडे जाणारी वाट फुटली तेव्हां त्या वाटेनें न जातां ते दोन खान उत्तरेच्या रोखानें म्हणजे केंजळगडाची वाट धरून चालूं लागले. तेव्हां बंडोबाला त्या दोन खानांच्या मनांत लबाडी करण्याचा बेत आहे अशी खात्री झाली. मग तो त्यांना गांठावयासाठीं त्यांच्या मागोमाग घोड्यावरून दौडत निघाला. पुढें ते खान आणि मागें बंडोबा. आपल्या मागून कोणी तरी दौडत येत आहे असें त्या दोन खानांना बंडोबाच्या दौडत असलेल्या घोड्याच्या टापांच्या आवाजावरून कळून आलें. म्हणून त्यांनीं आपल्या घोड्यांना टांचळलें आणि त्यांनीं घोडे भरधाव फेंकले. आपला पाठलाग कोण करीत आहे हें मागें वळून पाहाण्यांत वेळ न घालवितां ते परमवेगानें मार्गक्रमण करूं लागले. त्यांच्या मागून बंडोबाही त्यांना गांठण्याच्या इराद्यानें परमवेगानें घोडा फेंकीत होता.

अशी ही शर्यत कांहीं वेळ चालली. पुढें पळणारे खान आणि त्यांना गांठावयासाठीं मागून धावणारा बंडोबा, ह्या दोघां मधील अंतर कमीही होईना आणि जास्तीही होईना. कांहीं वेळपर्यंत हें अंतर कायम राहिलें. खानांचे घोडे ओझ्यानें लादलेले होते तरी खानांना अंधेरांत पाहाण्याची चांगली संवय असल्याकारणानें त्यांचे घोडे चांगल्या वाटेनें चालविले जात होते. बंडोबाला अंधेरांत पाहाण्याची संवय नसल्याकारणानें त्याला चांगली वाट नीट दिसत नव्हती. तेणेंकरून त्याचा घोडा ठेंचा खात होता. एकदां तर बंडोबाच्या घोड्याला ठेंच लागून तो आणि वरचा स्वार असे दोघेही जमिनीवर आदळले; परंतु ह्या अपघातानें खचून न जातां बंडोबा पुन्हा सावरून घोड्याला उठवून त्याच्यावर आरूढ होऊन पुन्हा खानांचा पाठलाग त्यानें चालविला.

ही शर्यत कोठपर्यंत आणि किती वेळ चालत राहिली आणि तिचा शेवट काय झाला हें सध्यां न सांगतां आम्ही आपल्या वाचकांना पुन्हा नांदेड गांवीं महेश्वराच्या घराकडे घेऊन जातों.

चिरगुटांची आणि दागिन्यांचीं चार बोचकीं करून आफताब आणि किसमत हे दगडी भिंतीला त्यांनीं पाडलेल्या भगदाडांतून बाहेर पडले. त्यानंतर थोडक्याच वेळांत असें झालें कीं त्या भगदाडाच्या वरच्या बाजूचा एक दगड खालचा आधार नाहींसा झाल्याकारणानें कोसळून खालीं पडला. त्याचा खालच्या दगडावर आघात होतांच आवाज झाला. हा आवाज शेजारच्या खोलींत निजलेल्या भवानीबाईच्या कानीं पडला. ती जागी झाली, पण कसला तरी तो आवाज असेल असें वाटून भवानीनें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. तों इतक्यांत भगदाडाच्या माथ्याच

आणखी एक दगड खालीं पडला. त्याचाही खालच्या दगडावर आघात होऊन पुन्हा तसाच आवाज झाला. तेव्हां ही दुर्लक्ष्य करण्यासारखी गोष्ट नाहीं असें मनांत आणून भवानी उठली. तिनें त्या काळच्या साधनांनीं जितक्या जलदीनें दिवा लावणें शक्य होतें तितक्या जलदीनें दिवा लावला; तों इतक्यांत तिसरा दगड कोसळून पहिल्या दोन खेपांसारखा पुन्हा आवाज झाला आणि हा आवाज जिकडून येत होता तिकडे म्हणजे संदूक ठेविलेली होती त्या खोलींत ती गेली.

भवानीबाई ही जात्या धीट होती. तिनें खालींवर दिवा करून काय प्रकार आहे तो पहिला. भिंतीला भगदाड पाडलेलें आहे, संदुकीचें झांकण उघडून भिंतीला टेंकून ठेवलेलें आहे, संदुकींतील चिरगुटांची आणि दागिन्यांचीं बोचकीं आणि डबे हे नाहींसे झालेले आहेत, इत्यादि वस्तुस्थिति पाहातांच ही घरफोडी चोरी होय, असें तिनें तत्काळ जाणलें. संदुकींत नुसतीं कागदांचीं दफ्तरें होतीं तीं जशींचीं तशींच होतीं हेंही तिनें पाहिलें.

हा घरफोडीचा प्रकार पाहून भवानीबाईला आश्चर्य वाटलें. गेलेल्या दागिन्या-बद्दल आणि चिरगुटांबद्दल तिला वाईट वाटलें नाहीं असें म्हणणें हा सत्याचा अपलाप करणें होईल म्हणून आम्ही तसें म्हणत नाहीं. परंतु चोरीस गेलेल्या दागिन्यांत आणि चिरगुटांत कांहीं विशिष्ट दागिने आणि कांहीं विशिष्ट चिरगुटें गेल्याबद्दल तिला वाईट वाटलें इतकेंच नव्हे तर त्याबद्दल तिला परमावधीचें दुःख झालें. कारण, त्या चिरगुटांत कांहीं चोळ्या, कांहीं खण, कांहीं नेसावयाचीं सणंगें, आणि कांहीं कुंच्या हीं चिरगुटें भवानीबाईशीं प्रेमानें निगडित झालेल्या परंतु हल्लीं मेलेल्या माणसांचीं स्मारकें म्हणून त्यांना प्रिय होतीं. तसेंच चोरीस गेलेल्या दागिन्यांत एक नथ तिच्या आईनें सुवासिनीदशेंत मरतांना तिला आपली आठवण म्हणून बक्षीस दिली होती. एक हिऱ्याची अंगठी तिच्या बापानें तिला बक्षीस दिलेली होती. आणखी कांहीं दागिने तिच्या प्रेमाच्या माणसांच्या आठ-वणी करून देणारे असे होते. हीं विशिष्ट चिरगुटें आणि हीं विशिष्ट भूषणें गेल्या-बद्दल त्यांना भारी दुःख झालें. त्यांच्या डोळ्यांत अश्रुबिंदु उभे राहिले. परंतु ही शोक करीत बसण्याची वेळ नव्हे हें मनांत आणून त्यांनीं ते अश्रु पुसून टाकले. मन घट्ट करून तिनें संदुकीचें झांकण लावलें. मग त्या खोलींतून बाहेर पडून तिनें त्या खोलीचें दार लाविलें. मग क्षणभर तिनें पुढें काय करावयाचें याचा विचार केला. हा विचार पक्का ठरतांच ती घरांतून बाहेर पडली; अर्थात् बाहेर पडतांना तिनें पुढच्या दाराला कुलूप लाविलें.

भवानी थेट मुक्ताबाईच्या घरीं गेली. तिला हांका मारून जागी करून भवानीबाईनें तिला उठविलें. मुक्ताबाई बाहेर येतांच भवानीबाईनें सर्व हकीगत तिला सांगितली आणि शेवटीं म्हटलें, " मुक्ते, धनी आणि नाना असे दोघेजण केंजळगडाकडे गेले आहेत. ते केव्हां परत येतील हें निश्चित नाहीं. कदाचित् ते आठ दिवसांनीं येतील, कदाचित् त्यांना यावयाला पंधरा दिवसही लागतील. ते आल्यावर ही चोरी त्यांना कळवून नंतर त्यांनीं ह्या चोरीच्या तपासाला लागणें हें बरोबर नाहीं. तोंपर्यंत चोरही चोरी शंभर प्रकारांनीं पचवूं शकतील; तर आतांच्या आतां पुरुषांच्या कानांवर ती चोरी घालावी म्हणजे चोरांचा माग लावण्याचा ते एकदम प्रयत्न सुरू करतील. मी स्वतांच केंजळगडाकडे जाणार आहें. तूं माझ्या सोबतीला येशील काय असें तुला विचारावयासाठीं मी तुजकडे आलें आहें. तर सांग मला मजबरोबर येतेस काय ? "

मुक्ताबाईनें तत्काळ उत्तर दिलें, " होय, मी येतें. पायीं म्हणा किंवा घोड्यावर म्हणा."

भवानी म्हणाली, " आमचा पूर्वीचा घोडा नानानें नेला आहे, आणि नवीन घेतलेल्या घोड्यावर बसून धनी गेले आहेत. आतां आमच्या घरांत घोडाच नाहीं. परंतु आपण दयाळसिंगाचे दोन घोडे भाड्यानें घेऊं. आमच्या माणसांशीं त्याचा घरोब्याचा आणि मैत्रीचा संबंध आहे."

मुक्ताबाई म्हणाली, " ठीक आहे."

असें म्हणून भवानी आणि मुक्ता दयाळसिंगाच्या घराकडे निघाल्या. त्याच्या दाराशीं हांका मारमारून त्यांनीं त्याला जागें केलें. तो उठून दिवा घेऊन बाहेर आला तों त्याच्या नजरेस ह्या दोन स्त्रिया पडल्या. ह्या वेळीं त्या आपल्याकडे कशाला आल्या हें त्याला मोठें गूढ पडलें. परंतु त्यानें प्रश्न विचारावयाच्या अगोदरच भवानीनें त्याची झोंपमोड केल्याबद्दल प्रथम त्याची क्षमा मागितली. मग चोरीचा प्रकार सांगितला. मग आपला दोघींचा केंजळगडाकडे जावयाचा विचार सांगितला आणि शेवटीं म्हटलें, "दयाळसिंग, चोरीचा तपास तत्काळ सुरू झाला तर कांहीं माल सांपडेल. दिरंगाई होऊं दिल्यास चोर माल पसार करतील आणि आपणाला कांहींच मिळणार नाहीं. यासाठीं केंजळगडाकडे जावें असें मी ठरविलें आहे. तेथें धन्यांची गांठ घेऊन त्यांना ही चोरीची हकीगत सांगावी असें मी ठरविलें आहे. ही मुक्ता मला सोबत यावयाला कबूल आहे. आम्हा दोघींना दोन घोडे द्या अशी माझी तुम्हाला विनंती आहे."

ही चोरीची हकीगत ऐकून दयाळसिंगाला भारी दुःख झालें. त्यानें भवानीला सहानुभूति दाखविली आणि शेवटीं म्हटलें, "भवानीबाई, तुमचा विचार मला शहाणपणाचा वाटतो. रडत न बसतां आणि छाती बडवून न घेतां तुम्ही तत्काळ योग्य विचार ठरविला आणि स्वतः केंजळगडाकडे जावयाला सिद्ध झालां, हें तुमचें प्रसंगावधान पाहून मला कौतुक वाटत आहे. असो. तुमचा विचार मला योग्य वाटतो. मी तुम्हां दोघींना दोन घोडे देतों; इतकेंच नव्हे तर तुमच्या-बरोबर मीही केंजळगडाकडे येतों. माझी तुम्हांला सोबत होईल आणि कदाचित् माझा उपयोगही तुम्हांला होईल.

यावर भवानीबाईनें योग्य शब्दांनीं त्याचे आभार मानले आणि त्याची सोबत आनंदानें स्वीकारली.

मग आपापल्या घरांच्या योग्य तजविजी लावून हीं तीन माणसें घोड्यांवर बसून गांवाच्या वेशीपाशीं आलीं. तेथील रखवालदाराला घडलेली हकीगत आणि पुढचा बेत सांगतांच त्यानें दरवाजा उघडून दिला. हीं तीन माणसें बाहेर पडलीं, आणि केंजळगडाच्या रोखानें त्यांनीं आपले घोडे पिटाळले.

त्या काळीं प्रवासाचें मुख्य साधन घोडा असल्याकारणानें प्रत्येक पुरुषाला, आणि प्रत्येक स्त्रीला, घोड्यावर बसण्याचा सराव असे हें सांगणें नलगे.

नांदेडहून केंजळगडाकडे जावयाच्या रस्त्यावर एकाच वेळीं तीन भिन्न भिन्न उद्देशांनीं प्रवास करणारीं तीन प्रकारचीं माणसें होतीं. आफताब आणि किसमत हे दोन चोर चोरीच्या मालापैकीं कांहीं माल काढून बाजूला ठेवण्याच्या उद्देशानें केंजळगडाच्या जवळ असलेल्या असेंखवलीला जात होते. त्यांना गांठून त्यांच्या लबाडीचें माप त्यांच्या पदरांत घालून आपला योग्य तो हिस्सा घ्यावयाच्या उद्देशानें बंडोबा त्यांच्यामागून चालला होता; आणि सर्वांच्या पाठीमागून भवानी, मुक्ताबाई आणि दयाळसिंग हीं तीन माणसें चोरीची हकीगत महेश्वराला सांग-ण्याच्या उद्देशानें केंजळगडाकडे निघालीं होतीं. ह्या एकंदर सहा माणसांचे उद्देश किती अंशानें सफल झाले हें योग्य वेळीं आम्ही वाचकांना कळवूंच.

---

## प्रकरण ३२ वें.

# चोरीचा माल.

शुक्रवारच्या सबंध रात्रभर विश्रांति घेऊन ताजे तवाने झालेल्या मराठे वीरांच्या कांहीं टोळया हिंडावयाला गेल्या; कांहीं टोळ्या गतगोष्टींबद्दल आणि आगामी गोष्टींबद्दल गप्पा मारावयाला गडावर ठिकठिकाणीं बसल्या. शिवाजी, एसाजी, तानाजी, बाजी हे वीर नबाबाच्या वाड्याच्या एका दालनांत बसून आतां पुढें काय व्यवस्था करावी ह्यासंबंधानें वाटाघाट करीत होते.

पांडोबा, जानोजीराव, रामराव, दादा, वगैरे वयस्कर मंडळी दुसऱ्या एका दालनांत बसून एकमेकांची दृढतर ओळख करून घेत होते.

दुसऱ्या एका दालनांत नांदेडकर लोक, महेश्वर, पुंडरीक, सदाशिव, मल्हारी आणि गोपीनाथ हे बसलेले होते. त्यांच्या गतगोष्टींबद्दल गप्पा चाललेल्या होत्या. त्यांच्या गप्पा ऐन रंगांत आल्या होत्या, तों तेथें नांदेडकडचीं तीन माणसें आलीं. भवानीबाई, मुक्ताबाई आणि दयाळसिंग हीं तीं तीन माणसें होतीं.

भवानीबाई, मुक्ताबाई आणि दयाळसिंग, हीं तीन माणसें पुढं आलेलीं पाहातांच महेश्वर आणि पुंडरीक यांना आश्चर्य वाटलें. तेव्हां महेश्वर आपल्या बायकोकडे दृष्टि करून तिला म्हणाला, "अग, ह्या वेळीं तूं इकडे कशी? तुझी मुद्रा दुःखी दिसत आहे; आणि ही मुक्ताबाई तुझ्याबरोबर? आणि हे दयाळसिंगही तुमच्याबरोबर? आहे काय प्रकार?"

त्यावर भवानी म्हणाली, "काय सांगूं? घात झाला!" असें बोलत असतां तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले आणि तिच्यानें पुढें बोलवेना. आईला रडतांना पाहून पुंडरीकाला भारी दुःख झालें आणि तो म्हणाला, "आई, रडतेस कां? काय झालें?"

तेव्हां महेश्वरानें दयाळसिंगाला विचारलें, "दयाळसिंग, हा काय प्रकार आहे?"

तेव्हां दयाळसिंग म्हणाला, "बाबा, काल तुमच्या घरीं चोरी झाली. तुमचें जें कांहीं होतें तें सगळें चोरीस गेलें. तुमच्या कानावर ही गोष्ट ताबडतोब घालावी म्हणजे तुम्ही कांहीं तजवीज कराल, म्हणून ह्या भवानीबाई ह्या मुक्ताबाईंना सोबतीला घेऊन तुमच्याकडे यावयाला निघाल्या. त्या मजकडे घोडे मागावयाला आल्या तेव्हां सर्व प्रकार मला कळला. मग मी त्यांना घोडे देऊन

त्यांच्याबरोबर कोणी तरी पुरुष माणूस असलें तर बरें म्हणून मीही यावयाला निघालों. ”

हें दयाळसिंगाचें भाषण ऐकून महेश्वर आणि पुंडरीक ह्यांना भारी दुःख झालें; आणि तपशील ऐकण्यासाठीं ते उत्सुक होऊन राहिले. परंतु खुद्द भवानीबाई सुरक्षित आहे हें पाहून त्यांना आनंद झाला. तेव्हां महेश्वर आपल्या बायकोला म्हणाला, “ अग, चोरी झाली तर होऊं दे. चोरीचा तपास लावतां येईल; आणि तपास लागला नाहीं तरी हरकत नाहीं. पण तुला त्यांनीं मारहाण केली नाहीं ना ?”

तेव्हां भवानीबाई मनोनिग्रहानें आपलें दुःख आवरून म्हणाली, “ मला कांहीं त्यांनीं हाणमार केली नाहीं. काल मी घरांत एकटीच होतें. संध्याकाळचें माझें जेवण झाल्यावर मी आवराआवर केली आणि निजावयाला माझ्या नेहमींच्या जागीं गेलें. मला लवकरच गाढ झोंप लागली. सुमारें दीड प्रहर रात्र झाली असेल तों माझ्या कानावर दगडावर दगड आपटल्याचा आवाज एकदां, दोनदां, तीनदां आला. हा कसला आवाज आहे तो पहावा म्हणून मी दिवा लावून घेऊन आवाज ज्या दिशेकडून आला होता तिकडे गेलें, आणि पहातें तों आपल्या त्या संदुकीच्या खोलीच्या भिंतीला भगदाड पडलें आहे, संदुकीचें झांकण उघडलेलें असून तें मागल्या भिंतीला टेंकून ठेवलें आहे, असें माझ्या दृष्टीस पडलें. मग मी संदुकींत डोकावून हातानें चाचपून पाहिलें तों मला फक्त कागदपत्रांचीं दफ्तरें आढळलीं. सगळीं चिरगुटें, दागिने, किडुकमिडुकाचीं गांठोडीं, बोचकीं, डबे, वगैरे सर्व कांहीं नाहींसें झालें होतें. तेव्हां मी ही वर्दी तुम्हाला लवकर द्यावी म्हणून इकडे आलें. माझ्या सोबतीला ह्या मुक्ताबाईनें येण्याचें कबूल केलें, आणि आम्ही घोडे मागावयासाठीं ह्या दयाळसिंगाकडे गेलों तेव्हां तेही आमच्याबरोबर आपखुषीनें यावयाला निघाले.”

त्यावर महेश्वर म्हणाला, “अग, चिरगुटें आणि दागिने चोरीस गेले तर जाऊं देत. परंतु तुला त्या चोरांनीं मारहाण केली नाहीं ही मी देवाची कृपा समजतों.”

तेव्हां भवानी म्हणाली, “ही देवाची कृपा आहे असें मीही समजतें. मला त्या सणगांची आणि दागिन्यांची पर्वा वाटत नाहीं. पण ती हिऱ्याची अंगठी, ती तायती, तो किनखाबी अंगरखा, ती जरीची टोपी, ती पैठणी, हे जिन्नस गेले त्याचें मला भारी दुःख होत आहे.”

हे बायकोच्या तोंडचे शब्द ऐकून महेश्वराला दुःख झालें आणि तो कपाळावर हात मारून घेऊन निराशेच्या स्वरानें म्हणाला, “ हे देखील जिन्नस गेले अं ?

बरें जाऊं देत ! आपला त्याला इलाज नाहीं ! ते जिन्नस गेले ना ? ईश्वराची इच्छा ! ”

असा उद्गार काढून महेश्वर उद्वेगानें म्हणाला, “ बरें, झालें तें ठीक झालें, मी आतां पुढें काय करावयाचें तें ठरवितों. तूं आणि मुक्ताबाई अशा दोघी जणी कोंडीबाच्या घरीं जा. त्यांची बायको तुमची सगळी तजवीज लावून देईल. जा, पुंडरीक, ह्या दोघींना कोंडीबाच्या घरीं नेऊन पोंचीव, आणि तुम्ही दयाळसिंग, तुम्ही काय करतां ? हा केंजळगड शिवाजी महाराजांनीं जिंकून घेतला हें तुम्हाला कळलेंच असेल ? आतां ह्या गडावर मराठ्यांचा अंमल सुरू होणार ! ”

दयाळसिंगानें उत्तर दिलें, “ होय, तें मीं ऐकलें, उत्तम गोष्ट झाली ! पण मला शिवाजीचें दर्शन करून द्या.”

तेव्हां महेश्वर तेथून उठून दयाळसिंगाला बरोबर घेऊन कांहीं पावलें गेला आणि अंगुलिनिर्देश करून म्हणाला, “ हे शिवाजी, हे तानाजी, हे एसाजी, हे बाजी.”

दयाळसिंगानें त्या वीरांना यथोचित वंदन केल्यावर त्यांच्यांत कांहीं विचारपूस होणार होती, इतक्यांत तेथें आठ मावळ्यांनीं गराडलेले दोन मुसलमान आणले गेले. ह्या दोन मुसलमानांच्या डोक्यांवर दोन पडशा होत्या. मावळे गड्यांचा मुकादम पुढें होऊन शिवाजीला म्हणाला, “ हे दोन मुलमान कोठून तरी चोरी करून आलेले असावे अशा संशयावरून आम्हीं त्यांना पकडलें. ते असेंखवलीच्या दिशेनें चालले होते. आम्ही त्यांना केंजळगडाच्या हद्दींतच पकडलें. त्यांच्या मागून एक मराठा आला तो हा माल माझा आहे तो मला मिळाला पहिजे असें म्हणत आला, त्यालाही आमच्या मंडळींनीं पकडून ठेविलें आहे. ह्या दोन मुसलमानांची चौकशी होत आहे, इतक्यांत त्या मराठ्याला त्याचे रखवालदार तेथें घेऊन येतील. ”

हें त्या मोकद्दमाचें भाषण ऐकून शिवाजीनें त्यांच्याकडे भेदक नजरेनें पाहून त्यांना विचारलें, “ कायरे मुसलमानांनों, तुमचीं नांवें काय आणि हा तुमच्या डोक्यांवरचा माल तुम्ही चोरी करून आणलेला आहे काय ? ”

आपल्या भोंवतालीं विजयशाली मराठ्यांचा गराडा पडलेला आहे असें पाहून ते मुसलमान घाबरले. येथें आपला वाली कोणी नाहीं असें पाहून खरें बोलण्यानेंच झाला तर थोडासा आपला बचाव होईल, आणि आपणाला शिक्षा करतांना थोडी तरी दया दाखविली जाईल, असा विचार मनांत आणून ते खरें सांगावयाला सिद्ध झाले. मग त्यांच्यापैकीं एक म्हणाला, “माझें नांव आफताबखान. ”

आपल्या गुन्हेगार दोस्ताचें उदाहरण पाहून दुसरा मुसलमान म्हणाला, "माझें नांव किसमतखान."

त्यावर शिवाजी म्हणाला, "तुम्ही जर खरी खरी हकीगत सांगाल तर तुम्हाला शिक्षा करतांना आम्ही थोडीशी दया दाखवूं. तुम्ही एक शब्द जरी खोट्याचा सांगितला, तरी आम्हाला खपणार नाहीं. आफताबखान, तूं सांग सगळी हकीगत, आणि तूं किसमतखान, तुझ्या साथीदारानें कांहीं कमी सांगितलें तर तूं तेवढी भर घाल, आणि कांहीं खोटें सांगितलें तर त्याची जेव्हांच्या तेव्हांच दुरुस्ती कर. अगदीं खरें खरें जें कांहीं असेल तें सांगा."

याप्रमाणें शिवाजीचा हुकूम ऐकून आफताब म्हणाला, "आम्ही दोघांनीं हा माल नांदेडच्या महेश्वराचें घर फोडून आणि त्याची संदुक उघडून चोरून आणलेला आहे."

शिवाजीनें विचारलें, "होय कारे किसमतखान ?"

किसमतखान म्हणाला, "होय महाराज."

हे त्याचे शब्द ऐकून महेश्वराच्या जिवांत जीव आला. पुंडरीक, जो तेथें आला होता,—त्याला आनंद झाला. दयाळसिंग आणि इतर लोक,—जे तेथें हजर होते,—त्यांना समाधान वाटलें. तेव्हां शिवाजी महेश्वराला म्हणाला, "बाबा, त्या पडशा सोडून पहा, तो तुमचाच माल आहे किंवा नाहीं." मग दोघां चोर मुसलमानांकडे पाहून शिवाजी म्हणाला, "तुम्ही जितका माल चोरला, तितका सगळा त्या दोन पडशांत आहे किंवा कांहीं माल त्यांतून काढून घेतला आहे ?"

त्यावर आफताब म्हणाला, "नाहीं महाराज. सगळा माल त्या दोन पडशांत आहे."

किसमत म्हणाला, "महाराज, आम्ही त्यांतून एक तनसडीही बाहेर काढली नाहीं."

शिवाजीच्या सांगीवरून महेश्वर त्या पडशा उपसून पहावयाला गेला. बापाच्या सांगण्यावरून पुंडरीक आपल्या आईला ही वर्दी देण्यासाठीं आणि सांपडलेला माल तपासून घेण्यासाठीं तिला कोंडीबाच्या घरून बोलावून आणावयाला गेला. भवानी आनंदित होऊन धांवत आली. मग महेश्वर आणि त्याची बायको या दोघांनीं दोन पडशांत कोंबलेलीं बोचकीं बाहेर काढलीं. मग प्रत्येक गांठोडें, पुडुंडी, डबा, बासन, वगैरे खोलून त्या दोघांनीं प्रत्येक वस्तु तपासून ती आपलीच आहे

म्हणून ओळखिली. त्या दोघांना आपला माल सांपडला, प्रत्येक वस्तु सांपडली, म्हणून जो आनंद झाला, तो अवर्णनीय आहे. ज्या विशिष्ट वस्तु ह्या पतिपत्नींना स्मारक वस्तु ह्या दृष्टीनें प्रिय होत्या त्या सांपडल्या हें पाहून त्यांना किती आनंद झाला असेल ह्याची कल्पना करणें आम्ही वाचकांवर सोपवितों.

हा माल तपासण्याचा विधि चाललेला असतां महेश्वर आणि भवानी आणि पुंडरीक अशीं तीनच माणसें त्या पडशांच्या जवळ होतीं. इतर माणसांना त्यांत कांहीं समजण्याजोगें नव्हतें, म्हणून ते ह्या तीन माणसांपासून दूर उभे होते.

असो. माल तपासण्याचें काम संपल्यावर महेश्वरानें तो माल पुन्हां काळजी-पूर्वक बांधून पडशांत घातला. मग त्या दोन्ही पडशा बापलेकांनीं उचलून आणून शिवाजीच्या पुढें ठेवल्या. मग महेश्वर शिवाजीला आनंदाच्या स्वरानें म्हणाला, " आबा, देवानें खैर केली. माझा सगळा माल सांपडला. एकही सणंग, एकही दागिना गमावलेला नाहीं. माझी एक तनसडीही गेली नाहीं. देवानें खैर केली."

त्यावर शिवाजी म्हणाला, "मी आरंभिलेल्या देशकार्याला तुम्हीं बापलेक मदत करावयाला इकडे यावें, आणि तिकडे तुम्हाला चोरीनें ठोकर बसावी, ही गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली असती. पण तसें कांहीं झालें नाहीं, आणि तुमचा माल तुम्हाला सांपडला, हें पाहून मलाही तुमच्या इतकाच आनंद होत आहे."

तानाजी म्हणाला, "जे लोक देशकार्यांत पडतात, त्यांचें आरंभीं जरी कांहीं नुकसान झालेंसें दिसलें, तरी पुढें त्यांना लाभ होतोच होतो."

एसाजी म्हणाला, " निदान त्यांच्या जन्माचें सार्थक तरी होतें."

बाजी म्हणाला, "बाबा, प्रथम नुकसान झाल्याचा भास होऊन नंतर तो भास खोटा ठरावा ही खरोखर शुभ गोष्टच होय."

दादा म्हणाला, " आणि एकदां शुभाचा मुहूर्त झाला म्हणजे पुढें एकसारख्या शुभ गोष्टीच होत जातात असें ज्योतिषी म्हणतात."

महेश्वर म्हणाला, " तर मग तुमच्या मताप्रमाणें माझ्या अनुभवाला आणखी कांहीं शुभ गोष्टी येतील असें तुमचें म्हणणें आहे काय ?"

त्यावर शिवाजी म्हणाला, " प्रत्यक्ष तुमच्या अनुभवाला त्या शुभ गोष्टी न येतां तुमच्या मित्रांच्या अनुभवाला शुभ गोष्टी आल्या तरी एकच. तुम्हाला त्या शुभ गोष्टींनीं देखील आनंद होईलच !"

त्यावर महेश्वर म्हणाला, "अलबत मला आनंद होईल. माझ्या प्रत्येक मित्राच्या वांट्याला एक एक शुभ गोष्ट आली तर मजा होईल."

शिवाजी म्हणाला, "देवानें मनांत आणलें तर तसेंही होईल. तुम्हाला जशी एक शुभ गोष्ट झाली, तशी एक दादांना, एक धोंडीबाला, एक पुंडरीकाला, एक आणखी कोणाला तरी, अशा रीतीनें ही शुभांची मालिका खूब लांबच लांब होईल."

हीं विनोदी भाषणें चाललीं असतां पांच सहा मावळयांनीं गराडलेला एक इसम तेथें आला. ह्या मावळ्यांच्या मोकद्दमानें शिवाजीला म्हटलें, "त्या दोन मुसलमानांनीं चोरलेला माल माझा आहे असें हा इसम म्हणत आहे. हा आपल्या केंजळगडाच्या हद्दींत आला असतां त्याला आम्ही गिरफदार केलें."

शिवाजी वगैरे मंडळींनीं ह्या नवीन आलेल्या इसमाकडे नजर टाकली. दादानें त्याच्याकडे नजर टाकतांच दादाच्या चेहेऱ्यावर दुःखाची मुद्रा दिसली, आणि त्या आलेल्या इसमाची नजर दादाच्या मुखावर जातांच त्या इसमाची नजर दुःखानें, लाजेनें, भीतीनें, भारी केविलवाणी दिसूं लागली. परंतु दादा आणि हा नवा इसम ह्यांच्या मुद्रा एकमेकांना पाहून विलक्षण रीतीनें पालटल्या, ही गोष्ट तेथें गोळा झालेल्या फारच थोड्या लोकांच्या लक्ष्यांत आली होती, किंवा आली असती, तरी तिचें कांहीं महत्त्व नाहीं असें त्यांना वाटलें असतें.

इतकें झाल्यानंतर पुन्हां आफताबखान आणि किसमतखान ह्यांच्या चौकशीला सुरवात झाली. नवीन आणलेल्या कैद्याकडे बोट दाखवून शिवाजी त्या दोन खानांना म्हणाला, "ह्या इसमाला तुम्ही ओळखतां काय? ह्या दोन पडशांतील माल आपला आहे असें हा इसम म्हणत आहे. ह्यावर तुमचें काय म्हणणें आहे? ह्या इसमाचें नांव काय? ह्याचा आणि तुमचा संबंध काय?"

त्यावर आफताबखान म्हणाला, "ह्या इसमाला आम्ही दोघेही ओळखितों. ते उंबरवाडीचे राहणारे. त्यांचें नांव बंडोबा, पूर्वी त्यांचें दुसरें कांहीं नांव होतें असें म्हणतात. पण तें नांव आम्हाला ठाऊक नाहीं. आमचा धंदा चोऱ्या करणें, दरवडे घालणें, असा असून बंडोबांचा धंदा चोरीचा माल पचविणें असा आहे. दागिन्यांचीं रूपांतरें करणें, सोन्या चांदीचे दागिने आटविणें, जरीचीं कापडें जाळून त्यांतून सोनें, चांदी काढून त्यांच्या गोट्या करणें, ह्या कामांत ते वाकबगार आहेत, म्हणून आम्हाला वारंवार त्यांच्याकडे जावें लागतें. चोरलेल्या मालावर बंडोबांना जी शेंकडावळ ठरलेली आहे, तितकी त्यांना दिली म्हणजे जिकीरीचें काम ते करतात. तसेंच आमच्या कामांत आम्हाला माणसें किंवा घोडे

वगैरेंची जरुरी लागली तर ते ती भागवितात. एका माणसाला किंवा एका घोड्याला एका दिवसाच्या भाड्याबद्दल आम्ही त्यांना ठरलेल्या निरखाप्रमाणें पैसे देतों. अशा रीतीनें त्यांचा उपयोग आम्हाला होतो, आणि आमचा उपयोग त्यांना होतो. ”

ही हकीगत आफताब सांगत असतां बंडोबाच्या मुखावर रागाची, निराशेची, दुःखाची, वैतागाची, अशा भिन्न भिन्न विकारांच्या लकेऱ्या उमटत होत्या. ही हकीगत ऐकत असतां दादाला अतोनात दुःख होत होतें, पण तें त्यांच्या मुद्रेवर फारसें दृग्गोचर होत नव्हतें.

असो. आफताबनें बंडोबाशीं आपला कोणच्या प्रकारचा संबंध आहे हें सांगितल्यावर शिवाजी त्याला म्हणाला, “ आफताबखान, ह्या बंडोबाशीं तुमचा काय संबंध आहे तें आम्हाला तुम्हीं सांगितलें. पण महेश्वराच्या घरीं तुम्हीं चोरी केली त्या चोरीची हकीगत सांगा.”

तेव्हां आफताबनें ती हकीगत सांगितली,“काल महेश्वराच्या घरांत कोणी पुरुषमाणूस नाहीं अशी संधी साधून आम्ही त्यांच्या घरीं चोरी करावयाचा निश्चय करून बंडोबापासून चार घोडे आणि दोन गडी भाड्यानें मागावयासाठीं गेलों. त्यांच्या आमच्या शर्ती ठरल्या. शर्तीप्रमाणें त्यांनीं आम्हाला माणसें आणि जनावरें दिलीं. आम्ही दोघांनीं घराची भिंत फोडून चोरी केली. पण आम्हां दोघांच्या मनांत बंडोबाला फसवावयाचा विचार असल्याकारणानें आम्ही कांहीं माल असेंखवली येथें आमच्या घरीं लपवून ठेवून बाकीचा माल बंडोबाकडे घेऊन जाणार होतों. परंतु आमच्या लबाडीचा त्यांना संशय आला असावा म्हणून ते आमच्या पाळथीवर राहून आम्ही उंबरवाडीचा रस्ता सोडून इकडे येत आहों हें पाहून आमचा पाठलाग करूं लागले. त्याचा शेवट असा झाला कीं आम्ही दोघे आणि बंडोबा असे सगळे तुमच्या तावडींत सांपडलों. ही हकीगत अगदीं खरी आहे. ह्यांत खोट्याचा लवलेश नाहीं. आम्हांला माफ करून दया दाखवा अशी आमची विनंती आहे.”

किसमत म्हणाला, “ ही हकीगत अगदीं खरी आहे. आपण कबूल केल्याप्रमाणें आम्हाला दया दाखवा.”

ती हकीगत ऐकून शिवाजीनें कांहीं वेळ स्वतांशीं विचार केला. मग तानाजी वगैरेंचा सल्ला घेऊन तो आफताबखान आणि किसमतखान ह्यांना म्हणाला,

“ तुमची हकीगत आम्ही ऐकिली. आतां आम्ही पुढें काय करावयाचें तें ठरवूं. तोंपर्यंत तुम्हां दोघांना आम्ही अटकेंत ठेवूं.”

त्यावर ते दोघे खान म्हणाले, “ जशी आपली मर्जी. ”

त्यानंतर खानांना त्यांच्या रखवालदारांनीं केंजळगडावरील एका कोठडींत घालून तिच्यावर पाहारा उभा केला.

यानंतर शिवाजी बंडोबाकडे नजर करून म्हणाला, “ आतां तुमची हकीगत आम्ही ऐकून घेतों. खरें जें कांहीं असेल तेंच सांगा. आमच्या केंजळगडाच्या हद्दींत तुम्ही आलां म्हणून तुमचा इनसाफ करण्याचा अधिकार आम्हांला पोंचतो. तुमची हकीगत काय ती सांगा.”

हें शिवाजीचें भाषण ऐकून बंडोबानें आपली हकीगत सांगण्याला सुरवात केली. ती हकीगत आम्ही वाचकांना पुढच्या प्रकरणीं सादर करूं.

---

## प्रकरण ३३ वें.

# बंडोबाचें पूर्ववृत्त.

बंडोबा म्हणाला, “ मला ह्या गडाच्या पायथ्याशीं तुमच्या लोकांनीं गिरफदार केलें, आणि तुमच्या पुढें चौकशीसाठीं मला उभें करूं असें बजावलें, तेव्हां मी शक्य तितकें कमी खरें सांगावें असा निश्चय आपल्या मनाशीं करून ठेवला होता. जी गोष्ट कबूल करणें भाग पडेल, तीच गोष्ट कबूल करावी, जितक्या गोष्टी दड-वितां येतील तितक्या दडवाव्या, जितक्या खोट्या गोष्टी पचणें शक्य दिसेल तितक्या खोट्या गोष्टी तुम्हाला सांगाव्या, असा बेत मी मनांत करून ठेवला होता. परंतु आतां तुमच्यापुढें उभा राहतांच माझा बेत ढांसळला. त्याचें एक कारण हें कीं माझे हे दोघे साथीदार,—आफताबखान आणि किसमतखान,— यांनीं माझें बरेंच काळेंबेरें चरित्र तुम्हाला सांगितलें, तें नाकबूल करणें मला शक्य वाटलें नाहीं; आणि दुसरें कारण असें, कीं ह्या दादांना पाहातांच माझ्या मनाला पश्चात्ताप झाला,—अनिवार पश्चात्ताप झाला. त्यांना मी व्यर्थ छळिलें, त्यांच्या मनाला व्यर्थ दुःख दिलें, त्यांच्या सर्व सुखांत मी माती कालविली, असें माझ्या मनांत येऊन माझ्या पातकांची यादी बोलून दाखवावयाला मी सिद्ध झालों आहें. मी आतां सगळें सत्य तुम्हाला सांगतों. मीं आपलें एकही बदमाष कृत्य लपवून ठेवणार नाहीं. माझी हकीगत ऐकून तुम्हाला असें वाटेल कीं, जगांत

जो अत्यंत पापी मनुष्य असेल तो मी आहें. यमपुरीमध्यें अत्यंत भयंकर यातनांना कोणी मनुष्य पात्र असेल तर तो मी आहें!"

शिवाजीनें विचारलें, "ह्या दादांना पाहतांच तुला अशी उपरीत होण्याचे काय कारण ?"

बंडोबा म्हणाला, "हे दादा माझे वडील बंधू आहेत. त्यांचे मी अनंत अपराध केले आहेत. गेल्या आदित्यवारीं ते उंबरवाडीस आले होते. तेव्हां त्यांना मी ओळखलें नाहीं. कारण, त्या वेळीं त्यांनीं लांब दाढी राखलेली होती, आणि डोक्यावर जटा वाढविलेल्या होत्या. सोळा वर्षांनीं ते एकदम आणि अकल्पित रीतीनें माझ्यापुढें येऊन उभे राहिले; त्यामुळें मी त्यांना बिलकूल ओळखिलें नाहीं, आणि अत्यंत कठोरपणानें आणि असभ्यपणानें त्यांच्याशीं बोललों. त्यांच्या मुलाबद्दल मी कठोरपणानें बोललों, याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी. दादा, माझे अपराध पोटांत घालून मला क्षमा करा."

असें म्हणून बंडोबानें दादाच्या पायांवर डोकी ठेविली.

तेव्हां दादा त्याला म्हणाले, "विसू, मी तुला क्षमा करतों. तुला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप वाटत आहे, हें पाहून मला भारी समाधान वाटत आहे. विसू, ऊठ, मी तुला क्षमा करतों. ऊठ."

असें म्हणून दादांनीं त्याला प्रेमानें उठविलें. मग तो योग्य ठिकाणीं बसल्यावर दादांनीं त्याला विचारलें, "विसू, तूं जीं पापें केलीं आहेस त्यांबद्दल तुला पश्चात्ताप होत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. त्या पापांबद्दल आतां बोलण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु मला एका गोष्टीबद्दल तुला खुलासा विचारावयाचा आहे. मी गेल्या आदित्यवारीं तुला माझ्या धाकट्या मुलासंबंधानें कांहीं प्रश्न विचारले, त्यांचीं तूं धड उत्तरें दिलीं नाहींस. तो मुलगा मृत झाला इतकेंच तूं मला सांगितलेंस. पण तो कोणत्या आजारानें मृत झाला हें तूं मला सांगितलें नाहींस. तें जाणावयाची माझी इच्छा आहे."

त्यावर बंडोबा म्हणाला, "तुमचा मुलगा मेला असें मी तुम्हाला सांगितलें पण तें बरोबर नव्हतें. तो मुलगा मेला असला पाहिजे असा माझा पक्का भरंवसा होता; म्हणून मीं तुम्हाला तसें सांगितलें. परंतु खरोखरीं मी त्याला मेलेला पाहिल्याही नाहीं किंवा तो मेला असेंही मला कोणी सांगितलें नाहीं."

दादांनीं विचारलें, "म्हणजे काय ?

तेव्हां बंडोबा म्हणाला, " मी त्याला अशा स्थितींत टाकून दिलें कीं तो जगणें,—निदान फार दिवस तरी जगणें,—शक्य नव्हतें. त्यावरून तो मेला असला पाहिजे अशी माझी खात्री आहे."

दादांनीं विचारलें, " तूं त्याला निवडुंगाच्या वनांत टाकलेंस, कीं वाघाच्या जाळींत टाकून पळून आलास कीं काय ? तूं त्याचें केलेंस तरी काय ? "

तेव्हां बंडोबा म्हणाला, " तुम्हाला सगळें वृत्त पूर्वींपासून सांगितल्याशिवाय तुमचा उमज पडणार नाहीं. सांगतों ऐका. तुमचा थोरला मुलगा वैजनाथ हा वीस वर्षांचा मरण पावला, तेव्हां तुम्हाला भारी दुःख होऊन तुम्हीं एक वर्षभर केंजळगडाचीं कामें स्वतः न पाहतां मजवर सोपविलीं. एक वर्षांत तुमचें पुत्रशोकाचें दुःख अणुभरही कमी न झाल्याकारणानें तुम्ही तीर्थयात्रा करून मनाला शांति मिळाली तर पाहावी म्हणून तुमच्या धाकट्या मुलाला,–म्हणजे सूर्याजीला, माझ्या हवालीं करून वहिनींसह काशीला गेलां. तुमची पाठ वळल्याबरोबर माझ्या मनांत पाप उत्पन्न झालें. केंजळगडाचा गडकरी होण्याची इच्छा माझ्या मनांत उत्पन्न झाली. तुमचा मुलगा माझ्या डोळ्यांत सलूं लागला. तो नाहींसा झाला तर माझ्या इच्छेच्या आड कोणी येणार नाहीं असें मला वाटलें. तो मरावा असें मला वाटूं लागलें. परंतु प्रत्यक्ष विष देण्याचें मला धैर्य होईना किंवा तरवारीनें त्याला मारून टाकण्याचेंही धैर्य मला होईना. म्हणून मी त्याला ह्या केंजळगडापासून चाळीस पन्नास कोशांवर रानांत सोडून देण्याचा निश्चय केला. त्याला रानांत टाकून देऊन परत केंजळगडावर यावें, आणि तो वाटेंत मेला असें गडावर सर्वांना सांगावें, असें मी मनांत ठरविलें. सोळा वर्षांमागें दिवाळी होऊन वीस पचवीस दिवसांनीं मी त्याला कुलदेवतेला भेटवून आणणार आहें असें ढोंग करून त्याला घोड्यावर घालून घेऊन निघालों. लोकांना माझ्या मनांतील पापविचारांबद्दल शंका येण्याचें कांहीं कारण नव्हतें. मी तुमच्या सूर्याजीला घोड्यावर माझ्यापुढें बसवून घेऊन गडांतून एकटाच बाहेर पडलों. "

मुक्ताबाई तावरे,—जी भवानीबाईच्या शेजारीं बसलेली होती,–ती म्हणाली, " तुम्ही गडकरी असतांना त्या धाकट्या मुलाला संभाळण्याच्या कामावर मी होतें. त्याचें खाणें पिणें, कपडे लत्ते, त्याला फिरावयाला नेणें, गोष्टी सांगून रमविणें, हीं माझीं कामें असत. तें पोरगें भारी गोड आणि खेळकर होतें. मला तें भारी आवडत असे. तुम्ही त्याला घोड्यावर घालून नेलें तेव्हां त्याची तयारी मींच केली. त्याला कपडे घालून तीट लावून, काजळ गालबोट लावून मींच सजविलें

होतें. आतां आपण घोड्यावर बसून फिरावयाला जाणार म्हणून त्याला भारी आनंद झाला होता. तुम्ही त्याला घेऊन गेलां, तो दिवस कार्तिक वद्य चतुर्दशीचा होता. दुसऱ्या दिवशीं देवाची दिवाळी होती हें मला पक्कें आठवतें. तुम्ही त्या मुलाला घेऊन गेलां त्या दिवशीं सोमवार होता. नव्हे का ? "

त्यावर बंडोबा म्हणाला, " तो नक्की दिवस मला आठवत नाहीं. पण तूं जर त्या मुलाला संभाळण्याच्या कामावर होतीस, तर तुला आठवतो तो दिवस खरा असेल. ही गोष्ट दिवाळीनंतर वीस पंचवीस दिवसांनीं घडली इतकेंच मला आठवतें. तुझाही चेहरा मला नक्की आठवत नाहीं. असो. मी त्या मुलाला घोड्यावर घालून गडाच्या बाहेर पडलों. थोडक्याच वेळानें आम्हाला पाऊस लागला. आम्ही दोघेही खुलते पुतणे भिजून गेलों. परंतु मी न थांबतां तसाच पुढें गेलों. मग रात्रीं आम्ही एका मारुतीच्या देवळांत थोडासा फराळ करून निजलों. सकाळीं उठून मी त्या मुलाला घेऊन पुढें गेलों. परंतु वाटेंत झिमझिम पाऊस आम्हाला लागल्याकारणानें आणि मुलगा कंटाळल्याकारणानें मला फारशी मजल मारतां आली नाहीं. संध्याकाळीं खूप जोराचा पाऊस आला. विजा कडकडूं लागल्या. तेव्हां कोठें तरी निवाऱ्याच्या जागीं उतरणें भाग पडलें; तेव्हां मी एका गांवांत शिरलों. पहिलेंच जें घर मला आढळलें, त्या घराच्या अंगणांत मुलाला घेऊन उतरलों. त्या घरांत एक मनुष्य होता, त्याला रात्रींच्या मुक्कामासाठीं मला पडवींत जागा द्याल का म्हणून विचारलें. तो 'खुशाल उतरा येथें,' असें मला म्हणाला. तेव्हां मी त्याला म्हटलें, " आम्ही दोघे पावसानें भिजलों आहों. मला कांहीं खावयाचें प्यावयाचें नाहीं. ह्या मुलाला थोडेंसें दूध पाजलें म्हणजे झालें. मी घोड्याचें खोगीर आणि लगाम उतरून येतों, असें म्हणून मी त्या घरांतून बाहेर पडलों. त्या वेळीं आकाशांत गडद अंधकार होता. घरांत दिवा लावलेला नव्हता. म्हणून त्या माणसाचा चेहरा मला चांगलासा दिसला नाहीं. माझाही चेहेरा त्याला दिसला नाहीं. घोड्याचें खोगीर आणि लगाम उतरण्यासाठीं म्हणून जो मी बाहेर पडलों, तो पडलोंच ! पुन्हां मागें वळून मी पाहिलें नाहीं. घोड्याला टांच मारून मी घोडा भरधांव फेकला. तो गांव मागें टाकल्यावर मी वाटेंतील एका देवळांत रात्रीं निजलों. मला जोराचा ताप आला, पण घाम येऊन तो उतरला. मग दुसऱ्या दिवशीं गडाची वाट धरून चालूं लागलों. मी परत केंजळगडावर एकटाच आलों. वाटेंत आम्हाला पावसानें भिजविलें, मुलाला बेसुमार ताप आला, मुलगा मेला व मी त्याला जाळला असें सर्वांना मी सांगितलें. सर्वांना तें खरें वाटलें.

पुढें त्या मुलाचें काय झालें तें मला कळलें नाहीं, आणि तें कळून घेण्याचा मीं प्रयत्नही केला नाहीं. मला जसा ताप आला तसा त्यालाही आला असेल असें मला वाटलें. तिऱ्हाइताच्या मुलाला कोण औषधपाणी करणार ? ज्या माणसाच्या पुढें मीं त्या मुलाला उभा केला, त्यानें त्याची कांहीं देखील काळजी घेतली नसेल आणि तो मुलगा खास मेला असेल असा अझून माझा भरंवसा आहे."

दादा डोळ्यांत आसवें आणून रागानें म्हणाला, " चांडाळा, तू फार भयंकर राक्षसी कृत्य केलेंस ! तूं उलट्या काळजाचा आहेस ! हाय, हाय !"

महेश्वर म्हणाला, " बंडोबा, तुम्हीं उलट्या काळजाचा माणूस जें करील तें केलें ह्यांत संशय नाहीं. परंतु जगांतील सारींच माणसें तुमच्यासारखीं उलट्या काळ-जाचीं नसतात. ज्या माणसाच्या पुढें तुम्हीं आपल्या पुतण्याला ठेवलें, त्यानें त्याला औषधपाणी केलें नसेल कशावरून ? "

दादानें विचारलें, " बरें विसू, तूं त्या मुलाला कोणच्या गांवीं सोडलेंस तें तुला सांगतां येईल ? त्या घरांत कोण रहात होता हें तुला ठाऊक आहे ? त्या माणसाचा चेहरा तूं ओळखशील काय ? त्याचें नांव तुला पूर्वी ठाऊक होतें काय ? किंवा तें नांव जाणून घेण्याचा तूं नंतर तरी कांहीं प्रयत्न केलास काय ?"

बंडोबा म्हणाला, " तो गांव वांझणी हा होता इतकेंच काय तें मला ठाऊक आहे. परंतु ज्याच्या हवालीं तो मुलगा मीं केला, त्याचें नांव, आडनांव, जात-गोत, चेहरा, वय, हें कांहीं मला ठाऊक नाहीं. त्या घरांत त्या वेळीं इतका अंधेर होता कीं, त्या माणसाची चेहेरेपट्टी किंवा वय वगैरे कांहीं देखील मला कळणें शक्य नव्हतें. त्या मुलाला बेमालूमपणें नाहींसें करावें, हा माझा उद्देश होता; तो उद्देश सिद्धीस गेला म्हणून मला मोठी धन्यता वाटली. मी पुन्हा वांझणीला कधींच गेलों नाहीं, आणि तो मुलगा नंतर किती दिवसांत मेला, ह्याचीही मी कधीं चौकशी केली नाहीं; किंवा मला त्याच्याबद्दल कोणीं वार्ताही सांगितली नाहीं. मी ह्या केंजळगडाचा अधिकारी झालों. मला कोणी शत्रु राहिला नाहीं, अशी धन्यता मानून मीं तुम्हाला काशीस पत्र पाठविलें. त्या पत्रांत तो तुमचा मुलगा मेल्याची मीं खबर दिली. मीं केलें तें फार वाईट केलें, पण झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. दादा, तुमच्या पुत्रशोकाला मी कारण झालों."

हें सर्व भाषण दादा मुकाट्यानें ऐकत होते. त्यांचा चेहरा अत्यंत खिन्न असा दिसत होता. त्यांच्याविषयीं सर्व लोकांना अत्यंत सहानुभूति वाटत होती.

बंडोबा बोलावयाचा थांबला, तेव्हां कांहीं वेळानें महेश्वर दादांना म्हणाला, " दादा, मी दाखवितों ते पदार्थ तुम्हाला कधीं पाहिलेसे वाटतात काय तें मला सांगा."

असें म्हणून महेश्वरानें दादांना आपल्या सामानाच्या दोन पडशांकडे नेलें. तेथें त्यांनीं कांहीं बोचकीं, गांठोडीं, डबे, वगैरे खोलून त्यांना कांहीं पदार्थ दाखविले. एक एक पदार्थ पाहून दादा आश्चर्यचकित होऊन उद्गार काढीत होता. एक आंगठी पाहून दादा म्हणाला, "ही आंगठी मला सासऱ्यानें दिवाळसणानिमित्त बक्षीस दिली होती. ती माझ्या माहितीची आहे. हा लहान किनखाबी अंगरखा मी ओळखतों. हें कापड मीं त्या माझ्या मुलासाठीं किसनसिंगापासून विकत घेतलें होतें. ही गिझनीची विजारही माझ्या त्या मुलाचीच. ही तायती त्या मुलाचीच. हा करगोटाही त्याच मुलाचा, ही जरीची टोपीही त्याच मुलाची, हा कमरबंधही त्याच मुलाचा, त्याच्या एका कोपऱ्यांत हीं रेशमी अक्षरें सू. मा. हीं माझ्या ओळखीचीं आहेत. तीं माझ्या घरकरणीनें कशियांत काढलीं होतीं. सू. म्हणजे सूर्याजी हें त्या मुलाचें नांव, आणि मा. म्हणजे मार्तंड हें माझें नांव. पण बाबा, हे पदार्थ तुम्हाला कोठें सांपडले ?"

महेश्वर म्हणाला, "सांगतों, जरा थांबा. मग मुक्ताबाई तावरे हिच्याकडे पाहून तो म्हणाला, "मुक्ताबाई, हे पदार्थ तुला ओळखतां येतात का पहा."

मग ते पदार्थ,—जे पूर्वी दादानें पाहून आपल्या मुलाचे म्हणून ओळखले होते,—ते पदार्थ मुक्ताबाईनें तपासून पाहिले आणि मग ती उद्गारली, "मी त्या दिवशीं मुलाची तयारी करून दिली त्या वेळीं मीं त्याच्या पायांत हीच विजार घातली होती, हाच अंगरखा त्याच्या अंगांत घातला होता, हाच कमरबंध त्याच्या कमरेला बांधला होता, हीच टोपी त्याच्या डोक्यावर घातली होती. हीच अंगठी त्याच्या अंगठ्यांत त्या वेळीं होती. हे बाकीचे पदार्थही त्या वेळीं त्याच्या अंगावर होते. हे पदार्थ सगळे माझ्या ओळखीचे आहेत. पण हे पदार्थ बाबा, तुमच्याजवळ कसे आले ?"

महेश्वर ह्या प्रश्नाला कांहीं उत्तर न देतां बंडोबाला म्हणाला, " बंडोबा, तुमच्या पुतण्याच्या अंगावरच्या कांहीं खुणा तुम्हाला आठवतात का ?"

बंडोबानें उत्तर दिलें, " तो मुलगा मला शत्रूसारखा वाटत होता. त्याच्याकडे मी आठ आठ दिवसांतही पाहात नसें. मग त्याला खेळविणें, त्याला मांडी-

वर घेणें, त्याच्याशीं बोलणें, हें तर दूरच ! त्याच्या अंगावर कांहीं खुणा होत्या किंवा नव्हत्या हें मीं कधीं पाहिलें नाहीं."

तेव्हां मुक्ताबाई म्हणाली, "मी त्या मुलाला खेळवीत असें, त्याला न्हाऊं घालीत असें, त्याला कपडे घालीत असें, त्यामुळें मला त्याच्या अंगावरची एक खूण आठवते."

महेश्वरानें विचारलें, "ती कोणची ?"

तेव्हां मुक्ताबाईनें उत्तर दिलें, "त्या मुलाच्या डाव्या मांडीवर आंतल्या बाजूस एक अर्धचंद्राकार तांबडा लास होता."

महेश्वरानें विचारलें, "मुक्ताबाई, तो लास कोठेंसा होता ?"

तेव्हां मुक्ताबाईनें आपल्या स्वतांच्या मांडीवर ती जागा दाखविली. मग महेश्वर दादांकडे पाहून म्हणाला, "दादा, तुमच्या भावानें मी वांझणीस असतांना तुमचा मुलगा माझ्याच घरांत सोडला. त्या वेळीं फार अंधेर असल्याकारणानें बंडोबांना माझें तोंड दिसलें नाहीं आणि त्यांचें तोंड मला दिसलें नाहीं. मी वांझणीहून दोन वर्षांनीं नांदेडला येऊन कायमचा तेथें राहूं लागलों."

दादांनीं विचारलें, "बाबा, तुम्ही इतक्या बारकाईनें चौकशी कां करीत आहां ? माझ्या मुलाला माझ्या भावानें तुमच्या घरीं आणून टाकलें इतकें सिद्ध झालें; पण पुढें त्या मुलाचें काय झालें ? तो जगला वांचला का ?"

महेश्वरानें उत्तर दिलें, "होय. तो जगला, वांचला. त्याचें लालन, पालन, पोषण, शिक्षण, मीं आणि माझ्या घरकरणीनें केलें. तो मुलगा गुणी निघाला."

दादानें विचारलें, "तो मुलगा हल्लीं हयात आहे काय ?"

महेश्वरानें उत्तर दिलें, "होय."

दादांनीं विचारलें, "तो मुलगा मला दिसेल काय ? हल्लीं तो कोठें आहे ? तो खुशाल आहे ना ?"

ह्या प्रश्नांचीं उत्तरें महेश्वरानें दिलीं नाहींत. त्यानें पुंडरीकाला उभें केलें आणि त्याच्या मांडचोळण्याची डावी बाही वर सारून अर्धचंद्राकार तांबडा लास मुक्ताबाईला आणि दादांना दाखविला, आणि प्रेमानें पुंडरीकाला म्हटलें, "नाना, हे दादा तुझे जनक. ह्यांच्या पायांवर डोकी ठेवून त्यांचा आशीर्वाद माग."

मग दादांकडे पाहून महेश्वर म्हणाला, "दादा, हा तुमचा मुलगा सूर्याजी. त्याला आशीर्वाद द्या."

पुंडरीक दादांच्या पायांवर डोकी ठेवणार तोंच दादांनीं त्याला घट्ट मिठी मारून उराशीं कवटाळून धरलें. त्यांच्या डोळयांतून आनंदाश्रूंचे प्रवाह चालले होते. ते लहान मुलाप्रमाणें बराच वेळ स्फुंदून स्फुंदून रडत होते. त्या बापलेकांच्या समागमाचा हा देखावा सभोंवार बसलेल्या लोकांनीं पाहिला तेव्हां त्यांना अतिशय आनंद झाला. अत्यंत शुद्ध, अत्यंत पवित्र, अत्यंत उदात्त आनंद त्यांनीं चाखिला.

दादांना किती आनंद झाला असेल ह्याची कल्पना करणें आम्ही वाचकांवरच सोंपवितों. त्या आनंदाचें वर्णन करावयाला आमची लेखणी असमर्थ आहे !

नांदेड हा गांव कंजळगडाच्या हद्दींत नसल्याकारणानें तेथें झालेल्या चोरीशीं आपला कांहीं संबंध नाहीं, आणि त्या चोरांना शिक्षा करणें आपलें काम नव्हे, असें मनांत आणून शिवाजीनें आफताबखान आणि किसमतखान ह्या दोघांना ताकीद देऊन सोडून दिलें. ते दोघे निजामाच्या हैदराबादेकडे रवाना झाले.

मी नागपुरास जाऊन तेथें एका मित्राच्या वशील्यानें नोकरी मिळवितों, मी दक्षिणेंत राहूं इच्छीत नाहीं, असें बंडोबानें सांगितल्यावरून मार्तंडरावांनीं त्याला उपदेश करून आणि वाटखर्ची देऊन तिकडे जावयाला निरोप दिला.

आतां ह्यानंतर ह्या कथानकामध्यें बंडोबाचें पात्र यावयाचें नसल्याकारणानें त्याच्या संबंधाची एक बाबत सांगून हें प्रकरण संपवितों.

मार्तंडराव आणि बंडोबा ह्यांच्या वडिलांनीं म्हणजे चिमाजीराव गडकरी यांनीं आपल्या प्रत्येक पुत्राला एक एक स्वतंत्र घर उंबरवाडी येथें बांधून दिलें होतें. बंडोबाला पैशाची गरज अनीतीच्या आयुष्यक्रमणामुळें लागल्यामुळें त्यानें आपल्या स्वतांचें घर एका मुसलमानाला कबजेगहाण दिलें होतें. मार्तंडराव गोसाव्याच्या वेषांत उंबरवाडीला गेले असतां त्या घरांत त्यांना जीं माणसें दिसलीं तीं त्या मुसलमानाच्या कुटुंबांतील माणसें होतीं. आपल्या भावाचें घर मुसलमानाच्या कबजांत गेलेलें पाहून त्यांना त्या वेळीं भारी दुःख झालें, हें वाचकांना आठवतच असेल. असो. पुढें लवकरच मार्तंडरावांनीं त्या मुसलमानाला त्याचे पैसे देऊन टाकून तें घर परत आपल्याकडे घेतलें. त्यांचें स्वतांचें दुसरें घर त्या गांवीं असल्याकारणानें हें भावाचें घर योग्य इसमाला बक्षीस द्यावें असा त्यांनीं मनांत बेत करून ठेविला.

---

## प्रकरण ३४ वें.

# केंजळगडावरील हिंदू गडकरी.

मार्तंडराव चिमाजी पवार ऊर्फ गोसावी ऊर्फ दादा, ह्याच्या कुटुंबाला शिलाहार राजांनीं केंजळगड बक्षीस दिला होता. मार्तंडरावांच्या पूर्वजांनीं त्या गडाची रियासत उत्तम चालवून रयतेचें प्रेम आणि संतोष संपादिला होता. केंजळगडाची मालकी मार्तंडरावांकडे आली ती त्यांनीं सुमारें पंधरा वर्षें भोगिली. पुढें त्यांचा एक वीस वर्षांचा मुलगा ज्वरानें निवर्तल्यामुळें त्यांना अतोनात दुःख झालें, आणि धाकटा भाऊ बंडोबा याच्याकडे गडाची व्यवस्था सोपवून आणि आपला धाकटा मुलगा,—सूर्याजी, पुंडरीक, नाना,–ह्याची त्याला काळजी वहावयाला सांगून ते पत्नीसह तीर्थाटन करून मनाला विरंगुळा पडावा म्हणून काशीला गेले. ते तेथें जाऊन सहा महिने झाले न झाले तोंच बंडोबानें सूर्याजीला वांझणी येथें टाकून देऊन सूर्याजी मेला अशी खोटी खबर मार्तंडरावांना पाठविली. तेव्हां अगोदरच एका पुत्राच्या शोकानें होरपळून गेलेल्या मार्तंडरावांच्या हृदयाला धक्का बसला, आणि आयुष्यांत ईश्वरोपासनेशिवाय सुख राहिलें नाहीं, असें म्हणून त्यांनीं बंडोबाकडे केंजळगड सुपुर्द करून काशीसच वस्ती केली, आणि तेथें पत्नीसह ईश्वरोपासनेंत काळ घालवूं लागले. पुढें त्यांची पत्नीही मरण पावली. तेव्हां काशीवासही त्यांना असह्य झाला आणि रामेश्वराची यात्रा करावयाच्या उद्देशानें ते दक्षिणेकडे परतले. दक्षिणेंत मुसलमानांचा जाच पाहून आणि वडिलोपार्जित केंजळगड मुसलमानांच्या ताब्यांत गेलेला पाहून त्यांना परमावधीचें दुःख झालें, आणि महाराष्ट्राच्या उद्धारासाठीं ते शिवाजीचे अनुयायी झाले. यानंतरची पुढची हकीगत वाचकांना विदितच आहे.

हेच मार्तंडराव केंजळगडावर गडकरी व्हावयाला योग्य होत असें शिवाजीला वाटलें. तानाजी, एसाजी, बाजी, वगैरे त्याच्या दोस्तांना, आणि पांडोबा, जानोजीराव, रामराव, वगैरे हितचिंतकांना ही योजना उत्तम वाटली. मग सर्वांच्या विचारानें मार्तंडरावाकडे केंजळगडाची व्यवस्था सोपविण्यांत आली. ह्या प्रसंगीं शिवाजीनें गडावर मोठा दरबार भरविला आणि बहुमानपुरःसर त्यांना गडकऱ्याचीं वस्त्रें दिलीं. ह्या वस्त्रांचा स्वीकार करतांना मार्तंडरावांनीं त्या प्रसंगाला साजेसें भाषण केलें. ते म्हणाले, "मित्रहो, माझ्या पूर्वजांनीं ह्या केंजळगडाची स्वतंत्रपणें अनेक वर्षें रियासत केली. मीही ह्या गडाचा स्वतंत्र गडकरी म्हणून कित्येक वर्षें

वैभव भोगलें; पण ह्या गडाचा स्वतंत्र गडकरी म्हणून जें वैभव मला वाटत होतें, त्याचेपेक्षां दसपटीनें अधिक वैभव मला शिवबाचा अंकित म्हणवून घेण्यांत आणि शिवबाच्या वतीनें ही रियासत करण्यांत वाटत आहे. स्वतंत्र गडकरी ह्या मानापेक्षां शिवबानें नेमलेला गडकरी हा मान मला फार मोठा वाटतो. कारण, गोब्राह्मणांचा प्रतिपाल करण्यासाठीं, चातुर्वर्ण्याची पद्धति शाबूत ठेवण्यासाठीं, मुसलमानांच्या जुलमी, अन्यायी, पक्षपाती, आणि अमानुष राज्यपद्धतीपासून हिंदू लोकांना मुक्त करण्यासाठीं, आणि हिंदूंच्या देशांत हिंदूंना सुखानें भाकरी खातां यावी ह्यासाठीं स्वराज्याची स्थापना करावयाला शिवबानें कंबर कसली आहे. हा शिवबाचा उदात्त हेतु आहे. ह्या हेतूला स्वार्थाचा विटाळ नाहीं. मी गडकरी असतांना मी माझ्यापुरता विचार करीत असें. मी माझ्या केंजळगडापुरता विचार करीत असें. परंतु हा शिवबा सर्व हिंदूंच्या योगक्षेमाचा विचार करीत आहे. अशा शिवबानें नेमलेला गडकरी होणें हा खरा बहुमान आहे. शिवबानें हा जो माझा बहुमान केला आहे, त्याला मी पात्र आहें असें दाखवून द्यावयाला आणि त्यानें ह्या गडावर रियासत करावयाला मला निवडलें ही त्याची निवड योग्य झाली असें दाखवून द्यावयाला मी कांस कसतों. शिवबानें हा जो माझा बहुमान केला आहे, त्याबद्दल मी त्याचा ऋणी आहें आणि त्या मानाचा मी प्रेमानें स्वीकार करतों. ”

येणेंप्रमाणें मार्तंडरावांची गडकऱ्याच्या पदावर नेमणूक होतांच त्यांनीं रियासतीचीं सर्व सूत्रें आपल्या हातांत घेतलीं.

केंजळगडावरील आणि केंजळगडाच्या अमलाखालीं असलेल्या सभोंवतालच्या प्रदेशांतील ज्या लोकांना हिंदू गडकऱ्याच्या अमलाखालीं राहावयाची इच्छा नव्हती, असे सुमारें सात आठशें लोक विजापुर, गोवळकोंडा, वगैरे प्रांतांत राहावयाला गेले. बाकीचे सर्व लोक,—ज्यांत शेकडों मुसलमान होते,—ते हिंदू गडकऱ्याच्या अमलाखालीं खुषीनें राहिले. जीं घरें, जागा, शेतें, वगैरे जुने मालक सोडून गेल्यामुळें बिनवारशी झालीं, त्यांच्या उपभोगासाठीं शिवाजीनें नवीन माणसें इतर प्रांतांतून आणवून त्यांना रहिवासी करून घेतले.

नबाबानें हिंदूंच्या ज्या देवालयांचा विध्वंस केला होता, तीं देवालयें पुन्हां त्याच ठिकाणीं बांधविण्याचीं कामें सुरू करण्यांत आलीं. ह्या कामाला लागणारा पैसा स्वराज्यनिधींतून खर्चावा असें शिवाजीनें ठरविलें होतें. परंतु ह्या कामासाठीं जी रक्कम शिवाजीनें संकल्पित केली होती, तिच्यांतील चवथा हिस्सादेखील

खरोखरीं खर्ची पडला नाहीं. कारण, सुतार, लोहार, गवंडी, बेलदार, पाथरवट, शिकलगार, चितारी, रंगारी, लोणारी, वगैरे कारागीर लोकांनीं हें पुण्य कृत्य समजून अगदीं अत्यल्प आणि जरूर तेवढाच पैसा मोबदल्यादाखल स्वीकारला.

शिवाजीनें केंजळगडावर जीं बांधकामें करविलीं, त्यांत दोन तालीमखाने होते हें सांगणें जरूर आहे. एक महादेवाच्या तटबंदीच्या आवारांत होता, आणि एक मांधारदेव टेकडीच्या तटबंदीच्या आवारांत होता. ह्या दोन्ही तालिमखान्यांत सर्व प्रकारचीं तालमीचीं कामें करावयाला ज्या ज्या साधनांची आवश्यकता होती, तीं तीं साधनें ठेवलेलीं होतीं.

चित्रांच्या महालांतील स्त्रीपुरुषांच्या एकांतिक विलासाचीं चित्रें शिवाजीच्या हुकमानें खरडून टाकण्यांत आलीं आणि त्यांच्या जागीं रामायण, भारत, वगैरेंतील वीररसाचा उद्बोध करणारीं, पावित्र्य वगैरे सद्गुण मनांत ठसविण्याला उपयोगीं पडणारीं, अशीं चित्रें कुशल चितार्‍यांकडून काढविण्यांत आलीं.

नबाबाच्या कारकीर्दींत ज्या मशीदी, पीर वगैरे इस्लामी धर्माचीं पवित्र स्थानें होतीं, त्यांचा शिवाजीनें अपमान केला नाहीं. तीं स्थानें शिवाजीनें शाबूत राखलीं आणि त्यांना केंजळगडाच्या उत्पन्नांतून नेमणुका ठरवून दिल्या. प्रत्येक माणसाला आपापल्या धर्मसमजुतीप्रमाणें चालावयाला पूर्ण मुभा आहे अशा अर्थाचा जाहिरनामा शिवाजीनें दवंडी पिटवून सर्व लोकांस कळविला.

केंजळगडाच्या नबाबाच्या अमलाखालीं जो प्रदेश होता, त्या सर्व प्रदेशांतील प्रत्येक कुटुंबांत शिवाजी, तानाजी, एसाजी, बाजी आणि मार्तंडराव वगैरे लोक गेले, आणि त्यांनीं त्या लोकांना आम्हा हिंदूंचा अमल न्यायाचा, निःपक्षपाताचा होईल असें आश्वासन दिलें, आणि अशा रीतीनें सर्व रयतेचें प्रेम संपादन केलें.

नबाबाचा अमल जेवढया प्रदेशावर चालत असे, तेवढाच प्रदेश शिवाजीनें आपल्या ताब्यांत घेतला. इतर प्रदेशाला उपद्रव केला नाहीं. त्यामुळें आजूबाजूच्या प्रदेशाच्या अधिकार्‍यांना किंवा अमलदारांना शिवाजीचा द्वेष करावयाला कांहीं कारण राहिलें नाहीं. केंजळगडाच्या राज्याचा राजा नबाब असला काय किंवा मार्तंडराव असला काय एकच, असें त्यांना वाटत होतें.

नबाबानें ज्या हिंदूंना जुलमानें बाटविलें होतें, त्यांचें परावर्तन करविण्यासाठीं शिवाजीनें क्षेत्रांच्या ठिकाणांहून स्मृतिशास्त्रज्ञांना आमंत्रणें पाठवून आणविलें. त्यांनीं ह्या पतित लोकांचें परावर्तन करून त्यांना परत हिंदू धर्मांत सामील करून

घेतलें. हे परत हिंदू धर्मांत आलेले लोक पूर्वीच्या आपापल्या जातींत सामील करून घेण्यांत आले. ह्या पतितपरावर्तनाच्या विधीला जो खर्च झाला, तो शिवाजीनें स्वराज्यनिधींतून खर्ची घातला.

ह्या पतितपरावर्तनाच्या प्रसंगीं जें ब्राह्मणभोजन झालें, त्यांत भोपाळगडावरचा पुराणीक पद्माकरभट रानडे यासही आमंत्रण करण्यांत आलेलें होतें. शिवाजीवर त्याचें पुत्राप्रमाणें प्रेम होतें आणि शिवाजी त्याला वडिलांप्रमाणें मान देत असे.

हा पद्माकरभट रानडे परत कोंडणेला जावयाला निघाला तेव्हां त्यानें शिवाजीला मुद्दाम भेटून त्याला आशीर्वाद दिला. शिवाजीनें त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसांचें कुशल विचारलें. शेवटीं भटजींच्या जाफराबादी गायीचीही खुशाली विचारली.

केंजळगडावर मराठ्यांचा अमल सुरू झाला, ही गोष्ट विजापुरच्या बादशहास समजली, तेव्हां त्याला आनंदही झाला नाहीं, किंवा दुःखही झालें नाहीं. कारण, नबाबाचा त्याला इतके दिवसपर्यंत कांहींच उपयोग झालेला नव्हता. नबाब हा आपणाला स्वतंत्र राजा म्हणवून घेत असे, इतकेंच नव्हे तर स्वतंत्रपणानें वागत असे. त्यामुळें केंजळगडावरचा अधिकारी नबाब असला काय किंवा कोणी मराठा असला काय, त्याला सारखेंच होतें. परंतु मराठे लोक राजकारणांत लक्ष्य घालूं लागले आणि ते पुढें मागें आपणाला जाचक होतील, ही गोष्ट विजापुरच्या बादशहाच्या लक्ष्यांत आली नाहीं. कित्येक मुसलमान मुत्सद्यांच्या लक्ष्यांत ही गोष्ट आली. त्यांनीं शिवाजीपासून पादशहातीला पुढें मागें धोका येईल ही गोष्ट बादशहाला सांगितली. परंतु बादशहा शिवाजीला कालचें पोर, गुडघ्याएवढें पोर, टारगट पोर, इत्यादि तुच्छताव्यंजक नांवें देण्यापलीकडे अधिक महत्व देत बसे. जे हिंदू मुत्सद्दी होते, त्यांना शिवाजीचें कर्तृत्व पाहून मनांत आनंदच होत असे. बादशहानें शिवाजीचा बंदोबस्त करूं नये म्हणून हे मुत्सद्दी देखील शिवाजीला कालचें पोर, गुडघ्याएवढें पोर, टारगट पोर, हीं नांवें देत असत. शेंकडों हिंदू लोक खाजगी रीतीनें शिवाजीला पैशाची, माणसांची वगैरे मदत करीत असत.

## प्रकरण ३५ वें.

## १ गंगाजळी. २ पति-पत्नीचें संभाषण. ३ साखरपुडा.

१

शिवाजीनें केंजळगड जिंकून घेतला ह्या गोष्टीला आठ दहा दिवस होऊन गेले. रयतेपैकीं ज्या कोणाला मराठ्यांच्या अमलाखालीं रहावयाचें नव्हतें, ते गडाच्या टापूतून निघून गेले. जिकडे तिकडे स्थिरस्थावर झालें. लोकांनीं आपआपले उद्योगधंदे चालविण्याला सुरवात केली. मार्तंडराव गडकरीसाहेब ह्यांनीं आपल्या पूर्वीच्या अनुभवावरून आणि शिवाजीच्या संमतीनें आपल्या रियासतीचा सर्व मांड आंखून टाकला, आणि सर्व कामें शिस्तीनें चालूं लागलीं. शिवाजीचे साहाय्यकर्ते, ज्यांना घरच्या कामासाठीं परत लवकर जावयाचें होतें, त्यांपैकीं बहुतेक गेलेले होते, आणि कांहीं जावयाच्या तयारीला लागलेले होते.

एके दिवशीं शिवाजीला एकांतांत गांठून मार्तंडराव त्याला म्हणाले, "आबा, मी तुला एक रहस्य सांगणार आहें; आणि हें रहस्य मी तुला एकांतांत गांठून सांगत आहें. यावरून तूं असें समजूं नकोस कीं हें रहस्य तुला एकट्यालाच कळावें. तुझ्या तीन मित्रांना तें कळूं नये अशी माझी इच्छा नाहीं. छेः तशी बिलकूल माझी इच्छा नाहीं. तुम्ही चवघे मित्र देहानें भिन्न आहां पण अंतःकरणानें एकच आहां हें मी जाणून आहें. परंतु तुला एकट्यालाच हें रहस्य मी सांगत आहें यांत माझा हेतु असा आहे कीं मी तुला सांगत आहें तें रहस्य तूं योग्य समय पाहून तुझ्या मित्रांना सांगावें."

शिवाजी म्हणाला, "ठीक आहे, सांगा तुमचें रहस्य."

मार्तंडराव म्हणाला, "आबा, सांगतों ऐक. माझ्या घराण्यांत केंजळगडाची रियासत कित्येक पिढ्या चालत होती. आम्ही शिलाहार राजाशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागत असूं त्यांनींच आम्हाला हा गड आणि त्याच्या लगतचा प्रदेश बक्षीस दिला होता. माझ्या पूर्वजांनीं न्यायानें राज्य करून पुष्कळ पैसा शिल्लक राखून गंगाजळींत टाकला, आणि त्या गंगाजळीचें गुह्य आमच्या घराण्यांत बापानें मरतांना मुलाला सांगावें, अशा रीतीनें माझ्यापर्यंत आलें. माझा वडील मुलगा मृत झाला तेव्हां मी मनाला विरंगुळा पडावा म्हणून तीर्थयात्रा करावयाला गेलों. मन जरा शांत झालें म्हणजे परत यावें असा माझा संकल्प होता. परंतु मी काशीला

गेलों तेथें माझा धाकटा मुलगा सूर्याजी ऊर्फ पुंडरीक ऊर्फ नाना हा मृत झाल्याची खोटी खबर मला माझ्या धाकट्या भावानें दिली. तेव्हां मी जास्तीच वैतागलों आणि परत दक्षिणेंत जाऊं नये अशा विचारानें तेथेंच, म्हणजे काशीस, राहिलों. आणि माझा भाऊ ह्या गडाची रियासत करीत आहे तो करो असें म्हणून स्वस्थ बसलों. माझ्या सांगण्याचा मतलब हा कीं तें गंगाजळीचें गुह्य मी आपल्या धाकट्या भावास कळविलें नाहीं, आणि खरें म्हटलें असतां मला त्याचें स्मरणही राहिलें नाहीं किंवा तें गुह्य भावाला कळवावें अशी मला इच्छा झाली नाहीं, किंवा त्या गोष्टीचें महत्त्वही मला जाणवलें नाहीं, इतका मी विरक्त होऊन गेलों होतों. तें कांहीं असो, पण आतां ती गंगाजळी मी तुला स्वयंप्रेरणेनें बक्षीस देत आहें, तिचा स्वीकार कर. किंवा खरें पाहिलें असतां ती गंगाजळी तुझीच आहे. तूं जेव्हां हा गड जिंकून घेतलास, तेव्हां ती गंगाजळी तुझ्या मालकीची झाली. मी केवळ तुझा नोकर म्हणून ह्या गडाची रियासत करीत आहें. त्या गंगाजळीचें गुह्य मी तुला आज दाखवून देतों. त्या गंगाजळींतील पैशाचा तूं हवा तसा विनियोग कर. तूं हल्लीं यवनांच्या जाचांतून हिंदूंना मुक्त करण्यासाठीं स्वराज्य स्थापावयाला कांस कसली आहेस व त्या कामीं पैशाची तुला जरूर आहेच. तो पसा मी तुला दाखवून देतों."

शिवाजीनें म्हटलें, "त्या गंगाजळींत एक लक्ष रुपये निघाले तरी मी तुमचे उपकार स्मरून ह्या देणगीचा स्वीकार करीन. आणि जरी त्या गंगाजळींत शंभरच रुपये निघाले तरी मी तुमचे उपकार मानून त्या रकमेचा स्वीकार करीन. कारण, मला सत्कार्यासाठीं मिळेल तितका पैसा पाहिजेच आहे, आणि तुम्ही मला जो पैसा देत आहां तो सद्बुद्धीनें देत आहां. आपण दोघेही गोब्राह्मणांचा प्रतिपाल करावयाला, यवनांच्या जाचांतून हिंदूंना मुक्त करावयाला झटणार आहों. मला तो पैसा चैनींत, किंवा विलासांत, किंवा ऐषआरामांत, खर्चावयाचा नाहीं. मला देशहिताचें काम करावयाचें आहे, आणि ह्या कामाला मिळेल तितका पैसा थोडाच आहे, असें मी समजतों. मार्तंडराव, तुमच्या पैशाचा मी कृतज्ञतापूर्वक स्वीकार करतों आणि त्या पैशांतील अल्पस्वल्प भागही भलत्याच कामीं खर्चला जाणार नाहीं असें मी तुम्हाला सांगतों."

मार्तंडराव म्हणाला, "आबा, तूं मला असें आश्वासन देण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं तो सगळा पैसा देशकार्यासाठीं खर्च करशील अशी माझी अगोदरच खात्री झालेली आहे, म्हणूनच तो पैसा मी तुला देत आहें. चैनींमध्यें, विलासामध्यें,

ऐषआरामामध्यें तूं तो खर्च करणार नाहींस अशी माझी खात्री आहे. तूं पवित्र अंतःकरणाचा, पवित्र वाणीचा, आणि पवित्र आचरणाचा, माणूस आहेस. शिवाय, तूं पराक्रमी, धोरणी आणि न्यायी आहेस. हिंदूंचें कल्याण व्हावें अशी तुझी इच्छा आहे. तो उच्च हेतु मनांत धरूनच तूं काम करीत आहेस. तुझ्या हातून स्वराज्य-स्थापनेचें काम तडीस जाईल अशी माझी खात्री आहे. तूं हिंदुस्थानांत हिंदूंचें स्वराज्य स्थापन करशील, तूं छत्रपति होशील, अशी माझी खात्री आहे. परंतु तुला राजा झालेला पहावयाला मी जिवंत राहीन किंवा नाहीं हें मला सांगतां येत नाहीं. मी जिवंत राहिलों तर मी आपणाला मोठा भाग्यवान समजेन. आबा, तूं भाग्यशाली होशील !"

शिवाजीनें विचारलें, "त्या तुमच्या गंगाजळींत किती लाख पैसे असतील ?"

मार्तंडराव आश्चर्यानें उद्गारले, "किती लाख ! किती कोटी म्हण ! कारण, माझ्या एकट्याच्या पंधरा वर्षांच्या कारकीर्दींत मी गंगाजळींत पंधरा लाखांहून अधिक रकम टाकली. माझ्या पूर्वजांनीं कित्येक लाख टाकलेले होते. माझ्या अजमासानें त्या गंगाजळींत किती तरी कोटी रुपये असतील."

शिवाजी म्हणाला, "तुमच्या अजमासाप्रमाणें कितीतरी कोटी रुपये त्या गंगाजळींत असले तर ती खरोखर आनंदाचीच गोष्ट होय. मला मिळतील तितके रुपये पाहिजे आहेत आणि तुम्ही ही गंगाजळी सत्कार्याकडे लावीत आहां."

रात्रींच्या वेळीं मार्तंडरावानें ती गंगाजळी कोणच्या कळीनें उघडावयाची हें शिवाजीला दाखवून दिलें. शिवाजीच्या बरोबर त्या वेळीं तानाजी, एसाजी आणि बाजी हे मुलगे होते. कारण, हे चौघे मुलगे देहांनीं चार होते तरी अंतःकरणानें एकच होते.

[ २ ]

वरील वृत्तान्त घडला त्याच्या दुसऱ्या दिवशीं तिसऱ्या प्रहराच्या सुमारास धोंडीबा आपल्या घरांत मशाली करण्याच्या कामीं जीं जीं हत्यारें जरूर होतीं त्यांची जुळवाजुळव करीत बसला होता. कारण, गेल्या पंधरा दिवसांत मालिनी, अरुंधती आणि तो स्वतः, अशीं तीन माणसें तीन ठिकाणीं होतीं. तीं आतां पुन्हां केंजळगडावर जुळलीं होतीं. गजाननानें विजापुराहून मालिनीबाईंना आणलें होतें.

मशाली करावयाचीं साधनें सर्व घरभर अस्ताव्यस्त पडलीं होतीं तीं मालिनी आणि अरुंधती यांनीं शोधून आणून धोंडीबाच्या पुढें ठेविलीं. मग अरुंधती घरांत

कांहीं करावयाला गेली. तेव्हां मालिनी आपल्या पतीला म्हणाली, " अरुंधती आतां मोठी झाली. तिच्या लग्नाचा विचार केला पाहिजे."

धोंडीबा म्हणाला, " होय, माझ्या डोक्यांत तोच विचार घोळत आहे. माझ्या मनानें मी दोन तीन वर योजून ठेवले आहेत. "

मालिनीनें विचारलें, " ते कोणचे ? "

धोंडीबा म्हणाला, " असेंखवलीचा नारायणबोवा लुगड्यांचा व्यापारी आहे, त्याचा मुलगा यशवंत हा एक वर. येरुलीअसें येथील सदोबा पाटलाचा मुलगा काशीनाथ हा दुसरा. डोईच्या वाडीचा सोनबा मळेवाला याचा मुलगा पांडू हा तिसरा. असे तीन वर मीं पाहून ठेविले आहेत. त्या तिघांपैकीं एकादा आपण ठरवूं. "

मालिनी नापंसती दाखवून म्हणाली, " हे तिन्ही वर मला पसंत नाहींत. असेंखवलीचा यशवंत हा तिशीच्या घरांत आहे. अरुंधतीच्या दुप्पट वयाचा तो यशवंत आहे. येरुलीअरुयाच्या सदोबाचा मुलगा कोळशासारखा काळा आहे. डोईच्या वाडीचा पांडू हा चकणा आहे आणि तो चालीरीतीनें चांगला नाहीं. तुम्हीं योजिलेले तिन्ही मुलगे मला नापसंत आहेत. आपली पोरगी किती सुंदर, किती कामसू, किती सुशील, किती शूर, किती नाजुक, किती सोशीक आहे याचा विचार करा. पोरीला साजेल असाच नवरा तिला पाहिला पाहिजे. "

धोंडीबा म्हणाला, " तूं म्हणतेस तें मला कबूल आहे. आपली पोरगी सुंदर आहे, कामसू आहे, सुशील आहे, शूर आहे, नाजुक आहे, सोशीक आहे, आणि तिला तिच्याचसारखा सुंदर, कामसू, सुशील, शूर, नाजुक आणि सोशीक असा नवरा पाहिजे हें मला कबूल आहे. पण असा नवरा ह्या दुनियेंत तुला सांपडणार नाहीं. एकाद्या विश्वामित्रानें नवीन सृष्टि उत्पन्न केली तर तुझ्या पोरीला सुंदर, कामसू, शूर, नाजुक, आणि सोशीक असा एकादा मुलगा मिळूं शकेल. "

मालिनी म्हणाली, " कां बरें, ब्रह्मदेवाच्या सृष्टींतच असा मुलगा मिळूं शकेल. "

धोंडीबा म्हणाला, " कोण तो तूं तरी दाखवून दे बरें ? "

मालिनीनें उत्तर दिलें, " मार्तंडराव गडकऱ्यांचा मुलगा पुंडरीक ऊर्फ नाना हा नाहीं का तसा ? "

हे बायकोच्या तोंडचे शब्द ऐकतांच धोंडीबा खो खो करून हंसत सुटला. त्याचें हंसें कांहीं केल्या थांबेना. त्याला हंसतांना पाहून मालिनीबाई शरमिंदी होत्साती त्याच्याकडे मुकाट्यानें दृष्टि लावून उभी होती. हंसण्याचा पहिला आवेग ओसरल्यावर धोंडीबा म्हणाला, " वैकुंठाधिपति श्रीविष्णु हा तरी तुझ्या अरुंधतीला योग्य पति आहे असें तूं म्हणशील का ? अग, मी मशाली करून पोट भरणारा माणूस; माझ्या मशालीसाठीं चिंध्या जमविणारी तूं माझी बायको; आणि चरक्यावर सूत काढून दोरा तयार करून मला देणारी आपली मुलगी. मशाली करून गुजराण करणारीं आपण माणसें. हा आपला दर्जा आणि शिलाहार राजांचे मित्र आणि पिढीजादे गडकरी ह्यांचा दर्जा किती थोर ? आपल्या मुलीला तो पुंडरीक कधीं तरी मिळेल काय ? अरुंधती कोणाची मुलगी आणि पुंडरीक कोणाचा मुलगा ? आपला दर्जा काय, आणि पिढीजाद्या गडकऱ्याचा दर्जा काय ? अरुंधती आणि पुंडरीक ! बायको आणि नवरा ! वधू आणि वर ! हाः हाः हाः हाः ! स्वप्नांत तरी तो पुंडरीक आपल्या मुलीचा नवरा होऊं शकेल काय ? हाः हाः हाः हाः ! अगदींच कशी ग तूं मूर्ख ! हाः हाः हाः हाः !"

आपल्या पतीनें केलेला उपहास सहन न होऊन मालिनीबाईंना रडूं आलें आणि त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. बायकोचे अश्रू पाहून धोंडीबाला पश्चात्ताप झाला. बायकोशीं आपण फार कठोरपणाचा विनोद केला, हा विचार त्याच्या मनाला झोंबूं लागला. पुंडरीक हा गडकऱ्याचा मुलगा असून पुढें मागें तो गडकरी होईल, त्याचा दर्जा फारच उंच आणि आपला दर्जा फारच नीच, ही गोष्ट बायकोला सौम्य शब्दांनीं आपण सांगितली असती तर बरें झालें असतें असें त्याला वाटलें, आणि बायकोचा राग घालविण्यासाठीं तो सौम्य स्वरानें म्हणाला, " अग, मी थट्टेनें बोललों त्याचा तुला इतका राग आला ? पण मी तुला आतां असें सांगतों कीं मीं तुला जे वर सुचविले, त्यांपैकीं एकादा आपल्या अरुंधतीला योग्य वर होईल कीं नाहीं याचा तूं तीन दिवस विचार कर आणि पुंडरीकाच्या बापाला आपली अरुंधती सून करून घ्या अशी विनंति करावी कीं करूं नये ह्याचा मीही तीन दिवस विचार करीन. माझ्या विचाराला तुझी संमति पडली तरी ठीक, आणि तुझ्या विचाराला माझी संमति पडली तरी ठीक. कोणीकडून तरी अरुंधती सुस्थळीं पडावी अशी आपली दोघांची इच्छा आहे. जा आतां, आणि राग सोडून दे."

[ ३ ]

वर सांगितल्याप्रमाणें ह्या पतिपत्नींचें संभाषण चाललें होतें तें समाप्त व्हावयाच्या अगोदरच " धोंडीबा कारखानीस ! अहो धोंडीबा कारखानीस ! " अशा हाका त्या दोघांच्या कानीं पडल्या. कोणी तरी बाहेरचें माणूस येथें चौकशी करावयाला येत आहे असें पाहून धोंडीबानें आपलें बोलणें आखडतें घेतलें आणि मालिनीबाई झटदिशीं उठून घरांत गेली.

" अहो धोंडीबा कारखानीस ! अहो धोंडीबा कारखानीस ! धोंडीबा कारखानीस ह्याच घरांत राहातात काय ? " असे चौकशीचे शब्द धोंडीबाच्या कानीं आले. तेव्हां तो चटकन् उठून बाहेर आला आणि पाहतो तों त्याला तानाजी, एसाजी, आणि बाजी हे तिघे मुलगे दिसले. त्यांच्याबरोबर एक मुलगा होता. पहिल्या तिघांना धोंडीबा शिवाजीचे मित्र म्हणून ओळखीत होता पण चवथा मुलगा मात्र त्याला माहीत नव्हता. त्याची वाचकांना ओळख करून दिली पाहिजे. हा मुलगा काळसांवळा असून वयानें वीस बावीस वर्षांचा आणि अंगानें धष्टपुष्ट होता. त्याचीं सर्व गात्रें तालमीनें कसलेलीं होतीं. तो इरसाल मावळा होता. त्याचें नांव बत्ताशा असें होतें. तो शिवाजीला देवतुल्य मान देत असे. तो भारी थट्टेखोर स्वभावाचा असून हव्या त्या माणसाची नक्कल करून लोकांना पोटें धरधरून हंसावयाला लावीत असे. त्याला सर्व जनावरांचे, सर्व पक्ष्यांचे आवाज काढतां येत असत. परंतु त्याचा विनोद कधीं झोंबरा नसे.

असो. ह्या चार मुलांना पाहून धोंडीबा म्हणाला, " मुलांनों, ह्या घरांत मी धोंडीबा माने राहतों. येथें कोणी धोंडीबा कारखानीस नांवाचा इसम राहात नाहीं. मी ह्या गडाचा पूर्ण माहीतगार आहें. तुम्ही चौघे नवखे आहां. मी तुम्हाला खात्रीपूर्वक सांगतों कीं ह्या साऱ्या गडावर धोंडीबा कारखानीस ह्या नांवाचा कोणी इसम नाहीं. तुम्हाला तो इसम कशासाठीं पाहिजे आहे ? "

त्यावर बत्ताशा गंभीरपणानें म्हणाला, " धोंडीबा कारखानीसाला हें आबानें द्यावयाला सांगितलें आहे. "

तेव्हां धोंडीबा म्हणाला, " ह्या घरांत मी धोंडीबा माने राहातों. कोणी नवा मनुष्य कारखानीस ह्या आडनांवाचा आला असल्यास मला ठाऊक नाहीं. चला, मी येतों तुमच्याबरोबर. आपण सारे जण मिळून त्या इसमाचा ह्या गडावर तपास करूं. "

तेव्हां तानाजी शांतपणानें म्हणाला, " धोंडीबा, आम्हाला जो इसम पाहिजे आहे तो येथेंच आहे. तो अगदीं ह्याच घरांत आहे, आणि तो ह्या क्षणीं आमच्या पुढेंच उभा आहे."

असें म्हणून तानाजी धोंडीबाच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, " धोंडीबा, आबानें तुम्हाला भोपाळगडावर कारखानीस नेमलें आहे, हें कळवावयासाठीं आम्ही चौघेजण तुमच्याकडे आलों आहों."

बत्ताशा म्हणाला, " धोंडीबा, पेढे काढा."

बाजी म्हणाला, " पेढे येत आहेत !"

एसाजी म्हणाला, " पेढे वाट चालत आहेत. लवकरच येथें येऊन पोंचतील !"

तानाजीनें सांगितलेली खबर ऐकून धोंडीबाला आश्चर्य वाटलें आणि आनंदही झाला. परंतु बाजी आणि एसाजी पेढे चालत येत आहेत असें जें म्हणाले त्याचा अर्थ त्याला समजला नाहीं. हे चौघे मुलगे जें कांहीं बोलले त्यांत सत्य किती, तथ्य किती, पोरकटपणा किती, आणि वात्रटपणा किती आहे, ह्याचा त्याला कांहीं उलगडा पडेना. तेव्हां अर्थात् तो ते मुलगे पुढें काय बोलतात हें ऐकून घेण्यासाठीं उत्सुक होऊन राहिला.

तेव्हां तानाजी म्हणाला, " धोंडीबा, आम्ही आणलेली खबर अगदीं खरी आहे. आबानें तुम्हाला भोपाळगडावर कारखानीस नेमिलें आहे."

धोंडीबा म्हणाला, " तानाजी, तूं सांगितलेली खबर ऐकून मला आनंद होत आहे. मी आबाचा ऋणी आहें. मी स्वतां त्यांचेकडे जाऊन त्यांचे उपकार मानीनच. पण एसाजी आणि बाजी पेढयांचें काय म्हणत आहेत तें मला समजत नाहीं."

बाजी म्हणाला, " पेढे वाट चालत येत आहेत असें आम्ही म्हटलें तेंही खरें आहे. पेढे खरोखरीच वाट चालून येत आहेत."

यावर धोंडीबा कांहीं बोलणर तोंच शिवाजी, मार्तंडराव आणि महेश्वर, असे तिघेजण तेथें येऊन दाखल झाले.

धोंडीबा आश्चर्यानें आणि आनंदानें आणि कुतूहलानें ह्या वेळीं इतका आक्रान्त होऊन गेला होता, कीं त्याला काय करावें आणि काय बोलावें हें सुचेनासें होऊन तो जागच्याजागीं स्थाणूसारखा उभा राहिला. नांदेडच्या अलीकडे विजापुरच्या रस्त्यावर धोंडीबानें मार्तंडरावांच्या भाकऱ्या त्याच्या शेजारीं बसून खाल्लया होत्या. महेश्वराच्या घरीं ते दोघेजण शेजारीं निजले होते. केंजळगडावर हल्ला करतांना

ते दोघेजण दंडाला दंड भिडवून शत्रुविरुद्ध लढले होते. घरीं आणि शांततेच्या वेळीं त्या दोघांच्या दरम्यान जमीन असमानाचें अंतर पडलें होतें.

मार्तंडराव केंजळगडावर गडकरी असून त्यांनीं आपल्या घरांत पायधूळ झाडावयाला कबूल व्हावें याचें त्याला आश्चर्य वाटलें. तो अगदीं भांबावून गेला आणि काय करावें हें त्याला सुचेना. तो स्थिर दृष्टीनें त्यांच्याकडे पाहात राहिला. त्याच्या मनाची ही स्थिति शिवाजीच्या तत्क्षणीं लक्ष्यांत आली आणि तो म्हणाला, " कारखानीससाहेब, हे गडकरी तुमच्या भेटीला कांहीं कारणानें आले आहेत. त्यांना स्वागत म्हणा. "

हे शिवाजीचे शब्द ऐकून धोंडीबाला कर्तव्याची जागृति झाली. तो नम्रपणानें म्हणाला, " या गडकरीसाहेब, मी तुमचें स्वागत करतों. "

असें म्हणून धोंडीबा घरांत धांवत गेला. त्यानें घरांतील फाटकींतुटकीं कांबळीं बाहेर आणून जमिनीवर आंथरलीं आणि म्हटलें, " बसा. "

सर्व मंडळी बसली तेव्हां शिवाजी धोंडीबाला म्हणाला, " धोंडीबा, हे गडकरी तुम्हाला कांहीं विनंती करावयाला आले आहेत. "

तेव्हां मार्तंडराव शिवाजीकडे पाहून म्हणाले, " नुसते गडकरी असें म्हणूं नको. गडकरी आणि महेश्वरराव आले आहेत असें म्हण. कारण, पुंडरीकाला नुसता जन्म देणारा बाप मी आहें. पण हे महेश्वरराव त्या मुलाचें लालन, पालन, पोषण आणि शिक्षण करणारे बाप आहेत. "

महेश्वर म्हणाला, " गडकरीसाहेब म्हणत आहेत तें कांहीं खोटें नव्हे. पुंडरीक माझाही मुलगा आहे. "

सर्व जण खो खो करून हंसले.

धोंडीबाला ह्या सर्व भाषणांचा चांगलासा उलगडा पडला नाहीं. पण तोही इतरांबरोबर हंसला.

मग हंसणें थांबल्यावर गडकरीसाहेब म्हणाले, " धोंडीबा, आम्हां दोघांच्या पुंडरीकाला तुमची मुलगी अरुंधती ही बायको मिळावी अशी आह्मां दोघां बापांची आणि ह्या इतर सर्व मंडळीची इच्छा आहे. तर तुम्ही आपली मुलगी अरुंधती पुंडरीकाला द्यावयाला कबूल आहां ना ?

हा प्रश्न ऐकून धोंडीबाच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले. त्याचा कंठ आनंदाश्रूंनीं सद्गदित झाला. उचित शब्दांनीं उत्तर द्यावयाला त्याला शब्द सुचेनात. त्यानें कसे बसे ' होय, मी कबूल आहें,' असे शब्द उच्चारले.

मग मार्तंडरावांनीं अरुंधतीला घरांतून बोलावून आणविलें. तिनें येऊन प्रत्येक माणसाला बायकी चालीचे तीन तीन नमस्कार केले. अशा रीतीनें पंचवीस तीस नमस्कार करून ती दूर उभी राहिली. तेव्हां मार्तंडरावांनीं आपल्याबरोबर आणलेले पेढे आणि बत्तासे ह्यांनीं भरलेलें शिप्तर आणि साडी आणि खण आणि कुंकूं पुढें ठेवून म्हटलें, " अरुंधती, हा घे तुला खाऊ ! "

अरुंधतीनें मंदस्मितपूर्वक त्या शिप्तराचा स्वीकार केला. तें शिप्तर आणि साडी आणि खण आणि कुंकू ती उचलून घेऊन घरांत गेली. ती गेल्यावर बाजी आणि एसाजी मंदस्मितपूर्वक धोंडीबाला म्हणाले, " पेढे वाट चालून येत आहेत असें आम्ही म्हटलें तें खरें झालें ना धोंडीबा ? "

धोंडीबा म्हणाला, " होय, तें खरें झालें."

---

## प्रकरण ३६ वें.

# पात्रांची विल्हेवाट.

वाचकहो, जी गोष्ट तुम्हांला सांगावी असा आम्ही संकल्प केला होता ती सांगण्याचें काम संपलें. आतां त्या गोष्टीमध्यें ज्या इसमांचें कर्तृत्व आपण पाहिलें, त्यांचें पुढें काय झालें हें सांगतों.

शिवाजी, तानाजी, एसाजी आणि बाजी, ह्या चार देशभक्तांचीं कर्तृत्वें आम्ही येथें सांगत बसत नाहीं. कारण, त्यांना इतिहासकारांनीं आणि कवींनीं अजरामर केलेलें आहे. परंतु ज्या माणसांनीं शिवाजीला स्वराज्यस्थापनेच्या कामीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें मदत केली, अशीं शेकडों, हजारों, लाखों माणसें होतीं, आणि त्यांचा परामर्ष ग्रंथकर्त्यांकडून केला गेलेला नाहीं. अशा माणसांपैकीं कांहीं माणसें आमच्या ह्या गोष्टींत आलीं आहेत. त्यांच्या आयुष्यांत त्यांनीं पुढें काय केलें हें सांगणें जरूर आहे म्हणून तें करतों.

जानोजीराव, पांडोबा, महेश्वर आणि रामराव, ह्यांनीं केंजळगडाकडे येतांना आपापल्या गांवचे जे देशभक्त वीर आणले होते, त्यांपैकीं कांहीं केंजळगडाच्या शिबंदींत सामील होऊन गडावरच राहिले. कांहीं वीर आम्ही परत घरीं जाऊन आईबापांची परवानगी घेऊन किंवा घरची व्यवस्था लावून लवकरच परत येऊं असें सांगून गेले. अगदीं थोडे वीर मात्र आम्हाला घरेंदारें सोडून नेहमीं राहातां येणार नाहीं, परंतु कारणपरत्वें आम्ही अवश्य येऊं असें सांगून निघून गेले.

जानोजीराव परत सारणगांवाकडे रवाना झाला. पांडोबा कोंडणीला आणि रामराव सिंहोलीला परत गेले. त्या तिघांनाही आपापलीं घरेंदारें सोडून फार दिवस राहातां येणें शक्य नव्हतें. ते वयानें पन्नाशीच्या वर असून त्यांचीं सांसारिक बंधनें त्यांच्या त्यांच्या गांवीं उत्पन्न झालेलीं होतीं. या कारणांमुळें त्यांना शिवाजीचे प्रत्यक्ष अनुयायी होऊन राहाणें शक्य नव्हतें. तथापि त्यांनीं शिवाजीची अप्रत्यक्ष रीतीनें बहुमोल कामगिरी केली. मुसलमानांच्या जाचांतून हिंदूंना सोडविण्याचा स्वराज्य हा एकच उपाय आहे असें तरुणांना सांगून त्यांना शिवाजीचे अनुयायी व्हावयाला सिद्ध करणें ही कामगिरी ते आजन्म करीत राहिले.

सरवलीच्या कुशाबाचा मुलगा काशीराम,—जो विजापुर येथें होता,—तो विजापुरची आपली नोकरी सोडून देऊन मुरारीप्रमाणें शिवाजीचा अनुयायी झाला.

नांदेडचे पुंडरीकाचे मित्र सदाशिव, पांडू आणि मल्हारी, पुढच्या वर्षी आम्ही शिबंदींत सामील होऊं असें म्हणून सर्वांचा निरोप घेऊन गेले. पुंडरीकाचा निरोप घेतांना त्यांनीं त्याचें लग्न लवकरच व्हावयाचें होतें म्हणून त्याचें अभिनंदन केलें आणि थोडीशी थट्टाही केली. आम्ही शेतकऱ्यांचे मुलगे, तूं गडकऱ्याचा मुलगा, आतां तुला दंभ चढेल, तूं आम्हाला विसरशील, तूं आपल्या लग्नाच्या प्रसंगीं आम्हाला बोलावणार देखील नाहींस, असा वात्रटपणा करून ते निघून गेले.

महेश्वर आणि भवानी यांनीं पुंडरीकाचें लालन, पालन, पोषण आणि शिक्षण केलेलें होतें आणि तो त्यांना अतिशय प्रिय होता. त्याला मार्तंडरावांच्या हवालीं करून जातांना त्यांना परमावधीचें दुःख झालें हें सांगणें नलगे.

एक स्थायिक आणि एक फालतू शिबंदी केंजळगडावर उभारण्याला सुरवात करण्यांत आली. सर्व महाराष्ट्रीय लोक मुसलमानांच्या जुलमी रियासतीला विटलेले आणि स्वराज्यस्थापनेला बुभुक्षित झालेले होते. त्यामुळें दोन्ही शिबंदींत लवकरच भरती झाली ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

भोपाळगडावरची जी फालतू शिबंदी शिवाजीनें केंजळगडावर आणविली होती, ती कांहीं महिने केंजळगडावर राहूं द्यावी असें शिवाजीला सोयीचें वाटलें. केंजळगडावर ज्या दोन शिबंद्या उभारावयाच्या होत्या त्या उभारण्याचे कामीं, आणि या उभारल्यावर त्यांना कवाईत शिकवून तयार करण्याचे कामीं भोपाळगडावरील फालतू शिबंदीचा उपयोग होईल असें शिवाजीस वाटलें आणि त्याप्रमाणें त्याचा उपयोग झालाही. ह्या वेळीं केंजळगडावर खूपच माणसांची गर्दी झालेली होती. खुद्द केंजळगडावर एक शिबंदी होती आणि दुसरी भोपाळगडावरून आणविलेली फालतू

शिबंदी असून शिवाय केंजळगडावरही एक नवी शिबंदी उभारलेली होती; अशा रीतीनें तीन शिबंद्यांची गर्दी ह्या वेळीं केंजळगडावर झाली होती.

शिवाजीनें स्वराज्यस्थापनेचा उद्देश मनांत धरला होता. त्याला साहाय्यकारी अशा पुष्कळ गोष्टी शिवाजीनें येथें ठरविल्या. ह्या ठरविण्याच्या कामीं त्याला त्याच्या मित्रांची आणि हितचिंतकांची पुष्कळ मदत झाली हें सांगणें नलगे. महाराष्ट्रांतील बहुतेक महत्वाच्या किल्लयांवर त्यानें आपले हितचिंतक लोक राहावयासाठीं पाठवून दिले. त्यांपैकीं कांहींनीं किल्लयावर नोकऱ्या पतकरल्या, व कांहीं स्वतंत्र धंदे करीत बसले. अशा प्रकारें वेगवेगळ्या किल्लयांवर पाठविलेल्या माणसांपैकीं आपल्या ओळखीचे कांहीं लोक कोठें कोठें गेले, हें येथें सांगितलें असतां वावगें होणार नाहीं.

काशीराम आणि कमळ्या हे दोघे जण जंगली जयगडावर राहावयास गेले. तेथें त्यांनीं बुरुडाचा धंदा चालविला. काशीरामाचा भाऊ माणकोबा हा आपली विजापुरची नोकरी सोडून सध्याच केंजळगडावर येऊन हजर झाला होता. त्याला आणि सारणगांवच्या जानोजीराव पाटलाचा मुलगा मन्मथ अशा दोघांना शिवाजीनें भैरव गडावर राहावयाला पाठविलें. तेथें बुरुडाचा धंदा त्यांनीं सुरू केला. बत्ताशाला त्यानें आपल्याजवळ ठेवून घेतलें.

मुक्ताबाई तावरे,—पुंडरीकाची दायी,–ही शिवाजीची अनुयायी झाली, आणि त्याचीं तिला करतां येण्याजोगीं कामें ती आजन्म करीत राहिली.

आपल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्याला मदत व्हावी म्हणून शिवाजीनें सोईच्या ठिकाणीं आपल्या हितचिंतकांचीं कुटुंबें स्थापिलीं. कांहीं ठिकाणीं त्यानें दहा दहा, पांच पांच, अशा सभ्या माणसांच्या टोळ्या स्थापल्या. त्यांनीं एकाद्या गांवांत, एकाच घरांत किंवा वेगवेगळ्या घरांत राहावें, कांहीं तरी धंदा करावा, हिंदु वाटसरांची उतरावयाची सोय करून द्यावी, मुसलमान टोळभैरवांच्या उपद्रवांपासून त्यांचें संरक्षण करावें, इत्यादि नानाविध कर्तव्यें शिवाजीनें त्यांना नेमून दिलीं.

